**प्रभाकर पाध्ये यांची पुस्तके**

आजकालचा महाराष्ट्र ( सहकार्याने )
कलेची क्षितिजे
निळे दिवस ( निवडक कथा )
समाजवादाचा पुनर्जन्म
नवे जग : नवी क्षितिजे ( प्रवासलेख )
अगस्तीच्या अंगणात ( प्रवासलेख )
उडता गालिचा ( प्रवासलेख )
तोकोनोमा ( प्रवासलेख )
हिरवी उन्हे ( प्रवासलेख )
मैत्रीण ( कादंबरिका )
व्यक्तिवेध ( व्यक्तिचित्रे )
आगळी माणसे ( व्यक्तिचित्रे )
आस्वाद ( समीक्षा )
कादंबरीकार खानोलकर ( समीक्षा )
मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा
पाटणकरांची सौंदर्यमीमांसा
वामन मल्हार आणि विचारसौंदर्य
चिवारीची फुले ( ललित लेख )
जीवनधारा ( लेखसंग्रह )
युगोस्लाव्हिया ( इंग्रजी )

**आगामी**

सौंदर्यानुभव
मानव आणि मार्क्स
वृत्तव्यवसायाची मूलतत्त्वे ( इंग्रजी )

जपानी घरांच्या खोल्यांत,
विशेषतः आगतस्वागताच्या
खोलीत, कोनाकडे भिंतीत,
एखाद्या लांबरुंद कोनाड्या-
सारखा भासणारा, एक भाग
असतो. त्यांत खालीं एका
चौरंगावर अगर पाटावर
एक पुष्पपात्र असतें. पुष्प-
पात्राच्या मागें, भिंतीत, त्या
त्या ऋतूला योग्य असें एखादें
निसर्गचित्र अगर चित्ररूप
काव्यचरण रंगविलेला असतो.
या भागाला तोकोनोमा म्हणतात.



Tokonoma
( Marathi Travelogue )
Prabhakar Padhye

तोकोनोमा

पॉप्युलर प्रकाशन

म–६०

सजावट
पद्मा सहस्रबुद्धे

मुद्रक :
नाना डेंगळे
साधना प्रेस
४३०-३१ शनिवार पेठ
पुणे ४११ ०३०



प्रकाशक :
रामदास भटकळ
पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि.
३५ सी ताडदेव रोड
मुंबई ४०० ०३४

पहिली आवृत्ती : १९६१/१८८३
दुसरी आवृत्ती : १९७९/१९०१

*प्रिय पाध्ये,*

जपानहून तुम्ही परत आलात आणि दुसऱ्याच दिवशी आपण भेटलो. अर्थातच तुम्ही जपानबद्दल खूप खूप बोलत होता. हा अनुभव आम्हाला तुमच्याबद्दल नवा नव्हता. दर वेळी तुम्ही प्रवासाहून परत आलात की असेच बोलत बसता. परंतु ह्या वेळची तुमची धुंदी वेगळी होती. एखाद्या देशाच्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक जीवनाचे विश्लेषण आणि रसग्रहण करणारे तुम्ही ह्या वेळी एका वेगळ्याच बेहोषपणाने बोलत होता.

तुम्हाला जपानने झपाटले होते खरे; परंतु पुस्तकातील वेगवेगळे लेख तुम्ही तीन वर्षे लिहीत होता, तेव्हा म्हटले की ही धुंदी उतरली असेल. परंतु पुस्तक छापण्याच्या दृष्टीने मी तुमचे लेख एकत्र वाचायला लागलो आणि लक्षात आले की हे नुसते प्रवास-वर्णन नव्हे. तुम्ही 'नवे जग : नवी क्षितिजे' ह्या पुस्तकात कालानुरोधाने प्रवासाचे – प्रवासातील घटनांचे, व्यक्तींचे आणि वस्तूंचे – वर्णन केले होते. ह्या पुस्तकात तुम्ही ते कालाचे बंधन झुगारून दिले आहे. कदाचित यातील काही घटना कल्पितही असतील. परंतु ज्या धुंदीने तुम्ही त्या पहिल्या दिवशी बोलत होता त्याच धुंदीचा प्रत्यय हे लेख वाचताना आला आणि जे दिसले त्यापेक्षा जे वाटले ते सांगण्याचा तुमचा प्रयत्न अत्यंत रमणीय वाटला. तुमचे हे पुस्तक म्हणजे जपानी सौंदर्याचे गुणगान. म्हणूनच 'तो को नो मा' हे नाव मला सर्वथा योग्य वाटते.

आपला

*रामदास भटकळ*

# थोडा खुलासा

या पुस्तकात काही मित्रांचा आणि मैत्रिणींचा उल्लेख आहे. या उल्लेखातला प्रत्येक शब्द आणि अभिप्राय परमार्थाने घेतला जाणार नाही अशी आशा आहे. लेखनाच्या प्रक्रियेत मूळचे उद्गार आणि मूळची स्वभावरेखा यांचे संक्रमण झालेले असणारच.

उदाहरणार्थ, माझे मित्र प्रोफेसर हर्बर्ट पासीन. मी प्रथम जपानला त्यांच्याबरोबर गेलो. त्यानंतर जपानमधल्या माझ्या प्रत्येक मुक्कामात ते तेथे होते. त्यांच्या स्नेहाचे आणि सहवासाचे अनेक पडसाद या पुस्तकात उमटलेले आहेत. पण त्यांच्यावर विस्मरणाचे आणि काल्पनिकतेचे किती संस्कार झाले असतील कोण जाणे!

या पुस्तकाचे कोडकौतुक करण्यात पॉप्युलर प्रकाशनचे सदानंदराव आणि रामदास भटकळ यांनी श्रम आणि खर्च यांची क्षिती बाळगली नाही याबद्दल त्यांचे पुरेसे आभार कसे मानणार?

२०-८-१९६१

प्रभाकर पाध्ये

# अनुक्रम

# काही जपानी शब्द

**आनोने** : इकडे पाहा, हे पाहा, यांसारखा दुसऱ्याचे लक्ष वेधून घेण्यासाठी वापरलेला शब्दप्रयोग.

**आरिगातो** : आभार मानण्यासाठी केलेला शब्दप्रयोग.

**आसो** : असे का, आच्छा, अशा उद्गाराचा शब्दप्रयोग.

**ओबी** : किमोनोवर बांधण्याचा कमरपट्टा. याची सुंदर घडी पाठीवर येते.

**कोटो** : एक जपानी तंतुवाद्य.

**गेटा** : खडावेसारखी लाकडी तळव्याची चप्पल.

**चाया** : गेशांना भेटण्याचे चहाचे उपाहारगृह.

**झोरी** : बायकांची उंच टाच-तळव्याची चप्पल.

**टाबी** : आंगठ्यासाठी निराळा भाग पाडलेला पायमोजा.

**टेम्पुरा** : भज्यासारखा तळलेला मासा.

**दोझो** : कृपा करून – विनविण्यासाठी वापरलेला शब्दप्रयोग.

**बॉन्साय** : मुद्दाम खुजटविलेल्या झाडाची कुंडी.

**फुसुमा** : जपानी घराच्या खोल्यांमधली सरकविण्याची भिंत.

**ममासान** : दारूपानाच्या दुकानाची मालकीण किंवा संचालिका.

**रम्मा** : सरकणारी भिंत आणि तुळई यांच्या दरम्यानचा भाग.

**शोगन** : जपानी पेशवा.

**साके** : तांदळाची दारू – जपानचे राष्ट्रीय पेय.

**सामीसेन** : एक जपानी तंतुवाद्य.

**सामुराई** : जपानचा क्षत्रियवर्ग.

**सायोनारा** : निरोप देण्यासाठी वापरावयाचा शब्दप्रयोग.

# अतामी



अतामी हे मधुचंद्राचे अभिजात ठिकाण आहे. निसर्गानेच अतामीची तशी योजना केलेली आहे. आपल्याकडून तिला काही कमी पडू नये अशी त्याने शक्य तितकी काळजी घेतली आहे. जपानचा रिव्हिएरा म्हणून प्रसिद्ध असलेल्या भागातील एका नितांतसुंदर खोऱ्यात अतामी वसलेली आहे. तीन बाजूंना तीन तऱ्हांनी पसरलेल्या डोंगरांनी तिला कुशीत घेऊन कुरवाळली आहे, आणि चौथ्या बाजूला समुद्र तिच्या पायाशी येऊन चूर झाला आहे. या डोंगरावरील वनश्रीकडे टक लावून अतामी पाहते तेव्हा तिचे डोळे हिरव्या स्वप्नांनी मुग्ध होतात, आणि ती समुद्राच्या निळ्या विस्तारावर दृष्टी फेकते तेव्हा तिची नजर विस्फारते. एकीकडे डोंगरावरील आकाशरेषेबरोबर ती आंदोलित होते तर दुसरीकडे क्षितिजावरील जहाजांबरोबर ती स्थिरावते. समुद्र आणि डोंगर यांच्या-बरोबर नजरबंदीचे असे खेळ खेळत असतानाच मधल्या ओढ्यांच्या काठांनी

ती आपला व्यवहार मांडते आणि मग या व्यवहाराने थकलेले शरीर उष्ण झऱ्यांच्या हौदांत आरामाने झोकून देते. उन्हाळी झरे हे अतामीचे वैभव आहे. बारा महिने तेरा काळ या वैभवाच्या विलासात ती दंग असते – त्याच्या दरवळलेल्या उन्मादक गंधात मस्त असते.

अतामी हे एकट्याने भेट देण्याचे ठिकाण नाही. जोडप्याने भेट देण्याचे ठिकाण आहे. या जोडप्याच्या बंधनाची गाठ स्वर्गात बांधलेली असली पाहिजे अगर सालंकृत कन्यादानाची चिन्हे धारण करून त्याने आपल्या परिसरात पाऊल टाकले पाहिजे अशी अतामीची मुळीच अट नाही. एक पुरुष आणि एक स्त्री एवढी निसर्गनियमाची किमान अट त्याने पाळली की पुरे – अधिक चांभारचौकशा करण्याची गरज नाही. हा पुरुष आणि ही स्त्री परस्परांवर अनुरक्त असली की ती खूश – आणि शनिवार-रविवारची सुट्टी घालविण्यासाठी आलेल्या जोडप्यांच्या पहिल्या नजरेतच हे अनुरक्तीचे पाणी खेळत असलेले दिसते असा तिचा अनुभव असतो. म्हणून आगगाडीच्या स्टेशनात ही जोडपी उतरल्याबरोबरच ‘ मधुचंद्राच्या यात्रेकरूंचे स्वागत असो ! ’ अशी घोषणा ती करते. या घोषणांचा आवाज हा अतामीचा खास आवाज आहे, आणि जपानी गेटांचा ‘ खटक्–खटक् ’ ‘ खटक्–खटक् ’ आवाज अगर रात्रीचा आगीच्या बंबवाल्यांचा ‘ टाप्–टाप् ’ ‘ टाप्–टाप् ’ हा आवाज, या अभिजात आवाजांइतकाच या घोषणेच्या आवाजाचा तिला अभिमान आहे. या आवाजात तिचे सारे अगत्य, सारा उत्साह भरलेला आहे. अतामीत येणारे मधुचंद्राचे यात्रेकरू या आवाजावर आंदोलित होऊनच येतात – कारण ते जमिनीवरून चालत नाहीत, हवेतून चालतात !

अतामी पाच दिवस आळसावते, पण या दोन दिवसांत तिच्या अंगामध्ये वारे शिरते! शुक्रवारपासूनच तिची झोप उडू लागते, आणि शनिवारी ती चांगली नाचू लागलेली असते. या दोन दिवसांत ती किमोनोवरील नक्षीच्या नजरेने पाहते, उन्हाळी झऱ्याबरोबर खेळते, साकेच्या पेल्याबरोबर झुकते, सामीसेनच्या स्वराबरोबर गाते, पंख्याच्या प्रतीकात्मक पवित्र्याबरोबर पदक्षेप करते – एकंदरीत यौवनाच्या उन्मादाने बेहोश होते. अतामीच्या आठवड्यातले हे दोन दिवस म्हणजे स्वतःला झोकून देण्याचे दिवस होत !

अतामीचा संसार म्हणजे अतामीच्या हॉटेलांचा संसार. पाच दिवस यथास्थित ताणून देऊन सहाव्या दिवशी ती तुमच्या स्वागतासाठी सज्ज होतात.

त्यासाठी आपल्या साऱ्या चैतन्याला जाग आणतात. त्यांचा माणूस स्टेशनवरच तुमचे स्वागत करतो. तेथून तो तुम्हाला हॉटेलमध्ये घेऊन जातो. हॉटेलच्या दर्शनानेच तुम्ही खूश होऊन जाता. जपानी कलात्मकतेचे प्रमाणशीर सिंचन त्याच्या प्रवेशद्वारावर झालेले असते, आणि त्याच्या नावात जपानी काव्य ओतलेले असते. येथे समुद्राचा खारा वारा तुमचे अंग फुलवील अगर अलुबुखारच्या फुलांचा सुगंध तुमचे अंतःकरण उमलवील अशी या नावात ग्वाही असते. हॉटेलात आल्याबरोबर तेथील गोड परिचारिका तुमचे स्वागत करते – म्हणजे तोंडभर हास्य फुलविते, नेत्रांच्या मासोळ्या नाचविते, कमरेत लवून नमस्कार करते आणि लगेच तुमच्या बुटांचे बंद सोडू लागते. मग पायांत घालण्यासाठी सपाता पुढे करते आणि तुम्हाला तुमच्या खोलीत घेऊन जाते. खोलीच्या नुसत्या दर्शनाने तुमचे भान हरपते. दरवाजासमोरच स्टँडचा पडदा असतो, त्याच्यावरचे किर्रमिर्जी रंगातले बगळ्याचे जपानी चित्र पाहून तुमची नजर स्तब्ध होते – पण क्षणभरच; कारण इतर अनेक गोष्टी तिला आपल्याकडे खेचीत असतात. तोकोनोमात टांगलेल्या चित्रातले फोडलेल्या डाळिंबाचे दाणे आणि सतरा छेदांच्या छोट्या काव्याची जपानी चित्राक्षरे यांची संगती तुमची नजर क्षणभर अगदी बांधून टाकते. तोकोनोमातल्या फुलदाणीत आज सूर्यफुलांची योजना आहे (जपानी चिडाच्या अगर मोरपंखाच्या डहाळीची नाही) ही बहुधा परकीय पाहुण्यांच्या आवडीची खास कदर. वर छताच्या प्रत्येक खणात चित्रकलेचे खास नमुने आहेत. एकात कावळ्याची योजना आढळते – आणि जन्मात प्रथमच कावळा सुंदर वाटतो! पण या साऱ्या चित्रचातुर्यापेक्षा तोकोनोमाचा लाकडी खांबच तुमचे लक्ष खेचून घेतो. जंगलातल्या झाडाचा हा सलग अवयव तसाच, त्याच्या साऱ्या नैसर्गिक वळणांसह, येथे आणून बसविलेला असतो. त्याच्यावरची साल काढून टाकण्यापलीकडे शस्त्राचे अधिक काही संस्कार त्याच्यावर झालेले नसतात. पण त्याच्या दाणेदार रेषांच्या अंगावर पॉलिशचे हात असे काही फिरलेले असतात की त्याच्या तकतकीत दर्शनाने तुम्हाला वेड लागते आणि त्याला जाऊन आलिंगन देण्याचा तुम्हाला मोह होतो. पण ती मुलगी तेथे असल्यामुळे तुम्ही तसे काही करीत नाही, फक्त एकवार त्याच्यावर हळुवार हात फिरविता आणि मग नजर इकडेतिकडे फिरते. तुम्ही चकित होता. खोलीत फर्निचर काहीच नसते. एका कोपऱ्यात फक्त एक कपडे ठेवण्याचा स्टँड आणि भिंतीसरशी एक बैठा आरसा. पण त्या खोलीचे

रिकामे रूपच तुमच्यावर अंमल गाजवू लागलेले असते. कारण तुमच्या पायांना रेशमाचा स्पर्श करणारी आणि डोळ्यांत तकतकितपणा ओतणारी जमिनीवरची तातामी ( चटई ) तुम्हाला ओढ लावीत असते. इतक्यात ती मुलगी सज्जातल्या सरकत्या खिडक्यांचे पडदे सरकावते आणि तुमचे लक्ष सज्जातल्या सोफाखुर्च्यांकडे आणि खिडक्यांतून दिसणाऱ्या समुद्राच्या विस्ताराकडे जाते आणि तुम्ही नकळतच जाऊन सोफ्यावर अंग झोकून देता आणि टक लावून बाहेर पाहू लागता. पण ती मुलगी तुमच्या भोवती घोटाळत असते. तिला तुमचे कपडे उतरवायचे असतात. तुमच्या ते ध्यानात येते आणि तुम्ही ( सवयीप्रमाणे) स्वतःच कपडे उतरवू लागता, पण ती मुलगी हळूच येते आणि फुलपाखराच्या हातांनी तुमचे कपडे उतरवू लागते. तुम्हाला प्रथम कसेसेच वाटते, पण तिच्या समर्पित सेवेची मोहिनी अनिवार ठरते. तुम्ही स्वतःला तिच्या ताब्यात देता आणि ती तुमचे कपडे निर्वेध उतरू लागते. शेवटी तुमच्या अंगावर इतके कमी कपडे राहतात की तुम्ही गडबडता, गोंधळता. पण काही बोलत नाही, काही करीत नाही – करू शकत नाही. ती तुमच्या कपड्यांच्या हलक्या हातानी घड्या करते, फुलासारख्या घड्या करते आणि कोपऱ्यात नेऊन ठेवते. मग युकाता ( घरात घालावयाचा किमोनो ) आणून तुमच्या अंगात चढविते. आता तुम्हाला इतके मोकळे मोकळे वाटते की तुम्ही सारे अंग चटईवर पसरून देता, चटईच्या अंगभर स्पर्शाने सुखावून जाता आणि ती मुलगी आपले वेड लावणारे हास्य तुमच्या लोळण्यात मिसळून निघून जाते. जाते पण जरा वेळाने परत येते. आता तिच्या हातात टॉवेल असतो. स्नानगृहात पाणी तयार आहे म्हणून ती सांगते नि तुम्ही स्नानाला जाता. स्नानगृहाच्या बाहेरच कपडे काढून ठेवण्याची व्यवस्था आहे. तेथे विवस्त्र होऊन स्नानगृहात शिरायचे! मग तुमच्या ध्यानात येते की त्या स्नानगृहाच्या दरवाज्याला कडी नाही, आणि तुमचा पाय अडखळतो. पण उन्हाळी झऱ्याच्या पाण्यात शिरायला तुम्ही अधीर झालेले असता, तेव्हा इतक्यात कोणी न येवो अशी प्रार्थना करून तुम्ही आत शिरता. आतला देखावा पाहून तुमचे डोळे चकित होतात. सारे स्नानगृह कसे चकचकित आरस्पानी असते! एका कोपऱ्यात नळ असतो, तेथे प्रथम अंघोळ करून मग गरम झऱ्याच्या हौदात शिरायचे. हौदातले पाणी गरम आहे, फार गरम आहे; त्याच्यावर वाफा उठत आहेत. आत झरे आहेत, झऱ्याच्या उपळीमुळे आतून लहान-

लहान बुडबुडे उटत आहेत, आणि त्यांच्यामुळे पाण्याचा उष्णपणा मनावर चांगला ठसत आहे. पण वरून थंड पाणी सोडण्याची व्यवस्था आहे. तुम्ही थंड पाण्याचा नळ सोडता – उन्हाळी पाण्याच्या नाजुक बुडबुड्यांचा अवमान न होईल इतक्या बेताने सोडता – आणि हौदात शिरता. शिरल्याबरोबर गरम पाणी चारी बाजूंनी तुमच्या अंगावर चाल करून येते. हळूहळू पाण्याची उष्णता तुमच्या रोमारोमांत शिरते. तुमच्या धमन्यांतले रक्त चेतते. रक्ताचे अभिसरण वाढते. त्यात गती शिरते. सळसळ शिरते – मग लगेच तुमच्या नसान् नसा मोकळ्या होताहेत असे वाटू लागते. त्वचेचा कणन् कण फुटून येत आहे असे भासते. तुमच्या शरीरात आराम शिरतो. मन मुक्त होते. पाण्याच्या थेंबांचा सुखद संचार सर्वांगाला जाणवू लागतो. आता तुम्ही त्याच्याशी खेळू लागता. पायाच्या अंगठ्याने एक झरा बुजविण्याचा प्रयत्न करता – आणि तरी झरा उफाळून येतो. त्याची गंमत चाखत राहता. नंतर हौदात माशाप्रमाणे मुरडत, कलंडत, अंग दुमडून मासा होण्याचा प्रयत्न करता! हा खेळ चालू असताच तुमच्या ध्यानात येते की ह्या हौदाची लांबी-रुंदी फक्त दोन व्यक्तींपुरतीच आहे. सहस्नान हे जपानी मधुचंद्राचे एक महत्त्वाचे अंग आहे.

तुम्ही स्नान करून परत येता तो जेवण तयार असते. परिचारिका एक छोटेसे चौरंगासारखे टेबल आणून ठेवते, त्याच्याभोवती गिरद्या मांडते आणि टेबलावर जेवणाचे पेले आणून ठेवते. जपानी जेवण तुम्हाला आवडो न आवडो, त्याच्या नुसत्या दर्शनाने तुमचे पोट भरते – निदान दृष्टी निवते. कारण जपानी जेवण जितके स्वादिष्ट असते त्याहून अधिक रंगदार असते. लाल, शेंदरी, केशरी रंगाचे पदार्थ जिभेपेक्षा डोळ्यांनाच अधिक भुरळ घालतात. जपानी कारागिरांची शेकडो वर्षे कमावलेली कलादृष्टी त्यात ओतलेली असते. या दृष्टीचे सारे रंगदार संस्कार त्यांच्यावर झालेले असतात. एकेक बशी आणि एकेक पेला म्हणजे कलेचा कोमल नमुना असतो. वैशिष्ट्यपूर्ण नमुना, कारण प्रत्येक हॉटेल स्वतःसाठी खास वैशिष्ट्याच्या पेले-बशा तयार करवून घेत असते. म्हणून हॉटेलचे अन्न जितके रंगदार तितकेच त्याच्या पेले-बशाही रंगदार – आणि रंगदार अन्न आणि रंगदार बशा यांची रंगीत स्पर्धा तुम्ही क्षणभर नुसती पाहतच राहता!

जेवण झाल्यावर अर्थात तुम्ही बाहेर भटकायला जाता. परत येता तो जेवणाचे टेबल दृष्टिआड झालेले असते आणि त्या ठिकाणी मखमली आवरणाचे रंगदार अंथरूण घालून ठेवलेले असते. अंथरूण ऐसपैस असते आणि त्याच्यावर दोन पांघरुणे असतात.

* * *

अतामीच्या शोभेचा आस्वाद जोडप्याने घेतला पाहिजे. अतामीच्या सुशोभित रस्त्यांत जोडप्याने हिंडले पाहिजे. जोडप्याने म्हणजे नुसते हातात हात अडकवून नव्हे. जोडप्याने याचा अर्थ एकाच्या अंगातल्या चैतन्याच्या प्रवाहाने दुसऱ्याच्या अंगातला कणन् कण सळसळला पाहिजे; एकाच्या अंतरंगातली स्वप्ने दुसऱ्याच्या अंतरंगात उमलली पाहिजेत; आणि एकाच्या डोळ्यांतले पाणी दुसऱ्याच्या डोळ्यांत लकाकले पाहिजे. थोडक्यात म्हणजे दोघांच्याही शरीरांत जीवनशक्तीचा एकच प्रवाह वाहायला हवा. या जीवनशक्तीच्या प्रवाहाबरोबर तुम्ही अतामीत हिंडा – वाटेल, तुमचे अनेक दिवसांचे हरपलेले श्रेय आज सापडले. आणि मग परस्परसहवासाच्या उन्मादाने तुमच्या अंतःकरणाचे कोपरेन् कोपरे धुंद होतील– आणि वर्तमानाच्या एका क्षणात युगन् युग एकवटेल! अतामीचे वातावरणच तसे आहे.

हा रस्ता पाहा! रस्त्याच्या काठच्या या दीपमाळा पाहा. येथे दिव्याच्या खांबावर एकुलता एक दिवा असहायपणे जळत नाही. येथे खांबाखांबाला दिव्यांचे तोरणच आहे. अगदी सप्तरंगी तोरण! आणि ही दुकानापुढची कागदी कंदिलांची रांग पाहा. एकेक कंदील म्हणजे रंगीत प्रकाशाचा ठेवाच! एकेका कंदिलात एकेक कविताच तेवत आहे. एकेका कंदिलावरची आकृती म्हणजे अचानक जाग आलेली कलाकृतीच! या दिव्यांच्या तोरणांनी आणि कंदिलांनी अतामीच्या रस्त्यांवर प्रकाशाचा उत्सव मांडला आहे! या उत्सवात जोडप्याने हिंडा – तुमच्या अंतरंगातली अनुरक्ती विजेच्या दिव्यातील केशरासारखी प्रज्वळेल.

कोणत्याही दुकानात शिरा. तुम्हा दोघांना पाहताक्षणीच तेथल्या मुलीच्या डोळ्यांत खुणेचे पाणी लकाकेल आणि तुम्हाला हव्या असलेल्या वस्तूला एकदम एक खास अर्थ प्राप्त होईल. तुम्ही साधी जिनतानची गोळी मागा – तिच्या

दृष्टीने ही गोळी एका गोड सुगंधित मीलनाची प्रेरक शक्ती ठरेल. तुम्ही सिग्रेटचे पाकीट मागा – तुमच्या मुखातून निघालेल्या धुराच्या वलयाबरोबर तुमच्या प्रियेची नजर कशी वेलांट्या घेईल ते तिच्या नजरेला दिसू लागेल. तुम्ही एखादे नियतकालिक घ्या – तुम्ही सिग्रेट पीत बिछान्यावर पडलेले आहात, तुमच्या शेजारी तुमची प्रिया आहे आणि ती ते बदामी डोळ्यांनी वाचीत आहे असे चित्र तिने केव्हाच रंगविलेले असेल. अतामीची दुकाने झाली तरी पैशाचाच व्यवहार करतात, पण त्या व्यवहारात प्रणयाच्या व्याकरणाच्या अनेक कारिका आहेत.

चालता चालता तुम्ही पाचिंकोच्या दुकानात शिरता! पाचिंकोच्या यंत्रात कथलाच्या गोळ्या उडवून नशिबाची परीक्षा पाहण्याचा हा खेळ तुम्हा दोघांनाही फार आवडतो. थोडा वेळ तुम्ही या यंत्राची कळ आळीपाळीने दाबून एकमेकांच्या नशिबाची एकमेकांवर मात करण्याचा प्रयत्न करता. पण लवकरच तुम्हाला याचा कंटाळा येतो. मग तुम्ही दुसऱ्या अशाच एका जुगारी खेळाच्या दुकानात शिरता आणि तेथली बुचाची बंदूक घेऊन तेथे वर्तुलाकार फिरणाऱ्या स्टॅण्डवरची वस्तू स्थानभ्रष्ट करून ती जिंकण्याचा खेळ खेळता. पण ही सोपी वाटणारी गंमत बरीच कठीण असते. लाकडाची बुचे सोन्याच्या भावाने विकत घेण्याचा हा बुडित खेळ लवकरच तुम्हाला कंटाळा आणतो, कारण जुगारी करमणुकीत आज तुमचे मन रमत नाही. तुम्ही स्वतःच एका जबरदस्त जुगारात अडकलेले असता ना! या नाजुक जुगाराचे धागे अंतरंगात गुंतत-गुरफटत असतात त्याचीच तुम्हाला अधिक गंमत वाटते. तुमचे अवघे अंतरंग बांधून टाकणारी ही गंमत, बाजारी जुगारात बुडवून टाकण्याची ही कल्पना तुम्हाला सहन होत नाही, नि पाचिंको-बिचिंकोच्या भानगडीपासून तुम्ही दूर जाता.

– आणि तुम्हाला आढळून येते की, तुम्ही आता अतामीच्या एका विलग, विश्रब्ध विभागात आला आहात, आणि या येथे हारीने उभ्या असलेल्या गल्ल्यांपैकी एकीत तुम्ही उभे आहात! या गल्ल्या म्हणजे आसावलेल्या अंतः-करणाची विश्रांतिस्थाने! अगदी शांततुष्ट स्थाने! येथे गडबड नाही, गर्दी नाही, झगझगाट नाही. येथला उजेड अंधुक आहे, वातावरण निभ्रांत आहे आणि दर्शन आश्वासक आहे. येथे तुम्ही एकमेकांना अगदी बिलगून चालता. आता एकाच्या शरीरातील सळसळीची गती दुसऱ्याच्या सळसळीत मिळून गेली

आहे, आणि एकाच्या भावनांचे स्पंदन दुसऱ्याच्या स्पंदनात विलीन झाले आहे. आता तुम्ही एका पावलाने चालता, एका नजरेने पाहता. चालता चालता एका पेयगृहापुढे तुमचे पाऊल थबकते. पेयगृहाच्या आवारातल्या अझेलिआच्या झुडपाने तुमची दृष्टी वेधते. इवलाले पक्षी होऊन त्याच्या गूढ विस्तारात गडप व्हावे असे तुम्हाला वाटते. तुम्ही एकदम अंतर्मुख बनता व क्षणभराने एकमेकांकडे मुग्ध दृष्टीने पाहता – मग तुमची तुम्हालाच गंमत वाटते आणि थोडे मजेदार हसून तुम्ही पुढे जाता. जरा वेळाने तुम्ही एका कॉफीगृहात शिरता. तेथे टेबलावर टेलिफोन असतो. तो पाहून तुमच्या डोक्यात एक मिस्किल कल्पना येते नि तुम्ही वेगवेगळ्या टेबलापाशी बसून एकमेकांच्या कानांत करावयाच्या गोष्टी टेलिफोनमधून करू लागता, पण ते अर्थात जमत नाही आणि ही बालिश गंमत तुम्ही आटोपता आणि बाहेर येता. जरा वेळाने एका पेयगृहाची किमोनो-कन्या तुमच्याकडे अपेक्षेने पाहते, पण लगेच तुमच्या नजरेवर तरळणारी स्वप्ने ओळखते आणि तुम्हाला बीअर-पानासाठी निमंत्रण करण्याऐवजी नुसते चोरटे हसते. तुम्ही पुढे जाता नि समुद्राच्या धक्क्यापाशी थांबता. धक्क्यावर आदळणाऱ्या लाटांच्या तुषारांनी तुमचे शरीर शहारते. तुम्ही एकमेकांना अधिकच बिलगता. पण सागराच्या दर्शनाने हललेले तुमचे मन एकदम तुमच्या वेगवेगळ्या घरी जाते. आता या क्षणी आपण असे एकमेकापासून दूर जावे याचा तुम्हाला धक्काच बसतो आणि तुम्ही एकदम भानावर येऊन म्हणता, ‘ चला— ’

तुम्ही पुनः त्या गजबजलेल्या रस्त्यावर येता, पण लगेच रस्त्यापलीकडे होता. आता तुम्ही ओढ्याकाठच्या वाटेवर आहात. तेथे एक झाड असते. झाडाखाली काळोख असतो. काळोखात एक अलिप्तता असते. त्या अलिप्ततेची आता तुम्हाला ओढ असते. त्या ओढीने तुम्ही झाडाखाली जाता. तेथून खालच्या गजबजलेल्या रस्त्यावरचे उधाण तुम्हाला दिसत असते. त्याचे रंग तुमच्या आता ओळखीचे झालेले आहेत. तेथल्या पावलांची लय तुम्हाला आता माहीत झालेली आहे. तेथल्या नजरेचे खेळ तुमच्या आता परिचयाचे आहेत. येथून दुरून ते पाहण्यात आता एक निराळीच गंमत आहे. त्यात असून नसल्याची गंमत ! तिचा आस्वाद घेत तुम्ही उभे राहता. तो आस्वाद घेताघेताच तुमच्या परस्पर आकर्षणाला अंतर्यामीच्या ओळखीचे स्वरूप येत आहेसे तुम्हाला

वाटते, नि तुम्ही म्हणता, ' चला जाऊ या आता परत. ' पण परत यायचे म्हणजे पुनः त्या भर रस्त्यावर यायचे. पण या रस्त्याकडे थोडे तिऱ्हाईतपणाने पाहण्यास तुम्ही आता शिकला आहात. आता त्याच्या निर्भर उत्सवाने तुम्ही वाहून जात नाही. पोहता पोहता लाटेशी खेळावे, लाटेवर डुलावे तसे खेळत–डुलत तुम्ही चालता. क्षणात तुम्ही त्या उन्मनस्क जीवनाच्या प्रवाहाशी एकरूप होता तर क्षणात तुम्ही तुमचे स्वतंत्र विश्व निर्माण करता. हे तुमचे विश्व म्हणजे अतामीच्या रस्त्यांतल्या आनंदोत्सवाचा एक तुकडाच – कधी तो अलग होतो तर कधी तो इतर तुकड्यांशी मिळून जातो, असा हा मीलनाचा आणि अलगपणाचा गोड लपंडाव खेळत तुम्ही हॉटेलात परत येता.

खोलीत येता पण दिवा लावीत नाही. सरळ जाता आणि सज्जातल्या सोफ्यावर जाऊन पडता. तिकडून समुद्राचा ओला खारा वारा येतो, त्याने तुमचे शरीर शहारते आणि तुम्ही एकमेकांना अधिकच बिलगता. बिलगता नि शांत पडून राहता. आता तुमची नजर खोलीभर फिरते. खोलीतल्या किरमिजी काळोखात मघाची दृश्ये आता एक नवेच सौंदर्य धारण करून आहेत. दारासमोरच्या पडद्यावरचा किरमिजी बगळा आता या काळोखात पार लोपून गेला आहे, पण त्याची स्मृती मात्र नजरेसमोर नाचत आहे. तोकोनोमातली ती दोन सूर्यफुले आता एकमेकांत मिळून गेली आहेत. तोकोनोमाच्या त्या रांगड्या खांबावरच्या रेषा आता दिसत नाहीत, पण त्याच्या वक्र वळणाला आता काव्याची लहर प्राप्त झाली आहे. खोलीतले सारे वातावरण आता असे लहरले आहे. वस्तू-वस्तूंतले भेद आता निमाले आहेत. या साऱ्यांची एक सलग आकृती जाणवू लागली आहे. दिवसाच्या उजेडात प्रत्येक वस्तूच्या स्वतंत्र सौंदर्यामुळे जी एकता लोपली होती ती आता आकारली आहे. या एकतेत विरून जाण्याचे विचार आता जोरावतात – आणि लक्ष अंथरुणाकडे जाते. अंथरुणाची ऊब अंतःकरणात शिरू लागते. इतक्यात समुद्राचा गार वारा येतो. अंग शहारते. जडावलेली दृष्टी पुनः एकदा टवटवते आणि बाहेर जाते. बाहेर आता निराळेच दृश्य असते : चमचमणाऱ्या हिऱ्यामाणकांचे दृश्य. अतामी शहराचे मघाचे झगमगलेले रूप आता या हिऱ्यामाणकांच्या विखुरलेल्या विस्तारात येऊन बसले आहे. लाल, निळ्या, हिरव्या, पिवळ्या हिऱ्यामाणकांच्या चमचमीने हे रूप आता रंगले आहे. एखादे

माणिक मध्येच प्रकाशते, मध्येच मंदावते. मध्येच एखाद्या गहिऱ्या रंगाची रेखा इकडून तिकडे आकृती कोरीत जाते – आणि गप्प होते. पलीकडे डोंगरावर एकच एक लाल तारा एकटाच प्रकाशत असतो – आपल्या उच्च स्थानाच्या दिमाखाने प्रकाशत असतो. मघाशी अतामीत जीवनोत्सव उसळला होता ना, त्याचीच आकाशात उडालेली ही प्रकाशपुष्पे! तुमची नजर त्यांच्यावर खिळते, क्षणभर ती अगदी निर्बोध बनते, पण मग लगेच तिला एक चाळा लागतो. यांपैकी कोणत्या पुष्पाचा अतामीच्या कोणत्या भागाशी संबंध असतो ते ती शोधू लागते. इतक्यात पावसाची सर येते. एक झिरझिरित पडदा पसरतो. त्याच्या आड काही माणके मालवतात, काही अंधुक बनतात, आणि जी अद्याप प्रकाशतात ती अधांतरी लोंबतात. त्यांचा अतामीशी असलेला संबंध तुटतो – आणि या ताटातुटीच्या जाणिवेनेच अतामीच्या त्या जीवनोत्सवाची आठवण अंगावर पसरते. पसरते पण पकडत नाही – कारण त्यातले अलिप्त, विश्रब्ध विश्व तुम्ही अनुभवलेले असते. त्याची मोहिनी वाढलेली असते. लवकरच त्याच्यात तुम्ही विलीन होता. तुमची व्यक्तित्वे एकमेकांत विरघळतात – आणि अनुभूतीची, मीलनाची जीवनज्योत त्यात तेवत राहते!

* * *

अतामी मी अशी जोडप्याने पाहिली नाही. अतामीचा अस्सल अनुभव मला नाही. आम्ही अतामीला दोघेजण आलो होतो, पण जोडप्याने आलो नव्हतो. जपानमधले एक स्वैर सुखाचे स्थळ दाखविण्यासाठी म्हणून पासीनने मला आणले होते. म्हणून अतामीत आम्ही आखडलेल्या वृत्तीने हिंडलो. बुद्धी आणि वृत्ती ताब्यात ठेवून हिंडलो. अर्थात अतामी आम्हाला निराळी दिसली. अतामीचा दीपोत्सव आम्ही पाहिला, पण त्याने आमची मने धुंद झाली नाहीत. आम्ही दुकानात शिरलो, पण तेथल्या मुलीच्या नजरेत ती ओळख आम्हाला दिसली नाही. त्या अंधुक उजेडाच्या गल्ल्यांत आम्ही शिरलो, पण कबुतरे बनून तेथल्या एखाद्या वळचणीत शिरावे असे आम्हाला वाटले नाही. त्या ओढ्याकाठच्या झाडाखालीही गेलो, पण तेथे ते विश्रब्ध विश्व गवसले नाही. उलट आम्हाला निराळीच दृश्ये दिसली. अमेरिकन नाविकांचा एक ताफा आम्ही पाहिला, पण त्याच्या हालचालींतला आवेग फासेपारध्याच्या आवेगासारखा वाटला. एका हॉटेलच्या प्रवेशद्वारातून युकाता परिधान

केलेल्या पुरुषांचा एक थवा गेटाला खडखडावीत बाहेर पडताना पाहिला— यातला एकही जोडप्याने आलेला नव्हता, पण अतामीची रंगत लुटण्याची ईर्षा प्रत्येकाच्या नजरेत दिसत होती. आता हे भाड्याने मिळणाऱ्या मैत्रिणी शोधणार, त्यांच्या संगतीत शरीराची आणि पैशाची शक्ती धुऊन काढणार आणि सोमवारी सकाळी रिकाम्या खिशाने आणि दमलेल्या देहाने टोकिओचा उद्योग ओढण्यासाठी निघून जाणार! आणि मग आम्हाला अशाच एका हॉटेलातून निघणारा मुलींचा ताफा दिसला! तरुण मुलींचा ताफा. टोकिओतली दुकाने आणि ऑफिसे हास्याने फुलवून टाकणाऱ्या मुलींचा ताफा! युद्धोत्तर जपानात मुक्त झालेल्या या मुली! नव्या स्वातंत्र्याचा साक्षात्कार घडविणाऱ्या या मुली! या येथे कशाला आल्या? त्या नुसताच हवापालट करणार! काळ, काम आणि वेग यांचा अपव्यय — केवळ अपव्यय!

अतामीच्या अंतरंगात डोकावून पाहण्याची इच्छा आम्हाला होत होतीच, पण त्यात गुरफटून जाण्याची आमची तयारी नव्हती. अनुभवाची ओढ होती, पण अनुभवाच्या डोहात बुडी मारण्याची हिंमत नव्हती. तळ्याच्याच काठाकाठाने हिंडावे, हळूच पाण्यात पाय बुडवावा आणि लगेच तो काढून घ्यावा, तसे आमचे चालले होते. आम्ही एका पेयगृहात गेलो. पेयगृहाच्या मालकिणीनेच (ममासाननेच) आमचे स्वागत केले. ती आमच्या टेबलाशी येऊन बसली, गप्पा मारू लागली, चेष्टाविनोद करू लागली. तिने तिशी ओलांडली होती, पण विशीचे पाणी झळाळत होते. आम्ही उठलो, बिले देऊ लागलो तेव्हा 'नको नको' म्हणू लागली. प्रथमच भेटलेल्या भारतीयांकडून बिल घेऊ काय, असे विचारू लागली. अखेर तिने बिल घेतलेच, पण पुनः येऊन तिचे पाहुणे म्हणून प्याले पाहिजे असे बजावले. पण आम्हीच उलट तिला दुसऱ्या दिवशी दुपारी चहापानाचे निमंत्रण दिले. ती आली, तास–दीड तास बसली, गप्पा झाल्या, फराळ झाला — नि एकदम फोन आला म्हणून निघून गेली! आम्हाला दिलेले बीअर-पानाचे निमंत्रण कोटच्या कोठे उडून गेले!

संध्याकाळी आम्ही समुद्रकाठाने फिरत होतो. समोर एक कुटुंब चालले होते. बाप, आई, सात-आठ वर्षांचा मुलगा आणि सतरा-अठरा वर्षांची मुलगी. आम्ही बोलत होतो, रमत होतो, स्वतःशीच चुस्त होतो. इतक्यात पासीन म्हणाला 'समोर पाहा.' पाहिले तो ती मुलगी मागे वळूनवळून आमच्याकडे पाहत होती

एकदा तिची माझी नजरानजर झाली तेव्हा हळूच हसली—अगदी ओळख असल्या-सारखी हसली. मी गोंधळलो, गडबडलो आणि आमचा रस्ता बदलला म्हणून बचावलो ! पण अतामीचे जग एवढेसे. आम्ही एका दुकानात उभे होतो तो ते कुटुंब तेथ आले. तिने पुनः पाहिले, ती पुनः हसली. मी म्हटले, 'हॅलो' ती म्हणाली, 'हॅलो.' मी विचारले, 'तुला इंग्रजी येते ?' ती म्हणाली, 'होय, आम्हाला शाळेत इंग्रजी शिकवितात.' मग तिने विचारले, 'आपण भारतीय आहात ?' मी म्हटले, 'हो.' ती म्हणाली, 'मी रवीन्द्रनाथ टागोर वाचला आहे.' मी म्हटले, 'अस्सं ! छान.' ती म्हणाली, 'तुम्ही आमच्या घरी याल ?' मी म्हटले, 'तुझं घर मला कसं सापडणार ? – तूच येऊन आम्हाला घेऊन जा.' पण ती काही आली नाही; तिने पत्ता सांगितला होता, तो आम्ही लक्षात ठेवला नाही.

नंतर आम्ही त्या ओढ्याच्या काठाने हिंडत होतो. एक छोटे, दोन-अडीच वर्षांचे मूल रडत होते. त्याची आई त्याला उगी करण्याचा प्रयत्न करीत होती. पण त्याचे भोकाड काही मिटेना. माझ्या मनात एकदम एक कल्पना तरळली. मी खिशातून जिनतानची बाटली काढली. त्यातली एक गोळी घेतली. त्या मुलाच्या उघड्या तोंडात टाकली. ते मूल एकदम थबकले. त्याचे रडे एकदम थांबले. क्षणभर त्याचा चेहरा चमत्कारिक झाला. डोळ्यांतून अश्रू वाहतच होते, पण तोंडून हसू फुटतेसे वाटले. त्याची आई माझ्याकडे समाधानाने, कृतज्ञतेने पाहू लागली. मी तिच्या डोळ्यांतले भाव न्याहाळू लागलो. पण ती काही बोलू शकत नव्हती. मीही काही बोलू शकत नव्हतो. क्षणभर आम्ही एक-मेकांकडे नुसते पाहतच राहिलो. (अतामीच्या जीवनाची झुळूक अंगावरून जात आहेसे वाटले !) पण पासीन तिच्याशी बोलला आणि ती आपल्या करकरीत खोबऱ्यासारख्या आवाजात हसली. तिचे मूल मजकडे पाहत राहिले – आणि मी त्याच्या तोंडात जिनतानच्या दोन गोळ्या टाकल्या. त्याबरोबर ते हसले, खुदकन हसले. इतक्यात आणखी तीन-चार मुले तिथे गोळा झाली. माझ्या भोवती मुलांचा एक गराडाच पडला. मी जिनतानची बाटली काढली, उघडी केली आणि एकेकाच्या तोंडात गोळ्या टाकीत सुटलो ! त्याबरोबर ती मुले हसू लागली, नाचू लागली, उडू लागली. पलीकडे अतामीच्या त्या रस्त्यात सुखास्वादाचा भर आला होता, आणि इकडे मी वात्सल्यरसात डुंबून गेलो होतो. माझी मलाच

गंमत वाटली. अतामीला आलो – आणि अतामीच्या प्रवाहात एक वेगळाच हात मारू लागलो!

जरा वेळाने आम्ही पुस्तकाच्या दुकानात शिरलो. तेथे एक वृद्ध प्रोफेसर भेटला. पासीन त्याच्याशी जपानीमध्ये बोलू लागला आणि मी फक्त त्याच्या कपाळावरच्या सुरकुत्यांकडे आणि चष्म्याच्या जाड भिंगांपलीकडे चमकणाऱ्या डोळ्यांकडे पाहत राहिलो. पासीनने सांगितले की, प्रोफेसर-मजकूर अतामीच्या स्वैराचारी जीवनाचा अभ्यास करीत आहेत; अतामीच्या बेताल जीवनाने त्यांच्या जिवाचा संताप झालेला आहे; आणि त्याची त्यांना लाज आलेली आहे. अतामीच्या चैनीवर त्यांचा आक्षेप नाही. कोणत्याच जपान्याचा नाही. अतामीची चैन फार पूर्वीपासून चालत आलेली आहे. पण अतामीच्या चैनीला आज जे भरड स्वरूप आले आहे, बाजारी स्वरूप आले आहे त्याने ते बेजार झाले आहेत. अतामीच्या स्वैराचारात पूर्वी जपानी संस्कृतीचा मोठा सुंदर आविष्कार होता, आता फक्त अमेरिकन सोजिरांनी आणि नाविकांनी आणलेला पाचकळपणा आहे. अतामीची हॉटेले म्हणजे अतिथिगृहे होती, आता ती नफेबाजीची आगरे बनली आहेत आणि टोकियोचे अनेक तरुण त्यांच्या कर्जात खितपत आहेत. अतामीच्या स्वैराचारात पूर्वी नृत्य-संगीताला महत्त्वाचे स्थान होते, आता तो नुसता विषयोपभोग बनला आहे. गेशांच्या हातांतल्या पंख्यांच्या विभ्रमांवर पूर्वी प्रणयाचे काव्य लहरत असे, आता त्यांच्यावर नुसता पैसा नाचतो आहे. एकेकाळी नग्नता नुसती स्नानगृहात होती, आणि तेथे ती विनम्रतेने शोभत होती, आता ती निर्लज्जपणे चवाठ्यावर येत असते. (वेश्यांच्या वस्तीत जा– अमेरिकन सोजिरांचा अनुनय करीत ती रस्त्यावर आलेली आढळेल.) तो युकाता घालून हिंडणाऱ्या पोरींचा ताफा पाहा! पूर्वी या पोरी अशा इकडे आल्या असत्या तर त्यांच्या आईबापांनी तिकडे आत्महत्या केली असती. खरोखर अतामीची आज विलक्षण विटंबना सुरू आहे. निसर्गाने अतामीला सौंदर्याचे वरदान दिलेले आहे, ते त्याची अशी विटंबना करण्यासाठी काय?

प्रोफेसर-मजकुरांच्या आवाजात आवेग आला होता. युद्धोत्तर कालात जपानमध्ये जो बदल झाला होता तो त्यांना सहन होत नव्हता – पण त्यांच्या संतापात सत्य होते, तथ्य होते!

आम्ही हॉटेलवर परत आलो तेव्हा प्रोफेसर-मजकुरांच्या मनोव्यथेचा अंमल आमच्यावर अद्याप होता. मी खिडकीतून बाहेर नजर टाकली, अतामीच्या अंतराळात हिऱ्यामाणकांची माया पसरलेली होतीच, पण काल तिने माझ्या नजरेसमोर सौंदर्याची इंद्रफुले फुलविली होती तशी ती आता फुलवू शकत नव्हती–

सकाळी उठलो, बाहेर नजर टाकली नि चकित झालो. अतामीचा आता पार कायापालट झाला होता. कालचे ते यक्षनगरीचे रूप कोठच्या कोठे उडाले होते. चैतन्याची ती इंद्रफुले कोमेजली होती. अतामी आता आळशी, फिकट, रुक्ष दिसत होती. विटके रंग आणि सुतकी कळा यांचाच पसारा पसरला होता. रस्ते ओके, उघडे, वाळीत टाकल्यासारखे होते. दुकानांवरच्या निऑन-लाइटचे सांगाडे आता विकट दिसत होते. आणि रुटुकुटू घरांची करपट छपरे आता डोळ्यांना खुपत होती. समोरच्या डोंगरावरची कसल्याशा धर्मपंथाची अवाढव्य इमारत एखाद्या तुरुंगासारखी भासत होती. मला आत अगदी उदास उदास वाटले. इतक्यात समुद्रावर सूर मारीत निघालेल्या एका मोटर लॉंचची कर्कश किंचाळी कानांत शिरली आणि आतले धागे तटातट तोडीत कोठे तरी निघून गेली.

तास-दीडतासांनी आम्ही परत यायला निघालो. आमच्याप्रमाणे अनेक निघाले. रस्त्यांत मोटरींची गर्दी माजली, आणि तिच्यात आमची मोटर अडकली. – अतामीच्या वाटेत भररस्त्यावर एक चिडाचे झाड चमत्कारिक पसरले आहे, तेथेच अडलो. ते झाड म्हणजे एक रूप होते – खरे म्हणजे विद्रूप ! बुंधा वटलेला, खोड निब्रट आणि विस्तार सुकटलेला. बुंध्याचे खोड म्हणजे एखाद्या 'मॉडर्निस्ट' शिल्पकाराच्या प्रतिभेचा संतप्त उद्रेक ! आणि त्याचा विस्तार अतामीकडे बघून जणू विकट हास्य करीत होता. तरी अतामीच्या लोकांना त्या झाडाचे कोण कौतुक ! त्यांनी त्याला एक सुंदर पार बांधला होता. त्याच्यावर एक स्मृतिशिला उभारली होती. होती आपली शिळी, शेवाळलेली. पण स्मृतिशिला ! जपानमध्ये वाङ्मयसेवकांच्या स्मृतिप्रीत्यर्थ अशा शिला उभारतात हे मला माहीत होते. हैकू काव्याचा प्रणेता मात्सुओ बाशो याच्या एकट्याच्या नावाने अशा दोन हजार शिला आहेत. अशा शिला उभारण्यासाठी एखाद्या सौंदर्यस्थळाची निवड करतात हेही मला माहीत होते. अतामी सुंदर खरीच,

पण चिडाचे हे ध्यान म्हणजे काय सौंदर्यस्थळ ? मला काही समजेना ! मी पासीनला विचारले, " ही कोणत्या वाङ्मयसेवकाची स्मृती ? "

" वाङ्मयसेवकाची नाही, वाङ्मयाला स्फूर्ती देणाऱ्या एका घटनेची, " पासीन उत्तरला.

" घटनेची ? "

" ती एक मोठी कथा आहे, सत्यकथा ! अलीकडच्या काळातलीच. पन्नास-साठ वर्षांपूर्वीची. या अतामी गावात ओमिया नावाची एक सुंदर मुलगी होती. उच्च कुळात जन्मलेली. तिचे हारामा कानिची नावाच्या एका मुलावर प्रेम बसले. मुलगा अतिशय सालस, सुस्वभावी, पण अत्यंत दरिद्री. स्वतःचे शिक्षण पुरे करण्याइतकाही पैसा त्याजपाशी नव्हता. त्याच्याशी लग्न करण्याची आशा धरणे म्हणजे मृगजळात मधुचंद्राची मौज लुटण्याची आशा धरण्यासारखे होते. इतक्यात ओमियाला एका श्रीमंत कुटुंबातून मागणी आली. आपल्या श्रीमंतीचा आपल्या प्रियकराच्या शिक्षणासाठी उपयोग करता येईल या कल्पनेने तिने या मागणीस होकार दिला आणि कानिचीला हे कळविण्यासाठी या झाडाखाली तिने त्याची भेट घेतली. कानिचीने ते ऐकले आणि रागाने तो वेडापिसा झाला. श्रीमंतीच्या लोभाने तिने आपल्या प्रेमाचा हा विश्वासघात केला, असे नाही नाही ते आरोप त्याने केले. त्यांचे भयंकर भांडण झाले आणि त्यांनी एकमेकांचा कायमचा निरोप घेतला. कानिचीच्या अंतःकरणात आता पैशाविषयी द्वेषाचा डोंब निर्माण झाला. पैशावर, संपत्तीवर सूड घेण्याचा निश्चय त्याने केला. त्याची सूडाची कल्पना मोठी अजब होती. तो पैशाच्या मागे लागला, सावकार झाला, आणि कुळांना त्याने छळछळ छळले.

" जपानमध्ये या घटनेवर अनेक कथा, कादंबऱ्या, कविता झाल्या आहेत, " पासीन पुढे सांगू लागला, " एका कादंबरीचे नाव ' प्रेमाचा सैतान ' असे आहे. "

प्रेमाचा सैतान !

आज अतामीची आठवण झाली की मला ते अतामीच्या वाहतुकीला वाकुल्या दाखविणारे चिडाचे झाड आठवते आणि त्याच्या पारावरच्या स्मृतिशिलेवर ' प्रेमाचा सैतान ' ही अक्षरे दिसू लागतात !



# चिडाचा वृक्ष

अतामीत शिरतानाच एक पाइनवृक्ष (चीड) तुम्हाला वाटेत मधोमध अडवितो. जपानी चीड सरळ उभा वाढत नाही. बाभळीच्या झाडासारखा तो वेडा-वाकडा वाढतो आणि म्हणूनच त्याला 'ट्विस्टेड पाईन' म्हणतात. हा वृक्ष चांगला अस्ताव्यस्त वाढला होता. त्याच्या फांद्या रस्त्यावर आडव्यातिडव्या पसरल्या होत्या आणि त्यांचा रहदारीला भरपूर अडथळाही होत होता.

अतामीत येणारा रस्ता एका टेकडीवरून उतरतो. तो निरुंदच आहे, आणि मोटर कदाचित डावीकडे झुकली तर तिला एकदम समुद्रमोक्ष मिळण्यास कसलीच अडचण पडणार नाही. म्हणून अतामीत उतरताना डोंगराच्या कुशीत बसलेल्या त्या शहराच्या नक्षीदार सौंदर्याने मन हरवून जाण्याऐवजी

संभवनीय समुद्रमोक्षाच्या विचाराने ते थरकतेच. त्यातून मुक्त होऊन मन स्थिरस्थावर होण्यापूर्वीच हा जंगली अडथळा समोर येतो. त्याला वळसा घालताना आमच्या टॅक्सीला चांगलाच गचका बसला.

मी पासीनला म्हटले, " हे लोक हा वृक्ष तोडून का टाकीत नाहीत ? "

" नो नो नो ! " जपानी जीवनाविषयीचे आपले सारे प्रेम आपल्या आर्त स्वरात ओतीत माझा अमेरिकन मित्र उत्तरला, " तुला माहीत नाही या वृक्षाचं माहात्म्य. जपानी वाङ्मयात उजळलेल्या एका प्रेमकथेचा प्रारंभ या झाडाखाली झालेला आहे. जपानी लोकांचं हे मोठं अभिमानाचं ठिकाण बनून राहिलं आहे. हे झाड तोडण्याची नुसती भाषादेखील हे लोक ऐकून घेणार नाहीत. "

संध्याकाळी आम्ही फिरायला निघालो. अतामी शहरातून हिंडणे म्हणजे जत्रेतून हिंडण्यासारखेच आहे. शनिवारी-रविवारी अतामीला प्रणयपंढरीच्या जत्रेचेच स्वरूप येते. जपानी हॉटेलांनी दिलेले रंगीबेरंगी किमोनो घालून अतामीला आठवड्याची सुट्टी घालविण्यासाठी आलेले मित्र आणि मैत्रिणी रस्त्यावर फिरू लागल्या म्हणजे ते शहर फुलपाखरांनी फुलून गेल्यासारखे वाटते.

प्रणयाच्या आंदोलनावर हेलावत जाण्याचा आनंद सोडा, पण नुसता नेहमीचा फेरफटका करण्यासाठीही अतामीसारखे दुसरे ठिकाण कुठे असेल असे वाटत नाही. अर्धचंद्राकृती टेकड्यांच्या वळशात वसलेल्या या निसर्गसुंदर शहरावर कलात्मक साज चढविण्याची दक्षता जपान्यांनी घेतलेली आहे. म्हणून अतामीत हिंडताना आपण एखाद्या कविकल्पनेतील उद्याननगरात तर अवतीर्ण झालो नाही ना असे वाटत असते.

हिंडता हिंडता आम्ही त्या चिडाच्या झाडापाशी आलो. आपली प्रेमकथा उजवण्यासाठी त्या प्रेमिकांनी या विक्षिप्त झाडात इतके काय पाहिले न कळे, पण याचा अधिक विचार करायला पासीनने मला अवसरच दिला नाही. तो समुद्राकडे जाण्यासाठी उजवीकडे वळला आणि आम्ही एका काहीशा विश्रब्ध वस्तीत शिरलो. येथील रस्त्याच्या कडेने सौम्य प्रकाशाचे कलासुंदर दिवे उजळत होते. दिव्यांच्या शेड्स् दिवाणखान्यातील शेड्ससारख्या कलात्मक होत्या. येथल्या दुकानदारांनी दीपोत्सवाच्या झगमगाटाने गिऱ्हाइकांचे डोळे दीपविण्याची धडपड केलेली नव्हती. उलट त्यांच्या अंतःकरणात शिरून त्यांना अंतःस्थ ओढ लावण्याची त्यांची खटपट होती. म्हणून प्रवेशद्वारात

दिव्यांची आरास नव्हती तर हिरव्या फुलझाडांची पखरण होती. सताड उघड्या दरवाजांची हाक नव्हती तर किलकिल्या दारांची सांकेतिक सूचना होती.

ही दुकाने म्हणजे उपाहारगृहे, पेयगृहे आणि क्वचित क्रीडागृहे. या गृहांचे सौम्य सुगंधित सौंदर्य पाहत एका रस्त्यावरून मी आणि पासीन हिंडत होतो; इतक्यात एका छोट्याशा पेयगृहासमोर एक जपानी तरुणी रंगदार किमोनो घालून उभी असलेली दिसली. आम्ही तेथून जाऊ लागलो तेव्हा ती जपानी भाषेत काही तरी म्हणाली.

" काय म्हणते आहे ती ? " मी पासीनला विचारले.

" बीअर हवी का असं विचारते आहे, " पासीन उत्तरला.

" नको बुवा बीअर वगैरे " असे मी म्हटले आणि आम्ही पुढे निघालो.

पण त्या स्त्रीचा विचार मनातून जाईना. तिच्या दर्शनात काही एक विलक्षण आकर्षण होते. ज्याचे वर्णन केवळ जपानी असे मी करीन असे ते होते. मी एकदम थांबलो आणि पासीनला म्हटले,

" मला वाटते थोडी घेऊ या बीअर. "

आणि आम्ही परत फिरलो.

त्या दुकानापाशी आल्याबरोबर त्या बाईने हसून आमचे स्वागत केले आणि एका हाताने स्प्रिंगचा दरवाजा लोटून आम्हाला आत चला म्हटले.

हसल्याबरोबर तिचा सोनेरी दात चमकला. तिच्या रेखीव, शुभ्र, सुबक दंतपंक्तीत एवढाच एक दोष आढळला. पण जपानी लोक ते सौंदर्याचंच एक लक्षण मानतात. जपानमधले बरेचसे सोने स्त्रीच्या तोंडात जाऊन बसले होते.

गुलाबी रंगाचा किमोनो तिने घातला होता. त्याच्यावर .जांभळ्या द्राक्षवेलींची नक्षी होती. तिची ओबी गुलाबी होती आणि पांढऱ्या स्वच्छ टाबीवरच्या तिच्या झोरीचे पट्टे जांभळेच होते.

वेधक रंगसंगतीच्या पोशाखातली तिची मूर्ती खरोखर सुबक दिसत होती. जपानी स्त्रियांचे गाल गोबरे असतात आणि पाय-पावले बोजड असतात; पण ही मात्र याला अपवाद होती. तिची लहानशी शरीरयष्टी काहीशी किरकोळ होती आणि चेहरा हाडकुळा चौकोनी पण विलक्षण आकर्षक होता. तिची मान



निळसर
डोळ्यांची
तरल
हालचाल

जरा उंच होती, पण किमोनोच्या कॉलरने ती काहीशी झाकली होती आणि खाली रुळणाऱ्या तिच्या कुरळ्या केसांमुळे तिला खरोखर एक सौंदर्यच प्राप्त झाले होते. जपानी स्त्रियांचे आकुंचित बदामी डोळे गोबऱ्या गालांमुळे आवळले जातात. पण हिच्या डोळ्यांना हा त्रास होण्याचे कारण नव्हते. तिच्या डोळ्यांच्या निळसर बाहुल्या मोठी तरल हालचाल करीत. या हालचालीं-बरोबर फडफडणाऱ्या तिच्या पापण्यांची फडफड पाहण्यात, आपण एका स्त्रीच्या चेहऱ्याकडे टक लावून बघत आहोत याचा विसर पडे. अशी जाणीव झाली की माझी नजर चोरटी बने आणि ती अभावतःच खाली वळे – आणि मग तिची पावलेदेखील तिच्या चेहऱ्याप्रमाणेच सुंदर आहेत हे ध्यानात येऊन आनंद वाटे.

आम्हाला टेबलापाशी बसवून तिने आमची किंचितशी चौकशी केली आणि बीअरची बाटली आणण्यासाठी ती उठली. तो बार अगदी छोटा होता. एक लहानसे वाटोळे टेबल, भोवतालच्या तीन खुर्च्या आणि कौंटरपासची दोन उंच स्टुले तेथं कशीबशी मावली होती. पण तेवढ्याही जागेत खुजट चिडाची एक कुंडी ठेवण्याची दक्षता तिने बाळगली होतीच. माझे लक्ष समोर भिंतीकडे गेले. भिंतीवर अभिजात जपानी पद्धतीने काढलेले अभिसारिकेचे एक रेखाचित्र होते. माझी नजर जरा बाजूला वळली आणि त्या बारच्या एका वैशिष्ट्याची जाणीव झाली. बाजूला एक अगदी छोटेखानी जिना वर जात होता.

तिने बीअरची बाटली आणली आणि दोन ग्लास भरले. आम्ही तिला आणखी एक ग्लास आणण्यास सांगितले. ती हसली, गेली आणि एक ग्लास व खाऱ्या दाण्यांनी भरलेली एक बशी घेऊन आली. मी खुर्चीकडे बोट दाखविले आणि ती बसली.

तिच्याशी बोलणे मला मुष्किल होते. तिला इंग्रजीचा गंध नव्हता आणि माझे जपानीचे ज्ञान, ज्याचा नीटसा अर्थ मला माहीत नव्हता अशा एका शब्दापुरते मर्यादित होते. पण ती माझ्याशी बोलण्यास उत्सुक दिसली, आणि सुदैवाने दुभाष्याचे काम करण्यास पासीन हजर होता. एका जपानी स्त्रीशी बोलण्याची अशी का होईना पण संधी मिळाली म्हणून मी खुलून निघालो.

" आपल्या घरी एक भारतीय पाहुणा आला म्हणून तिला धन्य वाटत आहे, " पासीन म्हणाला.

" घरी ?" मी विचारले आणि पासीनने भाषांतर केले.

" होय– हे घरच आहे माझं " ती उत्तरली आणि जिन्याकडे पाहत म्हणाली, " मी येथं वर राहते. "

" मग रोज तुमच्याकडे खूप पाहुणे येत असतील ? "

" होय – खूप ! माझ्याकडे जपानी व अमेरिकन खूप येतात, खूप पितात आणि तेच तेच खूप बोलतात. पण भारतीय पाहुणा असा आज प्रथमच आला आहे. "

" मग कसा वाटला हा पाहुणा ? " दुभाष्यामार्फत बोलताना आपण अधिक मोकळे बनतो.

" वा ! फार छान – वाघासारखा. " ती बोलली आणि एकदम हसली. म्हणाली, " तुमच्या देशात खूप वाघ असतात ना ? "

" होय, पण जंगलात. ते असे जपानला येऊन बीअर पीत नाहीत. "

पण तिच्याशी एका शब्दातून दुसरा शब्द, जादूगार रुमालातून रुमाल काढतो त्याप्रमाणे काढून संभाषण वाढविणे दुभाष्यामार्फत कठीण होते. माझी अगतिकता झाकण्यासाठी मी आणखी एक बाटली मागविली आणि ती दोन घेऊन आली.

नंतर मी तिला रोज किती गिऱ्हाइके येतात, किती वेळ बसतात, त्यातली काही चाळे करतात किंवा काय असले प्रश्न विचारले. त्यावर ती म्हणाली,

" होय, एक बाईमाणूस हा बार चालविते म्हणून या दारूच्या बाटल्यांमागे दुसराच काही धंदा असेल या कल्पनेनं काही लोक भारले जातात. मग ते उठतच नाहीत. सारखे पितात, झिंगतात, मला पिण्याचा आग्रह करतात. अशा वेळी त्यांना बाहेर काढणं मोठं मुष्किलीचं ठरतं. " मी भरलेला ग्लास तोंडाला लावीत ती पुढे म्हणाली, " एकदा एका अमेरिकन नाविकानं सकाळी चार वाजेपर्यंत घोळ घातला. "

" तुम्ही रोज केव्हा बंद करता ? "

" सुमारे दोन वाजता. रोज नाही, शनिवार रविवारी. आमच्या या अतामीत शनिवारी-रविवारीच साऱ्या गोष्टींना भर येतो, इतर दिवशी अगदी ओहोटी. मग अगदी आळस येतो. "

" गावात कोणी मित्र-मैत्रिणी नाहीत का ? "

" मित्र – ? " तिचा आवाज जरा जड वाटला. " आमच्या अतामीत सारे मित्र आणि मैत्रिणी कामापुरत्या. कुटाळक्या करण्यास त्यांचा फार उपयोग होईल. या अतामीत खरी मैत्री सुरू केली की माणूस गोत्यात येतं – कारण मैत्री, प्रेम, सारं काही स्वार्थासाठीच. "

माझ्या मनात विचार आला, ही जी आता आमच्याशी मैत्री करीत आहे ती आमच्या खर्चाने बीअर पिण्यासाठी तर नव्हे ना ?

पण तिची नजर एकदम तरारली आणि तो विचार लगेच मावळला. माझ्या मनातला विचार तिथल्या तिथेच निपटून काढण्यासाठी की काय, मी घाईने म्हटले,

" पण आपली मैत्री अशी नाही हं. "

" छे छे– " ती उत्तरली, " म्हणून तर मी तुमच्याबरोबर अशी पीत बसले आहे. "

" मग तुम्ही ही मैत्री दृढ केली पाहिजे, " मी म्हणालो, " उद्या दुपारी तुम्ही आमच्याकडे चहा प्यायला नि गप्पा मारायला आलं पाहिजे. "

" येईन की, " ती क्षणाचाही विचार न करता म्हणाली.

पासीनने तिला आमचा पत्ता सांगितला आणि आम्ही जायला निघालो. तेव्हा ती म्हणाली,

" एक विचारू का ? "

" हो हो. "

" तुमचं नाव काय ? "

" पाध्ये. "

" नाव की आडनाव ? "

" आडनाव. "

" अन् तुमचं नाव ? "

" प्रभाकर – आणि तुमचं ? "

" माझं – उमेको " असे ती म्हणाली आणि संकोचली.

मी विचारले, " का ? "

" इतकं सुंदर तरल नाव मला शोभत नाही. "

" माझंही नाव मला शोभत नाही – पण मी तुम्हाला आमच्या भारतीय पद्धतीनं उमा म्हणेन. "

आणि आम्ही बाहेर पडलो.

* * *

आमचे हॉटेल गावाच्या एका टोकाला टेकडीवर होते. त्या हॉटेलातून सारे अतामी गाव एका दृष्टिक्षेपात दिसे. सकाळी उठून मी खोलीचा कागदी दरवाजा बाजूला सरकविला आणि माझी नजर एकदम सबंध गावावर फिरली आणि फिरता फिरता उमेकोचे घर शोधू लागली. अंदाजाने एक घर तिचेच असेल असे ठरविले. घर झोपेत गुंग दिसले. रविवारी सकाळी आठ वाजता सारे अतामी शहरच झोपेच्या गुंगीत संथ जड दिसते. घरे, दुकाने बंद होती आणि रस्ते रिकामे होते. समुद्राच्या लाटा धक्क्यावर जाऊन फुटत होत्या, पण त्यांचा आवाज दुरून ऐकू येत नसल्यामुळे त्यांच्या हालचालीत एक निर्जीव गुंगीच प्रतीत होत होती. दूर टेकडीवर दमट धुके आळसाचे आळोखे देत होते. पूर्वेकडील आकाशात सोनेरी कडांचे फिकट काळे ढग जमा झाले होते आणि सूर्यप्रकाश मंद मळभी भासत होता. माझ्या अर्धजागृत दृष्टीला अतामी सुस्त, निद्रिस्त वाटली. वाटले, उमेको आता साखरगुंगीत मग्न असेल – स्वप्नं पाहत असेल. पण लगेच तिची कालची नजर मला आठवली आणि वाटले, या मोकळ्या आनंदी स्त्रीच्या जीवनात काहीतरी रहस्य आहे, जीवन जाळणारे रहस्य आहे. ह्या विचाराने तिच्याबद्दल एक नवाच जिव्हाळा मला वाटू लागला. ती आवडू लागली. तिची ओळख झाली हा योगायोग अर्थपूर्ण वाटू लागला. तिच्या भेटी-बद्दल औत्सुक्य वाटू लागले – आणि या औत्सुक्यापोटीच शंका निर्माण झाली की, आज दुपारी ही येईल याची खात्री काय ?

पण बरोबर तीन वाजता ती आली. तिच्याबरोबर दुकानात कौंटरमागे पाहिलेल्या दोन मुलींतली एक होती. आम्ही त्यांचे स्वागत केले. चहा मागविला. फराळाचे जिन्नस मागविले. ती अगदी खुशीत दिसली. सुशीवर तिची विशेष

भक्ती दिसली. तिने ती पुनःपुन्हा मागावून खाल्ली. आपला हा मोकळेपणा जरा चमत्कारिक भासतो असे तिचे तिलाच वाटल्यामुळे की काय, ती म्हणाली,

" आज मला खूप खूप आनंद झाला आहे. कारण मी आज परकीय मित्रांत आहे. परकीयांत मिसळून असं गप्पा मारायला मला फार आवडतं. शिवाय येथे एक भारतीय बाव आहे. " असे म्हणून ती खट्याळपणे हसली.

" पण तुमच्या दुकानात परकीय लोक नेहमीच येतात ? "

" होय, पण त्यांची गोष्ट निराळी, आणि दुकानात मी अशी मोकळी नसते. "

तिचा आवाज मला पुनः आर्त भासला. खास तिच्या जीवनात कसले तरी नाजुक रहस्य आहे, आपण ते शोधलेच पाहिजे असा निश्चय केला आणि म्हटले,

" आम्हा भारतीय लोकांना हस्तसामुद्रिक चांगलं कळतं हे माहीत आहे का तुम्हाला ? "

त्याबरोबर तिचे निळे डोळे प्रकाशले. ती आतुरतेने म्हणाली,

" वा ! वा ! तुम्ही हात पाहता ! किती छान ! माझा हात पाहाल ? पाहाना माझा हात – " असे म्हणून तिने आपला हात उघडला आणि माझ्यासमोर धरला.

तिचा हातसुद्धा नाजूक आणि गोंडस होता. हा व्यक्तित्वपूर्ण स्त्रीचा हात आहे हे तो पाहताक्षणीच कोणाच्याही ध्यानात आले असते. पण विशेष म्हणजे तो हात विलक्षण ओढ लावणारा होता. मी एकदम त्याच्या तळव्यावरून माझ्या माझ्या हाताचा तळवा फिरविला. त्या तळव्याचा रेशमी स्पर्श माझ्या मनाला स्पर्श करतो तोच ती खुदकन् हसली. मागे घेतलेल्या हाताची बोटे तिने आता चांगली ताणली, एकत्र जुळविली आणि हात पुनः माझ्यापुढे धरला.

मी म्हटले, " या हाताची मालकीण फार मोठी कर्तबगार स्त्री आहे. "

" कर्तबगार ! होय, आहेच मी कर्तबगार, " ती खट्याळ आवाजात म्हणाली. " त्याशिवाय का उत्तरेकडील होकायडोच्या एका खेड्यातील दरिद्री शेतकऱ्याच्या कुटुंबात जन्मलेली ही मुलगी आज दक्षिणेत स्वतःच्या मालकीचा बार चालवीत असेल ? कर्तबगार आहेच मी – पण ते मला माहीत आहे. मला माहीत नसलेलं काही सांगा. "

पण मी काय सांगणार ? हस्तसामुद्रिक मला थोडेच समजत होते ? भाग्यरेषा-धनरेषा-विवाहरेषा असल्या, सर्वांच्या परिचयाच्या, गोष्टी ठोकताळ्याने माहीत होत्या. पण आपले अज्ञान दाखविण्याची ती वेळ नव्हती. मी म्हटले,

" हे शनीचं वलय पाहिलंत. त्याला दोन-तीन ठिकाणी छेद गेले आहेत. तुमच्या आयुष्यात आजवर दोन अरिष्टांतून तुम्ही गेला आहात. "

तिची नजर एकदम लकाकली. आपल्याला एक अचूक सांगणारा सामुद्रिक भेटला या आनंदाने फुलली. म्हणाली,

" बरोबर, अगदी बरोबर. " तिच्या आवाजात विश्वास होता आणि अपेक्षाही होती. " एकदा मी घर सोडून आले तेव्हा आणि एकदा माझा धंदा बुडाला तेव्हा. "

ही आता माझ्या ज्ञानाचा पडताळाच घेऊ लागली की ! आता सावध. मी विषयांतर करण्यासाठी म्हणालो,

" धंदा केव्हा बुडाला ? युद्धकालात ? "

" इतकी म्हातारी समजता की काय मला ? युद्धकालात मी माझ्या खेड्यात होते. पण तिसरं अरिष्ट म्हणता ते कोणतं ? "

" छे छे ! ते धंद्यावर नव्हे. ही पाहा, हे वलय छेदले आहे तेथूनच धनरेषा स्वच्छ गेली आहे. तेव्हा पैशाची धास्ती नाही. पण– "

" पण काय ?– "

पण काय ते मला कोठे माहीत होते ? मात्र आता माघार घेणे शक्य नव्हते. गंभीर आवाजात मी म्हटले,

" तुमची अंतःकरण-रेषा जीवन-रेषेला भेदून जाते, म्हणून थोडी काळजी वाटते. तुम्ही म्हणता तुमचा धंदा छान चालला आहे. पण कालपासून पाहतो आहे, तुमच्या हृदयात कसलीतरी सूक्ष्म काळजी घर करून आहे. मला वाटतं, तुमचा अंतःकरणाचा धागा कोणीतरी निर्दयपणे कुरतडत आहे. " असे म्हणून मी खोडसाळपणे हसलो.

पण ती गंभीर झाली. तिच्या डोळ्यांत पाणी तरारले. क्षुब्ध आवाजात म्हणाली,

" तेच-तेच मला जाळीत आहे. " आणि तिने आर्त अवचित आवाजात विचारले, " माझं लग्न होईल काहो ? "

आता तिच्या हाताकडे पाहण्यात अर्थ नव्हता. आता हस्तविद्येकडून जीवन-विद्येकडे वळायला हवे होते. पण तिचा माझ्या सामुद्रिक ज्ञानावर ठाम विश्वास बसला होता. ती भाबड्या नजरेने पाहत होती. तिचे रहस्य मला तिच्या नजरेत सापडले असते. पण तिच्या हाताच्या आराखड्यात पाहणे भाग होते. मी तिचा हात दोन हातांत धरला. कोमलपणे जरा दाबला आणि जरा वेळ नजर त्याच्या-वर खिळवून दुसरा हात पाहण्यास मागितला. जरा वेळ पाहिल्यावर म्हटले,

" तुमचा लग्नाचा योग एकदा येऊन गेला होता ? "

" होय. बापानं माझं लग्न एका शेतकऱ्याशी ठरविलं होतं, पण मला तो पसंत नव्हता. माझी एका अमेरिकन नर्सशी ओळख झाली होती. तिच्या मदतीनं मी पळाले. "

जराशी थांबून ती म्हणाली,

" आमच्या जपानात बापाविरुद्ध बंड – विशेषतः मुलीचं बंड – हा फार भयंकर गुन्हा आहे. त्यामुळं बापाचं घर मला आता कायमचं बंद झालं आहे. खरं म्हणजे मला आता घरच नाही. " एवढं ती म्हणाली आणि एकदम गप्प झाली. पण आत खूप खळबळ चाललेली स्पष्ट दिसत होती.

तिचे मन हलके करावे म्हणून मी बोललो,

" पण तुम्ही इतक्या तरुण, इतक्या सुंदर, इतक्या कर्तबगार – खात्रीनं तुम्हाला एखादा जोडीदार सापडलाच असला पाहिजे. "

काही तरी बोलण्यासाठी तिने तोंड उघडले, पण शब्द फुटला नाही. तिचे ओठ थरथरत होते. जरा वेळ गप्प राहून ती म्हणाली,

" होय, सापडला आहे. पण तोच माझ्या आयुष्याचा मोठा खोडा ठरला आहे. "

एवढे म्हणून ती थांबली. आम्ही अधीर नजरेने पाहू लागलो. काही क्षण थांबून ती म्हणाली, " होय, या अतामीत माझा एक मित्र आहे. मित्र, प्रियकर. चांगला तरुण आहे, देखणा आहे, धंदेवाईक खेळाडू आहे. पैसेही

खूप मिळवतो. पण त्याचं लग्न झालेलं आहे – आणि मी, मी त्याची निव्वळ रखेली बनले आहे. ”

ती दुभाष्यामार्फत बोलत होती म्हणून, नाही तर तिच्या भावनांचा स्फोटच झाला असता. भावनांना मध्यस्थ चालत नाही हेच खरे.

तिचे सांत्वन करण्यासाठी म्हणून मी बोललो—

“ असं का म्हणता ? प्रेमासारखं सुंदर आणि पवित्र काय आहे ? त्याचं प्रेम तुम्हाला लाभलं आहे ना ? ”

“ होय आणि पैसाही. मध्यंतरी माझा धंदा बुडाला तेव्हा त्यानंच मला मदत केली. म्हणून माझा धंदा पुन्हा उभा राहिला. पण नसता त्याचा पैसा घेतला तर बरं झालं असतं. ” ती आवेगाने म्हणाली,

“ पण प्रेमामुळं त्यानं तुम्हाला पैसा दिला ना ? ”

“ होय, पण त्याचं प्रेम राक्षसी आहे. ते मला नुसतं खात असतं. ”

आणि मग नजरेवर कसली तरी झापड आणून ती म्हणाली,

“ त्याच्या प्रेमाच्या मिठीत मी असले म्हणजे मी सुखात नाहत असते हो. पण हे सुख तोकडं ठरतं. त्याला बायको आहे. मुलं आहेत. त्यांची त्याला विलक्षण ओढ आहे. आणि तरी त्याचं माझ्यावरचं प्रेम भारी मत्सरी आहे. खरोखर मी त्याच्या प्रेमाच्या बंदीखान्यात सापडल्यासारखी झाले आहे. आज त्याची मॅच आहे म्हणून – म्हणून मला येथं यायला मिळालं आहे. ”

ती गप्प बसली. कोणीच बोलले नाही. मग तीच म्हणाली,

“ आमची नेहमी भांडणं होतात. भयंकर भांडणं ! या भांडणांपायी जीव वैतागला आहे माझा. या प्रेमानं छळवाद मांडला आहे नुसता. यातून सुटायचं आहे मला – सुटायचं आहे. ”

ती एवढे म्हणाली नि गप्प झाली. आम्हीही गप्प झालो. काय बोलावे तेच कळत नव्हते. तिने हात मघाशीच माझ्या हातातून काढून घेतला होता. आता भविष्यकथनात तिला स्वारस्य उरले नव्हते. वर्तमानकालच इतका जबरदस्त झाला होता की त्याने भूतभविष्य सारे खाऊन टाकले होते.

* * *

मी उठून जरा खोलीबाहेर गेलो. जराशा वेळाने परत आलो तो ती तेथे नाही ! पासीनने सांगितले, तिला त्या दुसऱ्या मुलीचा फोन आला म्हणून ती

लगेच गेली. जाताना ती आम्हा दोघांना सात वाजता तिचे खास पाहुणे म्हणून पेयपानाला निमंत्रण देऊन गेली.

बरोबर सात वाजता आम्ही तिच्या बारकडे गेलो आणि चकित झालो! बार चक्क बंद होता. रविवारी सायंकाळी बार बंद!

आत एखादा दिवा उजळत असावा. बाहेर एक मोटर-सायकल उभी होती. आम्ही दोघांनीही त्या सायकलकडे पाहिले आणि आमच्या अर्थपूर्ण नजरा एकमेकींना भिडल्या!

आता तेथून जाणे भागच होते. आम्ही समोर समुद्रकाठी धक्क्यावर गेलो आणि भरतीच्या लाटा फुटत होत्या त्यांच्याकडे विमनस्क दृष्टीने पाहत उभे राहिलो.

समोर समुद्रावर मच्छिमारी जहाजे शिडे पसरून उभी होती आणि सायंकाळच्या छायांनी ती काळवंडली होती. समुद्रसफरीस गेलेल्या लॉंचेस कर्कश आवाज करून परत येत होत्या आणि आमच्या आजूबाजूला जमलेल्या थव्यांचे हसणे-खिदळणे त्यांच्या आवाजात चमत्कारिक रीतीने मिसळत होते. इतक्यात समुद्राच्या पाण्यावर बसलेल्या पक्ष्यांचा एक थवा आरडाओरडा करीत उठला आणि टेकडीच्या दिशेने जाऊ लागला. आम्ही त्याच्याकडे नुसते पाहत राहिलो.

तोच मागून कोणीतरी जपानीमध्ये हाक मारल्यासारखे वाटले. पासीनने चमकून पाहिले. दुपारी उमेकोबरोबर आलेली ती मुलगी होती. तिने पासीनला काही तरी भराभर सांगितले आणि ती निघून गेली.

त्याचे असे झाले होते की उमेको आमच्याकडे आली होती त्या दरम्यान तिचा तो प्रियकर तिच्या घरी आला. त्याची मॅच रद्द झाली होती. ही घरी नाही असे म्हटल्याबरोबर तो विलक्षण खवळला. त्याने नुसता थयथयाट केला. कोणा तरी जाराकडे ती गेली अशा संशयाने वेडापिसा झाला. तेव्हा त्या दुसऱ्या मुलीने उमेकोला आमच्या हॉटेलमध्ये फोन केला. म्हणून ती घाईघाईने माझा निरोप न घेताच परत गेली. पण आम्ही सात वाजता येऊ याची तिला जाणीव होती. तिने या मुलीला आमची वाट पाहत बसवून ठेवले होते. पण आमची तिची थोडी चुकामूक झाली. बारमध्ये चला असे सांगायला ती मुलगी आली होती.

आम्ही पुन्हा बारकडे गेलो. त्या मुलीने बारचा दरवाजा थोडासा उघडून ठेवला होता. आम्ही आत गेलो. मुलीने दरवाजा लोटून घेतला आणि नंतर एक बीअरची बाटली आणि दोन ग्लास आमच्या समोर ठेवले. तुम्ही घ्यायला लागा, जरा वेळाने ती येईल, असे ती म्हणाली.

त्या छोट्याशा बारमध्ये कुंदपणा होताच, पण आता एक प्रकारचा चमत्कारिक जडपणा त्यात भरल्यासारखा वाटला. आम्हांला काय बोलावे तेच समजत नव्हते. जपानी बीअरच्या गुणधर्मावर काही तरी हलक्या चोरट्या आवाजात आम्ही बोलू लागलो.

जरा वेळाने त्या छोट्या जिन्यावरून धाडधाड पावले टाकीत एक तरुण उतरला. उतरताना एक तीव्र क्रुद्ध नजर त्याने आमच्याकडे फेकली. जणू आम्हीच त्याच्या संतापाला जबाबदार होतो.

उमेको काल भारतातल्या वाघांची चौकशी करीत होती. पण बिचारी स्वतःच एका वाघाच्या तावडीत सापडली होती.

त्याच्या त्या क्रुद्ध अवतारातही हा तरुण अतिशय देखणा आहे अशी मला जाणीव झाली.

बारचा दरवाजा त्याने खसक्याने उघडून आपटला आणि मोटरसायकल आदळआपटीने सुरू केली.

आता उमेको येईल म्हणून आम्ही वाट पाहत बसलो. पण ती येण्याचे लक्षण दिसेना. तेव्हा आम्ही उठलो. पण ती आता येईल असे म्हणून त्या मुलीने आम्हांस थांबवण्यास सांगितले. अखेरीस ती आली.

कालपासून मी तिला पाहत होतो. वेगवेगळ्या मनःस्थितीत पाहत होतो. पण तिचा आताचा अवतार काही निराळा होता. कालची आनंदी उत्सुक उमेको आता नव्हती. एक अगदी विकल, विफल, विमनस्क माणूस आमच्यापुढे आले होते.

तिचा चेहरा विस्कटला होता, काळवंडला होता. डोळे लाल झाले होते. जड झाले होते. ती रडत होती हे स्पष्ट होते. आमच्याकडे पाहून तिने हसण्याचा प्रयत्न केला तेव्हा तिची मुद्रा अगदी केविलवाणी झाली.

मला एकदम तिची दया आली.

आम्ही तिचे हसून स्वागत केले. तिच्यासाठी एक ग्लास भरला. पण तिने खुणेने नको म्हणून म्हटले. तिला मोकळे वाटावे म्हणून कसल्या तरी निराळयाच विषयांकडे वळलो. जपानी बीअरबद्दल काही अनावश्यक प्रश्न विचारले. अतामीच्या डोंगरावर सिमेंटची एक प्रचंड इमारत होती तिच्याबद्दल चौकशी केली. पण कशाचा काही उपयोग होईना. ती एखादा शब्द बोले आणि गप्प बसे. एकदम धीर करून काही तरी बोले, पण ते मलूल ठरे.

अखेरीला तिला काय वाटले न कळे, तिने बीअरचे ते भरलेले ग्लास तोंडाला लावले आणि घटाघटा संपविले. दुसरे भरले आणि तेही घटाघटा संपविले.

आणि मग तिने सिग्रेट घेतली आणि पेटविली.

मग ती आमच्याकडे पाहून हसली.

पण कसले हसणे ते !

तिचा तो जोर एकदम जिरला. ती तशीच विसविशीतपणे बसून राहिली. जरा वेळाने उठली नि म्हणाली, " जाते मी. "

आम्हीही तसेच उठलो. पासीनने खिशातून पैशाचे पाकीट काढले आणि बीअरचे पैसे देऊ केले.

तिनेही ते घेतले – आम्ही तिचे पाहुणे होतो, गिऱ्हाइके नव्हतो हे ती विसरलीच.

घरी परतताना आम्हाला वाटेत तो चिडाचा वृक्ष लागला – आणि त्याचे ते वेडेवाकडे विचित्र रूप पूर्वी कधी नव्हते इतके खटकले! पटले !



# गिंझा

फर्नाण्ड गिगो नावाच्या स्विस लेखकाने गिंझात जगातल्या अनेक आकर्षक स्थळांचे नवनीत शोधले आहे. त्यांच्या मते, गिंझा हे थोडेसे अमेरिका आहे कारण येथे सिमेंट-कॉंक्रीटच्या उंच उंच हवेल्या आहेत आणि त्यातल्या, दुकानात शू-लेसपासून एक्स-रे मशीनपर्यंत हवी ती वस्तू मिळू शकते. ते थोडेसे ब्रॉडवे आहे, कारण तेथे अभिजात नाट्यप्रयोगापासून बेलज्ज नग्नदर्शना-पर्यंत सर्व प्रकारच्या करमणुकींची सोय आहे आणि निऑन लाइट्सचे नजर बांधणारे चमत्कार आहेत. ते थोडेसे पॅरिस आहे, कारण येथील रस्त्याच्या काठी झाडांच्या नयनरम्य रांगा आहेत आणि कॉफीगृहांवर "कॉक द ऑर" असल्या

फ्रेंच पार्ट्या आहेत. ते थोडेसे लंडन आहे, कारण पैसेवाल्यांची इभ्रत सांभाळ-णारी निवडक संकेत-स्थळे येथे आहेत. ते थोडेसे जिनीवा आहे, कारण येथील दुकानांच्या प्रदर्शन-भागात घड्याळांची आरास असते. ते थोडेसे स्टुटगार्ट आहे, कारण येथे कॅमेऱ्यांच्या दुकानांची एक खास मिजास आहे. ते थोडेसे व्हेनिस आहे, कारण सुमिदा नदीचे कालवे येऊन त्याला भिडतात. आणि ते थोडेसे इस्तंबूलदेखील आहे, कारण येथील न्हाणीघरात टर्किश बाथची मौज चाखता येते !

गिंझातील 'शो-बोट' आणि शेजारच्या कालव्यातील घाण आणि गर्दी पहिली की गिर्गोने शोधलेले हे साम्य म्हणजे लेखनशैलीची एक स्वच्छंद लहर आहे हे लगेच ध्यानात येते. आजकालच्या कोणत्याही दोन शहरांमध्ये तसे साम्य असतेच, पण त्या साम्यातही प्रत्येकाच्या वैशिष्ट्याची चमक असते. तसेच गिंझाचे आहे. इथल्या काही कॉफीगृहांवर फ्रेंच अगर इटालिअन पार्ट्या असतील, पण येथल्या कॉफीच्या कपाभोवती जे वातावरण दरवळते ते फ्रेंच अगर इटालिअन कॉफीगृहांत खास दरवळत नाही. इथल्या निऑन लाइटसारखे नेत्रदीपक निऑन लाइट्स न्यू यॉर्कमध्ये असतील, पण यांच्या शोभेत जी एक झळक आहे ती खास जपानीच! येथल्या इमारतीसारख्या इमारती प्रत्येक पाश्चात्त्य शहरात आहेत, पण सारी इमारत जमिनीवर उठवून मग ती चार मजले जमिनीत गाडण्याचा प्रयोग होत असताना लोकांनी तिच्या इंच इंच भूमिप्रवेशाचे जे कौतुक केले त्याला इतरत्र तोड सापडणार नाही. येथल्या 'स्ट्रिप्टीज' (नग्नदर्शना) सारखी बेलज्ज दर्शने अमेरिकेत खूप असतील, पण नग्न देहापेक्षा सोबतच्या प्रयोगातील फार्सावर जपानी प्रेक्षकांचे डोळे जसे खिळतात तसे अमेरिकन प्रेक्षकांचे खास खिळत नसतील. आणि येथल्या स्नानगृहात जो नैसर्गिक निःसंकोच आढळतो त्याचा शतांशही त्या ख्रिश्चन आणि इस्लामी नीतिमत्तेने ग्रासलेल्या इस्तंबूलमध्ये आढळत नसेल. म्हणून गिंझाचे आकर्षण काही वेगळेच आहे, कारण जपान वेगळे आहे !

पाश्चात्त्य माणूसही दारू पितो आणि जपानीही पितो. पण दोघांच्या पिण्यात एक फरक आहे – तोच गिंझा आणि ब्रॉडवे अगर गिंझा आणि प्लास पिगाल-मध्ये आहे. पाश्चात्त्य मनुष्य दारू पितो ती सहज गंमत म्हणून. दारूपानाने वृत्तीत एक प्रकारची तरलता येते ती अनुभवण्यासाठी. थोडेसे हवेत चालण्या-

साठी. आपल्या वृत्तींना थोडे पाणी देण्यासाठी, थोडी धार आणण्यासाठी. पण जपानी माणूस पितो याचे कारण निराळे आहे. त्याचे जीवन जखडलेले असते. कर्तव्याच्या काचांनी करकचलेले असते. फासेपारध्याचे जाळेच ते— त्याला घट्ट पकडून ठेवते. राजा, राष्ट्र, पिता, मालक, पूर्वज यांच्याविषयीच्या नानाविध निर्बंधांनी त्याचे सारे आयुष्य आवळलेले असते. ऋण, दान, श्रेय इत्यादींच्या हजारो जाचक कल्पनांनी ते पुरे वेढलेले असते. लौकिक व्यवहारात त्याची त्यातून सुटकाच नसते. दारू पिऊन दोन घटका स्वतःला विसरणे एवढेच तो करू शकतो. वारयोषितेच्या विश्वात दोन तास दडी मारणे एवढाच त्याजपाशी उपाय असतो. जीवनाचे जोखड असे फेकून देण्याचा हा मार्ग जपानी समाजाने अगदी शहाजोगपणे स्वीकारलेला आहे. घरच्या माणसांनीही तो मानलेला आहे. म्हणून रात्री नवरा गेशांकडे निघाला म्हणजे धर्मपत्नी त्याला कपडे चढविण्यास मदत करते, आणि नवरा अगदी भर चवाठ्यावर दारू पिऊन फेस पडला तरी त्याला सावरून-संभाळून घरी आणते. दारू आणि स्त्री या पापाच्या राशी असे जपानी मुळी समजतच नाहीत – म्हणून मदिरा आणि मदिराक्षी यांच्या मंदिरांचा मार्ग चालताना पापाच्या कल्पनांचा दबा धरून बसलेला राक्षस जपान्यांना भेडसावीत नाही.

म्हणूनच संध्याकाळी उन्हे परतली, ऑफिसे सुटली, दिवसाचा प्रकाश सायंकाळच्या प्रकाशात परावर्तित होऊ लागला, आकाशात चांदण्या आणि खाली निऑन लाइट्स चमचम करू लागले की शेकडो-हजारो माणसांची पावले गिंझाकडे वळू लागतात. लोटच्या लोट येतात. त्यांच्या पावलांत एक प्रकारची निःसंकोच साहजिकता असते. त्यांच्या वृत्तीत एक प्रकारचा निरागस मोकळेपणा असतो. त्यांच्या हावभावात एक प्रकारची मुक्ती असते. त्यांची गिंझाकडची धाव म्हणजे जीवनाच्या अरुंद रस्त्यावरून मोकळ्या मैदानात मारलेली उडीच – आनंदाचे वारे प्यालेली उडी!

हेच गिंझाचे खरे आकर्षण आहे. हीच गिंझाच्या वातावरणाची खरी मादकता आहे. हाच गिंझातल्या खुशालचेंडूपणाचा खरा जोश आहे. येथल्या कॉफीच्या कपात, बीअरच्या बाटलीत, निऑनच्या रंगात, गाण्याच्या सुरात, बॅन्डच्या ठेक्यात आणि नृत्याच्या पावलांत हाच जोश आहे—याचेच पाणी लकाकत आहे. ब्रॉडवे, पॅरिस, इस्तंबूलच्या चैनीत हे पाणी नाही!

हे पाणी चाखण्याची तुमची-आमची हिंमत नाही. गिंझाची कीर्ती आपण ऐकलेली असते. म्हणून टोकियोतल्या पहिल्याच संध्याकाळी आपली पावले तिकडे वळतात. पण त्यात जपान्यांचे साहजिक वळण नसते. कसल्या तरी निषिद्ध साहसाच्या शोधात आपण असतो. त्या साहसाच्या सीमारेषेवर आपण घुटमळत असतो. आपल्या हातून काही तरी विलक्षण घडणार, घडावे अशी चोरटी आशा किंवा गोड भीती आपल्या अंतःकरणात असते. कसल्या तरी अजब अपेक्षेने, आणि त्या अपेक्षेने तरळलेल्या वृत्तीने, आपण गिंझात चालतो, बोलतो, वागतो – आणि अर्थात गिंझा निराळा दिसतो. वाटते, जीवन जीवन म्हणतात ते येथ आहे. पण या जीवनावरचा उफाळलेला फेस चाखण्याची आपली हिंमत नसते. आपण भटकभटक भटकतो आणि या जीवनाचा शिंतोडाही अंगावर उडवून न घेता परत येतो. असे दोन-चार दिवस झाले म्हणजे चळलेली वृत्ती जरा ताळ्यावर येते. मन थोडे तटस्थ होते. आजूबाजूच्या दृश्यांचा अर्थ कळू लागतो—खरे म्हणजे त्यातली मजा कळू लागते.

एकीकडून एक मैत्रिणींचा घोळका येतो, दुसरीकडून मित्रांचा घोळका येतो, आणि मग मैत्रिणींत हास्य खिदळते आणि मित्रांत चलबिचल होते. या दोन घोळक्यांचा मुकाबला होतो की काय, एखादी मैत्रीण आणि एखादा मित्र हळूच सटकतात आणि एक नवीन जोडी निर्माण करतात की काय, हे आपल्याला समजत नाही. पण त्याची आता गरज नसते. त्या हास्याची खळखळलेली बांगडी तेवढीच मनावर ठसते. समोरून एक तरुणी येते. तिचे डोळे दारू प्यायल्यासारखे वाटतात, ती दारू तुम्हाला चढू लागते, इतक्यात ती दृष्टिआड होते. मग एक जोडपे दिसते — पुरुष पाटलोणीत आणि स्त्री किमोनोत. एका दुकानाच्या प्रदर्शन-भागाचे ती निरीक्षण करतात. आपण त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव न्याहाळतो आणि जपानी फॅशन्सबद्दल अंदाज बांधू लागतो. इतक्यात बाजूच्या गल्लीतून एक झिंगलेला माणूस अवचित उपटतो—पण त्याच्याकडे कोणीच लक्ष देत नाही. आपणही देत नाही. एक खेळणीवाला प्रकाशाने क्षणात फुलणारे, क्षणात विझणारे चेंडू विकीत असतो ते पाहत आपण आपले उभे राहतो. तोच एक दहा-बारा वर्षांची मुलगी फुलांचा गुच्छ तुमच्यापुढे धरून उभी राहते. 'विकत घ्या' म्हणून विनविते. मुलगीही सुंदर आणि फुलेही सुंदर! पण फुले आपल्या काय कामाची? पण मुलीच्या नजरेत अशी काही ओढ असते आणि

वाणीने ती असे काही बोलत असते की क्षणाचाही विचार न करता तुम्ही ती फुले विकत घेता आणि लगेच ती तिलाच देऊन चालू लागता. पण तिला कळत नाही—ती तुमच्या मागून काही तरी बोलत चालू लागते—तुम्ही मागे वळून बघता—ती तुम्हाला फुले देण्यासाठी धडपडत असते—मग तुम्ही एकवार हसता, करुणेने हसता आणि तिला टाळण्यासाठी आडव्या गल्लीत शिरता. तोच कोपऱ्यावर कागदाच्या कंदिलात मेणबत्ती लावून बसलेला एक ज्योतिषी एका मध्यम-वयस्क बाईचे भविष्य वर्तवीत असलेला दिसतो. राखी किमोनोतील त्या स्त्रीच्या चेहऱ्यावरची गंभीर उत्सुकता आणि मळकट पांढऱ्या पोशाखातल्या त्या ज्योतिष्याच्या चेहऱ्यावरचा संपूर्ण निर्विकार भाव, यांतल्या आर्त विरोधामुळे त्या कुडबुड्या हस्याची चेष्टा करण्याच्या पलीकडे तुम्ही जाता. पण एक विचार मात्र मनात घोळतो—सगळीकडे इतका उजेडाचा उफाडा असताना हा ज्योतिषी त्यातल्या त्यात काळोखी कोपरा शोधून वर मेणबत्तीच्या उजेडालाही कागदाचे आवरण का घालतो ? तुमचे भविष्य असे अंधारात लपलेले आहे असे त्याला सुचवावयाचे आहे की काय ? जिप्सी ज्योतिष्यांच्या स्फटिक-गोलाप्रमाणेच या कागदी कंदिलाचा उपयोग होत असेल काय ?

पण याचा अधिक विचार करायला तुम्हाला फुरसत नसते. तुमच्या रस्त्यावर पुढे उजेडाचा झगझगाट आणि गर्दीची झिम्मड असते. त्यातच मोटरींनी एकमेकांना अडवून कार्यांचे शीतयुद्ध सुरू केलेले असते. पण या माणसांच्या आणि मोटरींच्या गर्दीपेक्षा त्या प्रकाशाच्या आराशीनेच तुमचे लक्ष वेधून घेतलेले असते. त्या रस्त्यावर फ्लोरोसंट ट्यूब्सच्या कमानींच्या रांगांमागे रांगा असतात. दररोज रात्री प्रकाशाच्या गोलांनी आणि कंदिलांनी रस्ते दिवाळीतल्या प्रमाणे शृंगारायची जपानी शहरांची पद्धती मी पाहिलेली होती, पण येथे निऑन-लाइट्सचा इतका कडाका उडालेला असताना ही दीपोत्सवाची प्रांतिक स्वायत्तता का हे ध्यानात येईना. पण हे कारण फारसे खोल नसावे. ही नुसती प्रकाशाची चढाओढ असावी. गिंझात रात्री सुरू असलेली प्रकाशाची, मुख्यत: निऑन-लाइट्सची, स्पर्धा गिंझाच्या अंगात एखादे भूत संचारावे तशी चालते. अनेक प्रकारचे दिवे या शर्यतीत शिरत असतात—उडणारे दिवे, डोळे मिचकावणारे दिवे, प्रकाशरेषांची अनेक कोडी घालणारे व लगेच उलगडून दाखविणारे दिवे, नक्षीदार भरतकामाचे अनेक नमुने दर्शविणारे दिवे,

कशाला तरी गवसणी घालायला निघालेले दिवे, इंद्रधनुष्यातील रंगांनी एकमेकांना उखाणे घालण्याचा खेळ खेळणारे दिवे—आणि अर्थात जेथे जागा मिळेल तेथे दीपमाळेची आरास करणारे अस्सल जपानी कंदिल – यांचा आततायी उल्लास सुरू असतो. ती समोरची नाइट क्लबची इमारत पाहा. तिच्या शिखरावर पृथ्वीभोवती फिरणाऱ्या ग्रहताऱ्यांचे प्रात्यक्षिकच सुरू आहे! ती ईडन-बाग पाहा, त्या बागेतले सफरचंद अदाम-ईव्हच्या हातात पडण्यापूर्वीच त्याच्यावर आपल्या शरसंधानाचा प्रयोग करण्याचा प्रयत्न बालमदन करीत आहे! त्या क्लबच्या शिखरावर एक गेशा – वस्त्रालंकाराचे सारे सौंदर्य ल्यालेली गेशा – आपल्या हास्याची मोत्ये सर्वत्र विखरीत आहे!

* * *

डोक्यातला हा प्रकाशाचा गोंधळ थोडा दूर करण्यासाठी तुम्ही आणखी एकवार रस्ता बदलता, थोडेसे चालता, तोच ध्यानात येते की तुम्ही पुन्हा पूर्वीच्याच हमरस्त्यावर आला आहात. गिंझात असे हे नेहमीच होते. गिंझाचा भूगोल बिनचूक जाणणारा – म्हणजे सायंकाळच्या त्या मनःस्थितीत जाणणारा – कोणी हरीचा लाल असेल असे मला वाटत नाही. हमरस्त्याआडचा गिंझा म्हणजे चक्रव्यूहाचा एकेक तुकडा आहे. जीवनाच्या ‘ लढाई ’साठी निघालेले अनेक अभिमन्यू त्यात रोज अडकतात आणि गायब होतात! हमरस्त्यावर अर्थात गर्दीचे उधाण असते, पण मागच्या गल्ल्यांत जो थोडासा अनुभव आलेला असतो त्याने मनावर पक्के बिंबलेले असते की जीवनाच्या काही वक्र वळणांची मजा चाखायची असेल तर या गल्ल्यांत चला. म्हणून आपण लगेच हमरस्ता सोडतो आणि एका गल्लीत घुसतो, आणि काय आश्चर्य!—या गल्लीतला उजेड अगदी मंद! गर्दीही फार नसते. जी असते ती बहुतेक सारी पुरुषांची. स्त्री एखादीच. पण दोनही बाजूंना हारीने उभ्या असलेल्या बारपैकी काहींच्या समोर स्त्रिया ( एकट्या–दुकट्या ) उभ्या असतात. रंगदार किमोनोत सजलेल्या आणि बाहुलीप्रमाणे रंगलेल्या स्त्रिया! तुम्ही जाऊ लागला म्हणजे त्यांतली एखादी तुमच्याकडे पाहते, हळूच हसते आणि अगदी हलक्या आवाजात म्हणते, ‘दोझो.’ ...तुम्ही थांबलात तर ती कमरेत लवते व पुनः म्हणते, ‘दोझो.’ मग अर्थात तिच्या निमंत्रणाला नकार देण्याची तुमची हिंमत नसते आणि फारसा धोकाही नसतो.

निमंत्रण सावे मद्यपानाचे असते. मद्य म्हणजे साके. जपानचे राष्ट्रीय पेय. ते एकदा चाखायला हवेच. आपण संमती देतो. त्याबरोबर ती वळते, चौकोनी लाकडी जाळीचा छोटासाच दरवाजा असतो तो सरकावते व आपण वाकून आत प्रवेश करतो.

आत म्हणजे एका छोट्या जपानी बागेत. पाचसहा फूट लांबीरुंदीच्या त्या जागेत चीड, मोरपंख असले अगदी छोटेसे चारपाच फूट उंचीचे ' वृक्ष ' आहेत, झुडपे आहेत, जमिनीवर रेती आहे, रेतीत मधोमध तऱ्हेतऱ्हेच्या आकाराचे दगड आहेत, एक दगडी दिवा( शैलदीप )ही आहे. झाडांच्या, दगडांच्या दरम्यान पाणी चक्क एखाद्या ओढ्यासारखे आणून वाहते केलेले आहे. कोपऱ्यात पाणी पडत असते. त्याच्या त्या धारेकडे आपण क्षणभर कलदार दृष्टीने पाहतो नि त्या दगडावर अलगद पावले टाकीत जातो. बागेपलीकडच्या पडवीशी पोचतो तो ती किमोनो-कन्या तेथे केव्हाशी आलेली असतेच. ती तुमची पादत्राणे काढण्यास मदत करते, मग हळूच पडवीत उडी मारून सपातांचा जोड तुमच्या पुढे करते, तो घालून तुम्ही ' आता पुढे काय ' म्हणून विचार करता तोच ती समोरचे बंद दार सरकावते आणि आत चला म्हणते. आत फक्त कोऱ्या चकचकीत चटया पसरलेल्या आणि त्यांवर दोन छोटे छोटे चौरंग. त्या चटयांचा स्वच्छ, कोरा मऊपणा तुम्हांला दुरूनही जाणवतो नि तुम्ही आत पाऊल टाकता, तो ती तेथे आलेली असतेच. पलीकडे एका चौरंगाभोवती दोन जपानी पुरुष व एक किमोनो-कन्या बसलेली असतात. त्या जपान्यांची साकेच्या सुखानंदात फार प्रगती झालेली स्वच्छच दिसते. ते तुमच्याकडे काडीमात्र लक्ष देत नाहीत. तुमची किमोनो-कन्या मात्र हसून लवून टेबलापासच्या मऊ रेशमी गिरदीवर बसायला सांगते. तुम्ही बसता तोच ती साकेचे दोन नैवेद्यपात्राएवढे पेले घेऊन येते— एक तुमच्यासाठी, एक स्वतः-साठी. पण ती एकच पेला भरते व तुमच्या हातात देते, तेव्हा तुम्ही तिला तिचा भरायला सांगता. पण ती भरीत नाही. ' तुमच्या हातातला रिकामा झाला म्हणजे त्यातूनच घेईन ' असे सांगते. साकेचा पेला चवदार सावकाशीने थेंब थेंब चाखायचा असतो. पण तुम्ही नवशिके — तुम्ही तो एका घोटात गट्ट करता — आणि त्याच्या झटक्याने घसा थोडा चमकलेला असतो त्याची गंमत तुमच्या चेहऱ्यावर पसरते. त्यावर ती किणकिणे हसते आणि ' तुम्हाला बीअर देऊ का ' विचारते. पण आपल्याला अद्याप गिंझात बरेच भटकायचे असते — साकेपेक्षाही

अधिक सगक असलेला अनुभव शोधायचा असतो. आपण बिल देतो, ‘ आरिगातो ’ म्हणतो नि बाहेर पडतो.

तुम्ही आता ज्या रस्त्यावर आहात तो किती तरी अधिक जिवंत आहे, सळसळलेला आहे. रस्त्यावर दिव्यांची तशी आरास नाही, पण बाजूच्या रांगेने पसरलेल्या व्यग्र व्यवहाराच्या स्थळांकडून उजेडाची भरपूर आवक होत असते. त्यांच्या प्रवेशद्वारासमोर आता बहुतेक पुरुषच असतात (चुकून एखादी स्त्री — पण बरोबरच्या पुरुषांबरोबरचे तिचे हसणे-खेळणे असे की तुम्ही दुरूनच दबून जाता!) त्यांतला एखादा तुमच्याकडे येऊन धिटाईचे आवाहन करतो, आणि तुम्ही त्यातून पटकन् सटकता. समोरून एक गायक-वादकांची टोळी येत असते. त्यांतला एक मुरली तोंडात धरून चक्क स्वर काढीत असतो. (काय गंमत आहे पाहा — हे स्वर मला कोकणातल्या गुराख्याच्या पाव्याची आठवण करून देतात!) हे गिंझातले फिरते कलावंत! गिंझातल्या मादक गंमतीला थोडी मधुर स्वरांची झळाळी देणे एवढीच त्यांची माफक इच्छा. तुमच्याबरोबर म्हणाल त्या पेयगृहात येऊन तुम्ही म्हणाल ती चीज वाजवून (आणि क्वचित गाऊन) दाखविण्याची त्यांची तयारी असते! कॉफीत साईबरोबर संगीत ओतण्याची आणि बीअरच्या सोनेरी सळसळीत स्वरांची खुलावट मिसळण्याची ही कल्पना मला फार आवडली — पण यांच्या स्वैर, मस्त पिण्याची जी बैठक लागते ती देण्याची आपली तयारी नसते आणि आपण तसेच पुढे जातो. तो पुढल्या कोपऱ्यावर एक चित्रकार दिसतो — झटपट चित्रकार! तेथल्या तेथे तुमची छबी उठवून देणारा चित्रकार! त्याच्या कलेचे नमुने आजूबाजूला ठेवलेले असतात. तो कोणत्या तरी चित्रावर अखेरचा हात फिरवीत असतो. तुमच्याकडे अगदी लक्ष नाही असे दाखवितो — आणि अवचित भानावर येऊन हसतो — हसून स्वागत करतो आणि दहा मिनिटांत तुमचे चित्र काढून देण्याची हमी देतो. कलावंताची कदर केली पाहिजे असे आपले मन सांगते — पण निश्चय होत नाही. काय उपयोग ? हा आपले अवयव रेखाटील, पण मनातले भाव थोडेच रेखाटणार ? गिंझाच्या वातावरणात उन्मनस्क झालेली वृत्ती त्याच्या पेस्टलच्या फटक्यात थोडीच सापडणार ? म्हणून आपण त्याला आदरपूर्वक नकार देऊन पाऊल उचलतो — पण लगेच वाईट वाटते. एका धडपडत्या कलावंताला साहाय्य करण्याची संधी आपण सोडली याचे वाईट वाटते. आता हे लिहिताना तर फारच

वाईट वाटत आहे. आपल्या उन्मनस्क वृत्तीची फिकटशी तरी छाया आपल्या चेहऱ्यावर पडली असेलच ना—त्यातली थोडीशी तरी त्याने रेखाटली असती तरी आता मला त्या वेळच्या माझ्या अंतरंगात थोडे डोकावून पाहता आले असते.

आपले पाऊल रेंगाळते, पण आपण तसेच पुढे जातो. तो ती मघाची फुलांचे गुच्छ विकणारी मुलगी पुन्हा पुढे उभी! गिंझाच्या चक्रव्यूहाची आणखी एक प्रचीती. तसे म्हटले तर गिंझाचे जग लहानच, आणि ते स्वतःभोवतीच फिरत असते. आपण त्या मुलीला ओळखतो, पण ती मुलगी ओळख दाखवीत नाही. न ओळखताच हसते— अगदी फिरून हसते. आता तुम्ही तो गुच्छ आनंदाने विकत घेता—आणि परत देत नाही. कारण आता तुमची वृत्ती बदललेली असते. तरंगत असते. स्वतःच्याच अस्फुट अस्थिर इच्छांमध्ये सुखावत असते. आपल्या अनुभवांना अज्ञात साहसात ढकलून देण्यासाठी आतुर झालेली असते. वाटते, हा फुलांचा गुच्छ—कोणी सांगावे? प्रसादचिन्हच असेल तो! या स्वैराकर्षणाच्या मोहिमेत कदाचित मार्गदर्शक ठरेल ठरो वा न ठरो, हा गुच्छ हातात वागविण्याची कल्पना आवडते. हा गुच्छ हातात असला की गिंझाच्या या जगात आपल्याला आपले स्थान सापडेल अशी आशा वाटते.

या वृत्तीवर तरंगत तरंगत आपण फिरू लागतो. फिरत राहतो. एका गल्लीतून दुसऱ्या गल्लीत, दुसरीतून तिसरीत, असा आपल्या पावलांचा अबोध, अस्थिर प्रवास सुरू राहतो. आपले डोळे फिरफिरत असतात. असंख्य गोष्टींचा वेध घेत असतात. आपले मन भटकत असते. आपले विचार भरकटत असतात. वृत्ती हेलावत असते. आपण अनेक साकेगृहे पाहतो, पेयगृहे पाहतो, नृत्यगृहे पाहतो, आणि साधी आहारगृहेही पाहतो. त्यांची नावे, त्यांची दर्शनी बनावट, त्यांच्या वास्तूचे शिल्प, त्यांच्या प्रसाधनाचे तरंग पाहतो—नजरेत ओततो, अंतःकरणात साठवितो आणि त्यांची क्षणाक्षणाला वाढत असलेली गुंतागुंत एकसारखी दूर करीत असतो. त्यांची ती नावे—दरेक नावाबरोबर अंतःकरणात अनुभवाचे विश्व उमलते. बार गिल्डा, बार डायना, बार रिहिव्हया, बार ऐस्टेलेटा, बार ज्युलियेन —गिल्डा माझी जिनीवाची मैत्रीण. ती व मी मिलानमध्ये असेच भटकलो. असेच हिंडलो. मिलानचा शोध घेण्यास तिने मला मदत केली. पण त्या वेळचे

वातावरण किती निराळे! किती निरभ्र! त्या वेळचा अनुभव किती शुद्ध! किती समृद्ध! माझी गिल्डा, तशी कोणाची तरी डायना, तर कोणाची सिल्व्हिया! आपल्या बार्सच्या नावांत लोकांचे स्मृतिविश्व ढवळून काढण्याचे असे चमत्कारिक सामर्थ्य आहे अशी त्यांच्या मालकांना कल्पना तरी असेल का? पण ही किमया नावाची नव्हे—वातावरणाची आणि तुमच्या अनुभवांची! नाही तर बार लामेर, बार मिराबार यांनी माझा काव्यात्मा उचंबळून यायला हवा होता! (मला फक्त हाँगकाँगचे हॉटेल मिराबार हे ऐषआरामी हॉटेल आठवले!) आता हा बार रापान, क्लब कोपाकाबाना अगर पापागायो — तंग तोकडी तुमान, चौकडीचा उघडा शर्ट, गवताची सताड हॅट आणि हातात बांजो अगर मॅंडोलिन अशा थाटातला कॅबालेरो माझ्या डोळ्यांपुढे उभा राहिला. मला स्पॅनिआर्डांचे गरम रक्त आवडते. त्यांचा एकंदर उसळता कारभार मला पसंत आहे. त्यांच्या चित्रकलेतील रसरसत्या रंगांनी माझी नजर अनेकदा बांधून ठेवली आहे, पृथ्वीवर प्रलय मांडणाऱ्या त्यांच्या गाण्याने आणि नाचण्याचे मला एका काळी वेड लागत असे. पण मी सिंगापूरला मले लोकांचे योगेत नृत्य पाहिले — आणि स्पॅनिआर्डांच्या तुफानी नृत्यातही संयमाचे काव्य ओतता येते हे अनुभवले — आणि माझे स्पॅनिआर्डांच्या गाण्याबजावण्याविषयीचे रंगेल आकर्षण ओसरू लागले. मी या क्लबांच्या वाटेस गेलोच नाही. पण मनात विचार आला, पश्चिम युरोपात अगर दक्षिण अमेरिकेत मन भटकायला लावणारी ही नावे देण्याचे जपान्यांना वेड का? आणि मग एखादे जपानी नाव आढळते का पाहू लागलो — नि एक नाव आढळले — बार मोमोयामा! इतक्यात आणखी एक प्रश्न उपटला — मोठमोठ्या गडगंज नाइट-क्लब्सचे मालक आपल्या क्लबांना क्लब क्राऊन, क्लब्स स्टार, क्लब सेव्हन, क्लब सिरो असली सपक नावे का देतात?

पण नाव सपक असले तरी दर्शन सपक नाही. उलट चांगले भडकच! एका क्लबची इमारत किल्ल्यासारखी आहे आणि तिच्या डोक्यावर निऑन लाइट्सनी तारामंडळाच्या नर्तनाचा फेर धरला आहे! दुसऱ्या एका क्लबची इमारत लष्करी कोटासारखी वाटते. क्लब कार्लोवर आधुनिक वास्तुशिल्पाचा वर्षाव झालेला आहे, पण त्याच्या भिंती तटबंदीसारख्या दिसतात आणि त्याच्या प्रवेशद्वारावरचे शिल्प म्हणजे एखाद्या कलात्मक मुकुटाला जाडजूड कडे ठोकावे

तसे वाटते ! या असल्या अफाट–बेफाट इमारतींमुळे एक फायदा होत असेल ! रहस्यमय वातावरण निर्माण होत असेल ! आत चाललेले प्रकार म्हणजे एखाद्या मध्ययुगीन राजवाड्यात चाललेली गुप्त कारस्थाने, असा समज झाला तर त्यांचे आकर्षण वाढेलच ! काहींनी आपला हेतू अगदी उघडा केला आहे ! उदाहरणार्थ, एकाने आपला क्लब म्हणजे अल्लाउद्दिनाची गुहा बनविली आहे ! दर्शनी भाग ओबडधोबड दगडांचा; जागा वेडीवाकडी; आतल्या भिंतींवर रत्नांची चमचम; मधूनमधून खजुरीची कृत्रिम झाडे; निळा धूसर प्रकाश — त्या सुरस आणि चमत्कारिक वातावरणात वाटते, येथे नुसते कुजबुजले तरी कटाचा संशय येईल ! अरबी रंगमहालातला पोशाख केलेल्या तेथल्या मुलीशी बोलण्याचे सोडा, त्यांच्याकडे नुसते पाहण्याची हिंमत होत नाही. बाहेर दारावरच, पायघोळ सलवारीतला हबशी, त्याचा उघडाबंब देह, काळानिबर चेहरा, बटबटीत डोळे, कानाच्या पाळ्यांतून लोंबणारी भली लठ्ठ वळी, डोक्यावर पागोटे, आणि हातात नंगी तलवार—त्याचा हा अवतार पाहूनच हबकलो होतो. त्याच्याशी माझा जपानी मित्र बोलला तेव्हा वाटले होते, हा म्हणतो आहे, ' तिळा उघड. ' आत गेल्यावर वाटले, येथे एखादा बुदला असेल तर बरे— अलीबाबाच्या चोरासारखा त्यात लपेन तरी !

ज्याला जपानी वातावरणाची चव चाखायची असेल तर त्याने या तालेवार क्लबात पाऊल सुद्धा टाकू नये. एक प्रकारची दारू असते ना—तिचे प्राशन करण्यापूर्वी तिच्या पृष्ठभागाला काडी ओढून आग लावण्यात येते. त्याच्या निळ्याजांभळ्या ज्वाला दिसतात छान, पण त्यांची आग भयंकर, आणि ती दारूही भयंकर. या नाइट-क्लबांमधले वातावरण मला या ज्वाळांची आठवण करून देते. तेथला नाच म्हणजे धिंगाणा. तेथले संगीत म्हणजे झाजचा गहजब ! आणि तेथले बॅण्डवादन म्हणजे वाद्यांच्या अंगात संचारलेले भूत ! तेथे माणसे माणसांसारखी बोलत नाहीत, माणसांसारखी भेटत नाहीत—फक्त जमिनीला लाथा मारीत नाचतात ! माझ्यासारखा मनुष्य येथे शरमिंधा होतो. येथे आपल्याला थोडेदेखील स्थान नाही याची तत्काळ खात्री पटते आणि मी तेथून पळ काढतो ! एकदा माझे मित्र तकदीर अशाच एका क्लबकडे बोट दाखवून म्हणाले, या बीअर हॉलमध्ये जाऊ या – येथे टोकियो युनिव्हर्सिटीतले विद्यार्थि-विद्यार्थिनी शिक्षणासाठी पैसे मिळवितात, त्यांना आपण

मदत केली पाहिजे. आम्ही गेलो. तेथे आम्हांला विद्यार्थी दिसले नाहीत की विद्यार्थिनी दिसल्या नाहीत. दिसल्या त्या फक्त नाचऱ्या नखरेल्या! आम्ही पळालो!

* * *

तुम्हाला जपानी पेयगृहातले जपानी वातावरण चाखायचे असेल, जपानी आतिथ्य अनुभवायचे असेल, जपानी जिव्हाळा जाणायचा असेल तर तुम्ही छोट्या छोट्या पेयगृहांत चला. आपल्या जागा त्या! त्यांचे दर्शनच किती गोड! जपानच्या अभिजात सौंदर्यदृष्टीची फुले विखुरलेले! हा बार मॅग्नोलिया पाहा. येथ ही किलबिल कसली ऐकू येते आहे? त्याच्या प्रवेशद्वारावर पक्ष्यांचा पिंजरा आहे. वाटतो मात्र एखाद्या रानाचा तुकडा! तेथे पाखरे स्वच्छंद उडत आहेत, बागडत आहेत, चिवचिवत आहेत! मात्र अगदी स्वच्छंद नव्हेत हं. त्या 'राना'वरची ती 'हिरवी उने' जरा नीट न्याहाळा, म्हणजे ध्यानात येईल की ही कृत्रिम प्रकाशयोजना आहे आणि तिच्या लहरींवर हे पक्षी नाचत आहेत! आता हे पेयगृह पाहा. त्याचे वक्र, वळणदार, कोरीव छप्पर एखाद्या देवळाच्या छपरासारखे वाटते. आणखी या पेयगृहासमोर?—कृत्रिम टेकडी आणि कृत्रिम जंगल! जंगलाचा लुटूपुटूचा नमुना जपानी पाइन्सच्या आणि सीडर्सच्या कृत्रिम अल्पकृतींनी (बोन्साय म्हणतात त्यांना) निर्माण केलेला आहे. त्याचप्रमाणे या पेयगृहापुढचे हे छोट्या छोट्या तालवृक्षांच्या कुंड्यांचे शिल्प पाहा—कल्पसिंहाच्या मुखांचे शिल्प! जपानच्या अभिजात कुंभकलेचा साक्षात्कार घडतोसे वाटते! आणि आता या पेयगृहापुढे आडवीतिडवी टाकलेली झाडांची खोडे—हवी तशी टाकली आहेत आणि हवी तशी कापली आहेत! पण जरा कोवळ्या नजरेने पाहा—त्यांच्या आकारात आणि रचनेत एक संगती दिसेल आणि त्यांच्या स्वच्छ करकरीत कापावरच्या रेषांच्या रंगदार आकृती तुमची नजर खुलवतील!

यांच्या दर्शनाने आपले भान हरपते आणि आपण यांतल्या एका पेयगृहात शिरतो. आत नजर टाकल्याबरोबर जाणवते, हे खरे जिव्हाळ्याचे वातावरण! तेथे दोनतीन मुली असतात त्या तुमचे हसून स्वागत करतात. कौंटरपलीकडे वयस्क ममासान (मालकीण) असते, तीही तुमचे हसून स्वागत करते. (तेवढ्यात तिचा एक काळा दात दिसतो—शोभतो बरं का तो हिला!) त्या मुलींतली एक मुलगी उठते, तुमच्याकडे येते, तुम्हांला नेऊन एका टेबलापाशी बसविते—पण

बसविण्यापूर्वी तुमचा ओव्हरकोट वगैरे असला तर काढून ठेवते. बहुतेक तुमची ती नेहमीचीच मैत्रीण असते. तिला तुमच्या आवडीनिवडी माहीत असतात. तुमची तिची पहिलीच भेट असली तरी चारदोन वाक्यांत तुमची जात ती ओळखते. तुमच्या आवडीचे पेय मागवते. स्वतःसाठीही मागवते, पण त्यात मद्यार्क जवळ-जवळ नसतोच. (मद्यपानाने जपानी स्त्रियांच्या गालांवर जी लाली लगेच चढते ती तिला बिलकुल आवडत नाही.) आणि मग ती तुमच्याबरोबर पीत—खरे म्हणजे बोलत—बसते. अल्पावधीत आपली कधीकाळची सखी भेटली असे वाटायला लावते—तुमच्या खांद्यावर हलका हात ठेवते, तुमच्या नजरेत नजर मिळविते, तुमच्या हास्यात हास्य ओतते, तुमच्या भावनांत भावना मिसळते. तुमची भाषा येत नसली तरी तुमचे मन ओळखते—स्त्रीसहवासासाठी आसुसलेले तुमचे मन जाणते. तुमच्या अंतःकरणात शिरते. तुम्हांला नृत्याची लहर आली तर तुमच्याबरोबर नाचाची चार सलगीची पावले टाकते. (तिची दमलेली पावले ‘झोपली’ तरी चेहऱ्यावरचे चैतन्य नाचते.) तुमची चेष्टा, क्वचित कुचेष्टा करते (पण अतिरेक होऊ देत नाही—अतिरेक होतोसा वाटला तर घारीच्या नजरेची ममासान तेथ हजर होते नि तुमच्या चेष्टेत असा काही भाग घेते की ती चेष्टा क्षणात विरघळून जाते!) तुम्हाला चढली तर ती सावरते. त्या अवस्थेत तुमच्या खिशातले पैसे नाहीसे होत नाहीत आणि तिची मायाही कमी होत नाही! ती आदर्श प्रामाणिकपणाने वागते. ती पैसे चोरीत नाही, तसेच चुकून कधी दुसऱ्या मुलीचे आवडते गिऱ्हाईक चोरीत नाही. ती फक्त तुमचे चित्त चोरते—आणि हे चोरलेले चित्त जिभेवर खेळवीत तुम्हांला निरोप देते, ‘दोझो, माता इराशूशाही ने’—पुन्हा येणार ना? केव्हा येणार?

* * *

पेयगृहांकडून कॉफीगृहांकडे, हा काही फारसा स्पृहणीय प्रवास नाही, पण मी तुम्हांला कॉफीगृहात नेणार तो कॉफी पिण्यासाठी मुळी नाहीच. किंबहुना जे एक सहा मजली बादशाही कॉफीगृह आहे—ज्याच्या वरच्या वर्तुळाकार मजल्यावरून खालच्या मजल्यावर नजर टाकता येते आणि जी टाकताना वरच्या ताऱ्यावरून खालच्या ताऱ्यांवर, किंवा अधिक अचूक बोलायचे म्हणजे तारकांवर, नजर टाकल्यासारखे वाटते त्या ऐषआरामी वैभवशाली कॉफीगृहातही मी तुम्हांला नेणार नाही. कारण ही असली बादशाही कॉफीगृहे म्हणजे त्या भडक नाइट-

क्लबांच्याच आवृत्त्या. गिंझाची अव्वल कॉफीगृहे अशी भडक नसतात. ती सौम्य असतात आणि एक मृदू, सांस्कृतिक वातावरण तेथे दरवळत असते. संस्कृतीचा जन्म समृद्धीच्या खातेऱ्यात झालेला असतो असे एका खवट माणसाने म्हटलेले आहे, तसा या कॉफीगृहातील सांस्कृतिक वातावरणाचा जन्म त्यांच्यातील जीवघेऊ स्पर्धेत झालेला आहे. पण आपल्याला त्याच्याशी काय करायचे आहे ? आपल्याला फक्त चारदोन घटका या सांस्कृतिक वातावरणात रमून जायचे आहे, आणि चवीसाठी मधून मधून कॉफीचे घुटके घ्यायचे आहेत. तुम्हांला चित्रकलेचा नाद आहे काय ? मग तुम्ही माझ्याबरोबर या कॉफीगृहात या. येथले फर्निचर किती नमुनेदार आहे—सारे काही बांबूचे. खुर्च्या बांबूच्या, टेबले बांबूची, क्रॉकरी-कटलरीसुद्धा बांबूची ! जपान्यांनी झाडांच्या किडलेल्या खोडांतून स्थलचित्राचे सुंदर सुंदर नमुने निर्माण केले, ते काय बांबूंतून सौंदर्य निर्माण करण्यास चुकणार? पण मी तुम्हांला फर्निचर पाहण्यासाठी आणलेच नाही. ते काय, तुम्हांला हव्या त्या कॉफीगृहात आढळेल—दर कॉफीगृहात फर्निचरचा नवा नमुना ! एखाद्यात तुम्हांला भूमितीतील आकृत्यांचे दर्शन होईल, तर दुसऱ्यात शास्त्रज्ञाच्या प्रयोगशाळेतील उपकरणे आपण पाहत आहोत असा भास होईल ! मी तुम्हाला येथे आणले आहे ते तुमचा चित्रकलेचा नाद पुरविण्यासाठी. तो पाहा, समोर फळा आहे. शेजारी तऱ्हेतऱ्हेच्या रंगाचे खडू. जा आणि काढा हवे ते चित्र. तुम्हांला एखादे मॉडेल हवे का ? तुमच्यापुढे कॉफीचा ट्रे ठेवणाऱ्या मुलीकडेच जरा आर्त अपेक्षेने पाहा—ती थोडा वेळ मॉडेल म्हणून उभी राहील ! तुमचे लक्ष चित्रकलेपेक्षा संगीताकडे अधिक आहे ? हरकत नाही. या कॉफीगृहात कॉफीच्या मेनूबरोबर संगीताचाही मेनू देण्यात येतो. तुम्हाला हवी ती रेकॉर्ड सांगा —लगेच तिचे स्वर घुमू लागतील ! ( चारदोन गिऱ्हाइकांनी एकाच वेळी निरनिराळ्या रेकॉर्ड्स वाजवायला सांगितले तर काय होते ते मात्र मला विचारू नका—मला माहीत नाही. ) या पलीकडच्या कॉफीगृहात मुळी अभिजात संगीताचे जलसेच चालू असतात—आज बीटोव्हन तर उद्या मोझार्ट. त्यांचे कार्यक्रम आगाऊ प्रसिद्ध होत असतात. तुमचा आवडता कार्यक्रम निवडून तुम्ही या. आता कॉफीगृहाचा हा नमुना पाहा—या कॉफीगृहात पुष्परचनेचे पाठ दिले जातात; यात बाहुल्या करण्याचे; आणि यात दुसरे कसले ! यांतल्या या कॉफीगृहाची तर गंमतच आहे. त्याच्या कौंटरवरची मुलगी तुम्ही आलात की

तुमच्याकडे एक सौम्य हास्याचा कटाक्ष टाकते आणि मग सारा वेळ कौंटरवरच्या फुलदाणीतील फुलांशी खेळत बसते — त्या वेळी तिच्या कर्दळीच्या कळ्यांसारख्या बोटांची जी हालचाल होत असते ती नुसती वेड्यासारखी पाहत बसावेसे वाटते. एका कॉफीगृहात उत्तम कलाकृतींचा संग्रह आहे, तर दुसऱ्या एकात दुर्मिळ पुस्तकांचा आहे. अशा एक ना हजारो युक्त्या टोकियोतल्या तीन हजार कॉफीगृहांच्या मालकांनी एकमेकांवर मात करण्यासाठी योजलेल्या आहेत — आणि गिंझात तर या युक्त्यांना उधाण आलेले आहे. कोठे नग्नप्राय परिचारिका आहेत, तर कोठे त्यांच्यावर कपड्यांचे उद्याचे नमुने घालून कॉफीगृहाचे रूपांतर फॅशन-शोमध्ये केलेले आहे. मला मात्र हे मंद मंद प्रकाशाचे कॉफीगृहच आवडते! बाहेर प्रकाशाचा झगमगाट माजलेला असताना येथे फक्त मेणबत्त्यांचे नंदादीपच तेवत असतात. नेत्रज्योतींच्या त्या मंदमधुर प्रकाशात अंतःकरण पावित्र्याने भरून जाते, भारून जाते!

आता खूप थकवा आला आहे. पाय दमले आहेत. पोटात भूक जाणवत आहे. नजरा पेयगृहाकडून अगर कॉफीगृहाकडून आहारगृहाकडे वळत आहेत; आहारगृहांच्या दर्शनी कपाटांत तयार पदार्थांच्या प्लेटी लावून ठेवलेल्या आहेत, त्यांच्याकडे पाहून तोंडाला पाणी सुटत आहे. त्यांचा स्वाद नाकात शिरतोसे वाटत आहे. जपानी अन्नाच्या कलात्मक रंगाने डोळे वेधले गेले आहेत. एखाद्या आहारगृहात शिरण्याचा विचार जोरात सुरू होतो. आपण जपानी अन्नाची कीर्ती ऐकलेली असते. सुकियाकीची ख्याती आपल्या कानांवर आलेली असते. सुशीची चव मनात भरलेली असते. टेम्पुराची टेसदार वर्णने आठवत असतात. पण याहीपेक्षा विशेष म्हणजे जपानी आहारगृहातल्या भोजनपद्धतीच्या कथांनी आपले मन पुरे भारलेले असते. या आहारगृहातील किमोनो-कन्या तुमचे स्वागत करते, तुम्हांला एका बैठ्या टेबलापाशी बसविते, तुमचे कपडे खराब होऊ नयेत म्हणून त्यांच्यावर एक मलवस्त्र पसरते आणि तुम्ही सुरुवातीच्या सूपाची चव चाखता तोच ती शाक, मांस आणि मद्य यांच्या मिश्रणाची चवदार किमया तुमच्या डोळ्यांदेखत करून दाखवते. सुकियाकीपेक्षा सुशीने तुमचे मन आकर्षिले असेल तर समोरच्या त्या उभ्या कौंटरच्या दुकानात चला. तेथला आचारी चांगल्या जिवंत हलत्याचालत्या माशाचा ताजा करकरीत तुकडा तुमच्या देखत कापून त्याची सुशी बनवून तुम्हांला देईल आणि ती खाताना तो तुकडा तुमच्या तोंडात

उड्या मारतो आहे असे तुम्हांला वाटेल. टेम्पुरा म्हणजे भज्यासारखा तळलेला मासा, त्याची तुम्हांला अपूर्वाई नसेलच. तुम्हांला कदाचित जपानात येऊन चिनी जेवण जेवण्याची लहर आली असेल – अनेकांना येते – ठीक. येथे अनेक चिनी आहारगृहे आहेत आणि फिरत्या टेबलावर तुम्ही म्हणाल तेव्हा चिनी चहा, पक्ष्याच्या घरट्याचे सूप, चौचौ, आणि माशाचा आणि कोळंब्याचा अगर मांसाचा थोडा कडू थोडा गोड प्रकार आणून हजर करण्याबद्दल त्यांची ख्याती आहे. कदाचित तुम्हांला पाश्चात्त्य जेवण हवे असेल. हंगेरिअन गुलाशची तीव्र आठवण झाली असेल. हरकत नाही. या हंगेरिअन आहारगृहातले वेटर्स थेट हंगेरिअन शेतकऱ्याचा रंगदार पोशाख करून तुम्हाला तो खाऊ घालील. येथे गिंझात तुम्ही म्हणाल तसले जेवण तयार आहे — अ ला अमेरिकन, ला बेल फ्रान्स, ल ' एस्प्यानॉल, इतालिएन किंवा सुद अमेरिकानो — तुमची आवड ठरविण्याचा अवकाश, तुमच्या आवडीप्रमाणे तुम्हांला स्टिक, ऑनियन सूप, रिसोटो कॅटालान, स्पॅग्हेटी ( अधिक किआंटी ) – काय म्हणाल तो पदार्थ खिलवण्याची त्यांची तयारी आहे. गिंझातल्या या आहारगृहांनी, या युगात पिकलेली, एकेक अंग आळविण्याची विद्या आत्मसात केलेली आहे — एका आहारगृहात तुम्हांला फक्त सारडीन माशांचेच पदार्थ मिळतील; दुसऱ्या एकात फक्त पंख असलेल्या प्राण्यांच्याच चर्बीचा पदार्थ घेतला जाईल; आणि तिसऱ्यात फक्त कालवे ! या आहारगृहांच्या या आवडीनिवडी त्यांच्या दर्शनी भागावर येऊन विराजमान होतात. एका कालवप्रिय आहारगृहाने आपल्या प्रवेशद्वारावर कालवाच्या शिंपल्यांचे प्रसाधन केले आहे, तर दुसऱ्या एका आहारगृहाच्या डोकेबाज मालकाने आपले दुकान सुमिदा नदीच्या कालव्यातील एका पडावावर थाटले आहे !

आपण भोजन आटोपून बाहेर येतो तो अकरा वाजलेले असतात. गिंझातला झगमगाट मंदावलेला असतो. एकेक दिवा मालवत असतो. एकेक निऑन विझत असतो. वातावरणावर अंधाराचा शिडकावा बसत असतो. काही ठिकाणी काळोखाची पुटेच भासतात. एका निऑन लाइटच्या प्रकाशात दुसरा विझलेला निऑन एखाद्या मृत देहाच्या सांगाड्यासारखा विद्रूप दिसतो. एका नाइट-क्लबच्या भिंती आत भकास दिसतात, आणि पेयगृह कडीकपाटात बंद करून ठेवल्यासारखे भासते. आता काळोख वाढलेला आहे. मॅग्नोलियाचे पक्षी चिपचाप

झालेले आहेत. कॉफीगृहातली दरवळ वितळली आहे. रस्त्यातली वर्दळ विरत चालली आहे. आता ती फुलवाली दिसत नाही. ज्योतिष्याचा कंदील प्रकाशत नाही. पाय ओढीत चाललेल्या त्या कलावंताची मुरली वाजत नाही. आपले बिऱ्हाड गुंडाळून चाललेल्या चित्रकारापुढे कसलीही आकृती आकारत नाही. गिंझाच्या साऱ्या शक्ती आता मंदावल्या आहेत. सारे चैतन्य आता मालवले आहे. सारा उल्हास आता कोळपला आहे. आता प्रत्येकाच्या डोळ्यांपुढे आपले खाजगी खुराडे आहे, किंवा स्वतंत्र चाळे आहेत. ती अलाउद्दिनाच्या गुहेतली अरब कन्या पाहा—आता तिच्या अंगावर नेहमीचा पोशाख आहे—तिचा कोमल हात एका अमेरिकन सोजिराच्या राठ हातात आहे, आणि त्याच्याशी नुकतीच झालेली दोस्ती व्यवस्थित वटविण्याची इच्छा तिच्या चेहऱ्यावर दिसते आहे. आणि ही ? ही आपली 'ममासान '—तिचा किमोनो कायम आहे, पण तिच्या हातातली व्यापारी बॅग किमोनोच्या संस्कृतीची जणू चेष्टाच करीत आहे. आणि ही ?—कौंटरवरच्या फुलदाणीतली फुले आपल्या बोटांच्या चैतन्याने तजेल करणाऱ्या या मुलीची चाल कशी मरगळलेली आहे पाहा. आणि हा कोण ?—पेयगृहात पाहिला होता. एका किमोनो-कन्येकडे नोटांची पुडकी फेकीत होता. आणि आता ?—झुकांड्या जात आहेत आणि झिंगलेले हात खिशातून फुटकळ नाणी काढून परतीच्या तिकिटासाठी ती पुरतील किंवा नाही याचा अंदाज घेत आहे! आणि ही ? ही ती पेयगृहातली आपली सखी! पण तिच्यापाशी हे कोण ?—मूल! तिचेच मूल! कोठे होते ते इतका वेळ ? आपल्याला वाटले होते ही अविवाहित, हातात रोमान्सचा पंखा घेऊन प्रणयाच्या गालिच्यावर परीची पावले टाकणारी किमोनो-कन्या! पण ही तर चक्क आई – चारदोन काटक्यांच्या घरट्यात आपल्या पिलाला झोपविण्यासाठी चालली आहे!

संपले – गिंझाच्या रंगभूमीवरचे या साऱ्यांचे आजचे काम संपले! आता ती सारी आपापल्या खाजगी जगात जातील—आणि उद्या संध्याकाळी आजचेच मुखवटे चढवून परत येतील!



जपानला मी तीनदा गेलो, पण एकाही मुक्कामात गेशांच्या कार्यक्रमाचा अनुभव घेतला नाही. या माझ्या म्हणण्यावर तुमचा विश्वास बसणार नाही हे मला माहीत आहे, पण ही साधी वस्तुस्थिती आहे. अर्थात ही विचित्रपणाची कमाल आहे. कारण गेशांना जपानबाहेर अक्षरशः तोड नाही. जपानची गेशा म्हणजे खरोखर इहलोकीची अप्सरा. ही देवांचे मनोविनोदन न करता मानवांचे ( पुरुषांचे ) मनोविनोदन करते, एवढाच फरक. पण तिच्या संगतीत पुरुष स्वतःला देवच समजतात—आणि यात त्यांचा फारसा दोष नाही. गेशांचा तो गुणच आहे.

तुमची करमणूक करणे हेच गेशांचे मुख्य कार्य. तिचे कौशल्य अनेक प्रकारांनी व्यक्त होते. ती तुम्हाला गोष्टी सांगते, तुमच्याशी विनोद करते, तऱ्हेतऱ्हेचे खेळ खेळते, तुम्हाला खाऊ पिऊ घालते, नाचून दाखविते, गाऊन दाखविते आणि सामीसेनच्या स्वरांनी सारे वातावरण करुणरम्य करून सोडते. विशेष म्हणजे हे सारे करताना तुमच्या मनात रोमांचाचे मळे फुलविते, अंतःकरणात काव्याचे बगिचे बहरते आणि सभोवतालच्या गद्य वातावरणात आनंदाचे अमृत ओतते. हे ती अशा काही जादुगिरीने करते की तुम्हाला वाटते तुमची एक जिवाभावाची मैत्रीणच तुम्हाला भेटली! किंवा एक नवीन रसरंग व्यक्ती तुमच्या जीवनात शिरली! खरोखर गेशांचे व्यक्तित्व म्हणजे निसर्गाची एक खेळकर लकेर! तिचा कटाक्ष म्हणजे निळ्याभोर आकाशाची एक कडा, आणि तिचा बोल म्हणजे दयाळ पक्ष्याच्या गायनाचा एक तुकडा! आपल्या चित्ररम्य किमोनोची बाही फडफडवीत, आपल्या लालचुटुक झोरीची कडा उडवीत, आणि आपल्या शुभ्रसतेज हास्याची शोभा उधळीत ती आली की वाटते, ही एखादी रंगदेवताच अवतरली — दूर रंगभूमीवर नव्हे तर अगदी आपल्या आसपास!

गेशांचे असे गहिरे वर्णन मी वाचलेले असते. गेशा, चेरी आणि फुजी ही जपानची वैशिष्ट्यशाली त्रिपुटी. चेरीच्या हंगामात मी प्रथम गेलोच नाही. फुजीच्या शिखरावरचा ढगांचा पडदा कधी दूर झालाच नाही. पण गेशांच्या पार्टीत

सामील व्हायला निसर्गाची अशी कोणती अडचण नव्हती. तरी तशी संधीच मी शोधली नाही. कारण मला माहीत होते की, गेशांची खरीखुरी गंमत अनुभवायची असेल तर जपानी भाषा यायला हवी. दुभाष्यामार्फत अनेक गोष्टी जमतात. जपानात अशा अनेक गोष्टी जमवून घेतच होतो. पण दुभाष्याला अंतःकरणाची देवघेव जमत नाही—आणि काही ठराविक काळ का होईना, आणि ठराविक पातळीवरून का होईना, पण एक प्रकारची अंतःकरणाची देवघेवच गेशा करीत असते. मला जपानी भाषा येत नव्हती, म्हणून मी गेशांशी गप्पागोष्टी करू शकत नव्हतो, विनोद करू शकत नव्हतो, खेळ खेळू शकत नव्हतो. अर्थात नृत्य पाहू शकत होतो, गाणे ऐकू शकत होतो, सामीसेनच्या स्वरांनी कान भरून घेऊ शकत होतो—पण मनोमनीचे नाते निर्माण झाल्याखेरीज त्यात रस निर्माण होऊ शकत नव्हता, जिव्हाळा निर्माण होऊ शकत नव्हता. गेशांच्या कार्यक्रमात नृत्याचे महत्त्व नृत्य म्हणून नसते आणि गायनाचे संगीत म्हणून नसते !

पण मी गेशा-पार्टीला जाण्यासाठी जीव न पाखडण्याचे खरेखुरे कारण निराळेच होते—आणि ते म्हणजे टोकियोच्या एका आरामगृहात गेशाची एक संक्षिप्त आवृत्ती मला भेटली होती आणि तिने दिला तेवढा अनुभव मला पुरे होता.

टोकियोच्या सुमिदा नदीच्या काठी अशी अनेक उपाहारगृहे किंवा आरामगृहे आहेत की, नुसत्या चहापानासाठी तुम्ही गेलात तरी अंतःकरणात रसिकतेची वसंतपंचमी साजरी करून बाहेर पडाल. आधी मुळी या आरामगृहाचे अभिजात जपानी वास्तुशिल्पच तुमचे चित्त वेधून घेते, आणि टोकियोमधल्या लाकडी खोक्यासारख्या घरांच्या भुस्कट वास्तुशिल्पाने शिणलेली तुमची दृष्टी ताजीतवानी होते. तुम्हाला नकळतच ती या इमारतीच्या वक्र लयदार छपरांवरून फिरू लागते; पण हे झाले नुसते बाह्य आकर्षण. आवाराचे द्वार ओलांडल्याबरोबर तुमचे पाऊल पडते ते एका शांतप्रसन्न बागेत. तेथून तुम्ही इमारतीत प्रवेश केला न केलात तोच तुम्ही एका किमोनोकन्येच्या ताब्यात जाता. तेथे ती तुमचा जो कबजा घेते तो ती तुम्हाला परत प्रवेशद्वारापाशी आणून तिने ( तुम्हाला नकळत पण तुमच्याच पैशाने ) बोलावलेल्या टॅक्सीत सोडीपर्यंत. तोपर्यंत ती तुमच्याभोवती एखाद्या फुलपाखरासारखी नाचत राहते, तुमच्या सिग्रेटच्या धुराच्या

वलयासारखी तुमच्या वातावरणात विलीन होते, तुमच्या पेयाच्या सोनेरी धारेची झळाळी तुमच्याभोवती निर्माण करते, आणि तुमच्या चित्तात आनंदाच्या अमृतलहरी आणून सोडते. तुमचे या आरामगृहातले वास्तव्य तिच्या आतिथ्याने भारलेले असते. तिच्या बोलांनी ते बोलके बनते, तिच्या हालचालींनी वेडावून जाते, आणि तिच्या तालावर नाचत असते. येथल्या पेयाला तिच्या स्पर्शाची रुची असते. येथल्या गप्पांना तिच्या बोलांनी कलाटणी मिळते. आणि येथल्या करमणुकीला तिच्या कल्पनांनी स्फुरण चढते. तुमच्या येथल्या अस्तित्वाची ती राणी असते – तिच्यामुळेच तुम्ही येथे येता, येथे बसता, येथे रेंगाळता आणि येथल्या प्रत्येक क्षणागणिक तुम्ही पैसा मोजीत असता हे अतिशय सुखासमाधानाने विसरता!

*　　　*　　　*

त्या दिवशी संध्याकाळी फुकुशाशा आणि यामाकिटा हे माझे दोन मित्र अशा एखाद्या आरामगृहात जाण्याची कल्पना काढतात आणि मी पूर्वीचा काहीही अनुभव नसूनदेखील भारावून जातो.

त्या आरामगृहाच्या आवाराचे फाटक जरासे उघडते आणि शांततुष्ट प्रसन्नतेचेच दर्शन झाल्यासारखे वाटते. आम्ही आत जातो नि टोकियोचे कर्कश धुळकट जग बाहेर राहते. आमचा प्रवेश एका बगिच्यात होतो. बगिचा कसला तो? एक तळे! तळ्याचे पाणी इकडे तिकडे पसरलेले असते, वाहत असते, अनेक रीतींनी आणि आकारांनी आपले अस्तित्व जाणवत असते. त्या पाण्याची सोय पाहूनच बागेतली झाडेझुडपे वाढलेली असतात. बागेत समोरच एका (कृत्रिम) खडकाच्या खबदाडीतून पाण्याचा झोत पडताना दिसतो. हा शेजारच्या सुमिदा नदीतूनच आणलेला असेल, पण नदीच्या पाण्यापेक्षा याचे दर्शन किती निराळे! जणू सारी स्वच्छता, निर्मळपणा, आणि स्वच्छंद घेऊन तो आताच आकाशातून उतरला आहे! आणि पृथ्वीवरील पराक्रमाच्या कल्पनेने सळाळून गेला आहे! या झोताचेच पाणी पसरते आणि तळे निर्माण करते. या तळ्याच्या मधोमध एक झाड आहे. त्याच्या पिसाट फांद्या तळ्यावर पसरल्या आहेत. त्याचा बुंधा त्याच्या प्राचीनपणाची आणि त्याच्या बेफाम वाढीची ग्वाही देत आहे. त्याच्या खोडाला इतक्या गाठी, इतकी पोके आणि इतकी खबदाडे आहेत की, जपानची बेटे समुद्रातून वर येण्याच्या वेळी उसळलेल्या

प्रलयात गटांगळ्या खाणारा एखादा प्राणी येथे येऊन अडकला आणि पृथ्वीवर अस्तित्व मिळविण्यासाठी या झाडाच्या रूपाने वाढला !

त्या तळ्याच्या पाण्यात चित्रविचित्र आकारांचे आणि मातीच्या व शेवाळाच्या रंगांचे दगड निरनिराळे काटकोन साधून टाकलेले असतात, त्यांच्यावरून उड्या मारीत आम्ही वेलींनी वेढलेल्या एका दरवाज्यात जातो आणि आरामगृहात प्रवेश करतो. दरवाज्याच्या आत ओसरीतच पादत्राणांच्या रांगा दिसतात आणि जपानी घरात शिरण्याच्या प्राथमिक उपचाराची आठवण होते. पायातली पादत्राणे काढण्यासाठी बुटाच्या लेसांना हात लावतो न लावतो तोच तीन किमोनो-कन्या ओरीच्या चवड्यावर तुरतुरत येतात, आणि आमचे बूट काढू लागतात. माझे बूट दुसऱ्या कोणी काढावे हे मला आवडत नाही. माझ्या बुटाची लेस पकडू पाहणारा हात मी दूर करतो, आणि एका नाजूक स्पर्शाची जाणीव माझ्या हातावर उमटते. बूट पायातून निघाल्याबरोबर कलात्मक वेलबुट्टीच्या सुंदर सपाता आमच्या पायात चढतात. हा विधी सुरू असताना आमची नजर इकडे तिकडे भिरभिरते आणि गॅलरीत प्रत्येक खोलीच्या समोर आतिथ्याच्या आणि प्रसाधनाच्या किमोनोधारी प्रतिमा दृष्टीस पडतात. त्यांच्या डोक्यावर केशकलापाचे रचनाबद्ध मुकुट नसतात; कर्तनकलेचे आधुनिक संस्कार मिरविणारे त्यांचे केस रुळत, भुरभुरत असतात – आणि या गेशा नव्हत याची जाणीव होते. क्षणार्धात त्या साऱ्यांच्या काळ्याभोर नजरा आमच्याकडे वळतात आणि क्षणभर पापण्या फडफडावून पुन्हा जमिनीचा वेध घेत स्थिरावतात ! जपानी सौंदर्याच्या या सरमिसळ रांगेची अधिक दखल घेण्यास फुरसत नसते. आमच्यासमोर सपाता सरकावणाऱ्या मुलींतली एक ‘ डोझो ’ ‘ डोझो ’ करीत आम्हाला एका खोलीत घेऊन जाते.

आम्ही खोलीत शिरतो नि पाहतो तो खोली अगदी मोकळी, निर्लेप. तेथ फर्निचरचे नाव नाही. स्वच्छ ततामी (चटई) तकाकते आणि खोलीचा रिकामेपणा अधिकच जाणवतो. जपानी घराच्या खोल्या अशाच असतात असे मी ऐकले होते, पण असल्या उपाहारगृहात फर्निचरची व्यवस्था असेल असे वाटले होते. मी थोडा आश्चर्याने पाहतो तोच त्या दुसऱ्या दोन मुली घाईघाईने येतात नि भिंतीत लपलेली कपाटे उघडून त्यांतून तीन चौरंग आणि सहा गिरद्या बाहेर काढतात. लगेच ते चौरंग मांडतात आणि दरेक चौरंगाभोवती दोन दोन गिरद्या टाकतात.

त्यांचे चौरंग मांडणे, गिरद्या टाकणे चालू असते तो आम्हाला घेऊन येणारी मुलगी फुकुझावांना काही तरी विचारते. त्याबरोबर एकदम हशा पिकतो. आम्हाला घेऊन येणारी मुलगी तर त्या हशात फारच जोराने सामील होते. का नकळे, मला वाटते, ते मलाच हसत आहेत; चौरंगाभोवती मला गुडघे टेकून अगर मांडी घालून बसता येईल की नाही याची त्यांना शंका वाटत आहे; पाश्चात्त्य पाहुण्यांची असे बसताना जी धांदल उडते ती त्यांच्या डोळयांसमोर उभी राहिली आहे; आणि मी त्यांच्यातलाच अशी त्यांची समजूत झाली आहे. त्यांची गैरसमजून होत आहे, त्यांना भारतीयांची माहिती नाही, हे मला समजत असते. त्यांचा भ्रमनिरास करून त्यांना लगेच चकित करता येईल हेही मला माहीत असते. पण हा हशा माझ्यामुळे पिकला हीच गोष्ट मला लागते, आणि मी तसाच हिरमुसल्या चेहऱ्याने उभा राहतो. त्यातली एक मुलगी एका गिरदीकडे बोट दाखविते नि मला म्हणते 'दोझो', तरी मी उभाच राहतो. फुकुझावा आणि यामाकिटा गिरद्यांवर बसून चौरंगावरच्या ओल्या टॉवेलने आपले चेहरे साफसूफ स्वच्छ करू लागलेले असतात. तरी मी उभाच. आता पिकलेल्या हशात, मला 'दोझो' म्हणणाऱ्या मुलीने बेताचाच भाग घेतलेला होता हे जाणवलेले असूनही मी उभाच. तेव्हा ही मुलगी हळूच माझ्या हाताला स्पर्श करते नि म्हणते 'दोझो'. आता तिच्या आवाजात अशी काही नाजुक किणकिण जागवते, आणि तिच्या त्या स्पर्शात असा काही आपलेपणा भासतो की माझा हिरमुसलेपणा कोठच्या कोठे पळतो. मी मनमोकळे हसतो नि गिरदीवर बसतो—आणि मला मांडी घालून झकास बसता येते हे दाखविण्यासाठी ऐटीने मांडी मोडतो आणि बदलतो. तिच्या ते ध्यानात येते आणि ती हसते—बेताचे हसते, इतके बेताचे की सुरंगीच्या कळीची एक पाकळी उमलली असे वाटते. हसते नि सिग्रेटच्या पेटीतली एक सिग्रेट काढून मला द्यायला लागते. मी ओल्या टॉवेलने तोंड पुसता पुसता, नको म्हणतो. त्याबरोबर तिच्या चेहऱ्यावर आश्चर्य उमटते आणि त्यात एक निराशेची रेषा तरळते. मी सिग्रेट ओढत नाही ही माझ्यात काही तरी उणीवच आहे असे तिला वाटत आहे असे मला वाटते, आणि आत काही तरी खुपते. माझे मित्र सिग्रेट शिलगावून धूर सोडीत असतात आणि एक प्रकारच्या बेफिकीर नजरेने धुराच्या वलयांचा वेध घेत असतात आणि मी मात्र इकडे चौरंगावरची काड्याची पेटी निरखीत असतो. पेटीच्या लेबलावर एका मोहरलेल्या फांदीचे नाजुक नक्षीदार चित्र असते, आणि मला एकदम कोरिनच्या 'प्लम ब्लॉसम' या विख्यात

चित्राचे स्मरण होते. त्याबद्दल तिला काही तरी विचारावेसे वाटते, पण भाषेच्या अडचणीमुळे विचारता येत नाही. मित्रांच्या साहाय्याने विचारता आले असते, पण आता तिच्याशी बोलताना मित्रांची मध्यस्थी नको असे वाटते. तिच्याशी आता नुसते निःशब्द संभाषण, असे मी ठरवितो आणि तिच्याकडे पाहून नुसताच हसतो. इतक्यात जाणवते की तिचे नाव आपल्याला माहीत नाही, आणि मुलीचे नाव माहीत नसणे म्हणजे कोणत्या फुलाचा अमका गंध हे ध्यानात न येणे. माझा निःशब्द संभाषणाचा बेत मोडतो नि मी तिला इंग्रजीत विचारतो, तुझे नाव काय. तिला ते काहीच कळत नाही नि ती गोंधळून हसते, व फुकुझावाकडे पाहते. फुकुझावा माझा प्रश्न तिला जपानीत सांगतात आणि तिच्या जपानी उत्तराचे भाषांतर मला सांगतात—‘ प्लम ब्लॉसम. ’ मी पेटीवरच्या चित्रावर बोट ठेवतो आणि खुणेनेच विचारतो, ‘ खरोखर ? ’ ती गोड हसते नि खुणेनेच सांगते, ‘ होय ’. मला आश्चर्य वाटते. खरेच, हिचे नाव ‘ प्लम ब्लॉसम ’ की ही माझी नुसती गंमत ? पण लगेच वाटते, करीना का ती गंमत ? गंमत असली तरी किती गोड आहे ही गंमत ?— हे नाव किती छान आहे ? — काही का असेना तिचे खरे नाव ? — या वेळेपुरते तिचे नाव प्लम ब्लॉसमच ! मी तिला हळूच हाक मारतो, ‘ प्लम ब्लॉसम. ’ त्याबरोबर तिचा चेहरा उमलतो — अगदी कोरीनच्या त्या मोहरलेल्या फांदीवरच्या एखाद्या फुलासारखा ! गुलाबी चेहरा, काळेशार डोळे, फडफडत्या पापण्या, लालचुटुक ओठ आणि पांढरे शुभ्र हास्य—वाटते, कोरीनच्या चित्राचा जिवंतपणा या असल्या चेहऱ्यात आपले प्रतिबिंब उमटविण्याच्या शक्तीत आहे !

इतक्यात आम्हांला खोलीत घेऊन येणारी मुलगी — तिच्या किमोनोवर बांबूच्या कोवळ्या पानांची चित्रे असतात; मी तिचे नाव ठेवतो चिवार ! — ती मुलगी येते. तिच्या हातात साकेच्या तीन बाटल्या नि तीन पेले असतात. ती एकेका चौरंगावर एकेक बाटली नि एकेक पेला ठेवते. फुकुझावा तिला काही तरी सांगतात नी ती साकेची बाटली-पेला घेऊन जाते नि लगेच बीअरची बाटली व ग्लास घेऊन येते. फुकुझावांना साकेपानाचा नाजुक नखरा पसंत नसतो. पेय कसे तोंडभर प्यावे नि पोटभर प्यावे अशी त्यांची थिअरी असते आणि त्यांचे शरीरही या थिअरीला पोषक असे स्थूल बुटके असते. पण

यामाकाटांची साकेभक्ती अस्सल असते. रसिक असते. साकेचा एकेक थेंब जिभेवर विरघळवीत, त्याच्या कणांनी शरीरातले चैतन्य हळूहळू फुलवीत, नजरेवर सोनेरी स्वप्नांची फुलपाखरे नाचवीत, आणि अखेरीस मस्तकात उसळलेल्या लाटांवर कल्पनांच्या लहान लहान होड्या डोलवीत बाटलीतला शेवटचा थेंब पेल्यात ओतण्यात साकेपानाच्या कलेचा विकास आहे — आणि या कलेच्या आस्वादात शेजारच्या मुलीस सामील करून घेण्यात साकेपानाचे सार्थक आहे — हे ते जाणतात. मुलीने भरलेला छोटा पेला ते दोनही हातांनी हलकाफुलका उचलतात, क्षणभर तसाच तो हातांनी धरून आपली आर्त नजर त्या मुलीच्या कोवळ्या नजरेवर रोखतात; मग नजरेवर एक हसू खेळवितात आणि पेला ओठाला लावतात; साकेचा एक थेंब चाखतात आणि तो पेला तसाच मुलीपुढे धरतात. ती खुदकन् हसते, गोड हसते, आणि हलक्या हाताने तो पेला त्यांच्याकडे लोटते. लोटते नि त्यांना काही तरी म्हणते. तेव्हा ते आपली सारी नजर त्या पेल्यावर लावतात, दोनचार क्षण तसेच पाहत राहतात; आणि मग पेला तोंडाला लावून एका घोटात रिकामा करतात. रिकामा करतात नि तसाच पुनः भरतात—आणि तिला देतात. आता ती तो स्वीकारते, नाजुक हाताने तोंडाकडे नेते आणि अतिशय आकर्षक पद्धतीने पिऊन टाकते. पिते, भरते नि परत त्यांना देते—आणि त्यांचे कणाकणाने पिणे पुन्हा सुरू होते.

इतका वेळ मी नुसता पाहतच असतो. प्लम ब्लॉसमने पेला भरलेला असतो, मी तो दोनही हातांनी धरलेला असतो, पण तो तोंडाकडे मात्र नेत नाही. तो पेला माझे चित्त खेचीत असतो. त्याचा एकेक थेंब तोंडात विरघळला म्हणजे देहातले चैतन्य कसे शहारते, कसे मोहरते याची कल्पना तो चेतवीत असतो. पण मादक द्रव्ये माझे चैतन्य मोहरवीत नाहीत, हरपवितात हा अनुभव मला साशंक करतो. हा पेला घेतला तर त्याचे परिणाम काय होतील याची शंका मनात रेघोट्या ओढते, आणि मी तो पेला तसाच थिजल्यासारखा हातात धरून राहतो. साकेभक्त यामाकाटांना हे पाहवत नाही. ते मला पिण्याचा आग्रह करतात आणि मी चेहरा आंबट करून हसतो. तेव्हा ते प्लम ब्लॉसमला काही तरी सांगतात आणि ती माझ्या हातातला पेला अलगद काढून घेऊन माझ्या तोंडाकडे नेऊ लागते. मी चपळाई करून तो पकडतो आणि तोंडाला लावून रिकामा करतो. पुढे काय करायचे मला माहीत असते.

आताच यामाकाटांकडून ते शिकलेले असते. मी तो पेला भरतो आणि प्लम ब्लॉसमपुढे करतो. पण ती तो घेत नाही. काही तरी बोलते. मला अर्थात ते समजत नाही. मी यामाकाटांकडे पाहतो. तेव्हा ते म्हणतात, तिचे असे म्हणणे आहे की आपण हा पेला घेतला तर तो भरून उलट तुला द्यावा लागेल, पण त्याला तर तुझी तयारी दिसत नाही, म्हणून ती गोंधळली आहे. त्यावर मी म्हणतो, खरेच मला आणखी एक पेला घेणे मुळीच शक्य नाही. त्यावर ती म्हणते ( आणि ती म्हणते ते यामाकाटा मला सांगतात ), " आपण पुन्हा घेणार नसाल तर आपल्या हातची साके पिण्याच्या भाग्यास मला मुकावे लागले. " ती असे म्हणते नि माझ्याकडे गंभीर नजरेने पाहते. त्यात एक निराशेची छटा भासते. पारिजातकाच्या पाकळीवरचा हा ओरखडा मला सहन होत नाही. मी लगेच तो भरलेला पेला तिच्यापुढे धरतो—आणि माझी नजर काय म्हणायचे ते म्हणते. लगेच ती हसते, मोकळे हसते नि पेला रिकामा करते. लगेच पेला पुनः भरतो नि नाजुक हातांनी माझ्यापुढे येतो. मी तो घेतो आणि तोंडाला लावतो. पितापिता माझी नजर अभावितपणे मिटते—मिटलेल्या नजरेवर कसले भाव नाचतात नकळे, पण ती मिस्किल हसते आणि मी तिच्या हसण्याची परत-फेड करतो.

जरा वेळाने खाण्याचे पदार्थ येऊ लागतात. ते येत आहेत तोच चिवार स्पिरिटचा स्टोव्ह घेऊन येते आणि तो पेटवते. इतक्यात दुसरी एक मुलगी एक परडी घेऊन येते. परडीत मांस, नाना प्रकारच्या भाज्या आणि साकेची बाटली असते. लगेच एक परात स्टोव्हवर चढते आणि परातीत परडीतले जिन्नस शिजू लागतात. मी यामाकाटांना हे काय म्हणून विचारतो. यामाकाटा सांगतात, ही सुकियाकी, जपानच्या पाकशास्त्राची राणी, जपानी जिव्हेची अधिष्ठात्री. जिव्हेला कशी लागेल नकळे, पण ती शिजत असतानाचे दर्शनच मला मजेदार वाटते. तापलेल्या परातीत शिजतानाचा ओल्या भाज्यांचा चुरचूर आवाज, आगीच्या धगीने त्यांचे क्षणाक्षणाला बदलणारे रंग, आणि त्यात साके ओतल्याबरोबर उसळणारा घमघमाट—माझ्या संवेदनांची चेतना माझी मलाच जाणवू लागते. माझे लक्ष सुकियाकीत गुंतलेले असते तोच सारे चौरंग खाद्यपदार्थांच्या बशांनी व पेल्यांनी भरून जातात. या पदार्थांचे आणि त्यांच्या बश्यांचे व पेल्यांचे रंग माझी दृष्टी वेधून टाकतात आणि मी त्या पदार्थांकडे भारल्यासारखा बघत राहतो. हे

खायचे पदार्थ आहेत, आपल्या जिव्हेला त्यांचे आवाहन आहे, आपल्या रुचि-सामर्थ्याची त्यांच्यात आराधना आहे ही गोष्ट मी विसरून जातो. प्रत्येक बशी, प्रत्येक पेला म्हणजे सौंदर्याचा नमुना असतो. प्रत्येक पेल्याचा रंग, आकार—पेल्यागणिक नवा, आणि पेल्यागणिक वेड लावणारा! प्रत्येक पेला म्हणजे जणू काय एकेक प्रयोगच! या एकेक प्रयोगाने माझे चित्त भारून जाते. इतक्यात फुकुझावा सांगतात की यांपैकी प्रत्येक बशीला, प्रत्येक पेल्याला इतिहास आहे, परंपरा आहे, आणि हे उपाहारगृह या परंपरेला जिवापाड जपत असते. पैशाची रास ओतली तरी या वस्तू विकायला ते तयार होणार नाही. मला एकदम ते तळ्यातले झाड आठवते—वाटते, ते झाड, या बश्या, हे पेले, यांच्यामध्ये एक जिव्हाळ्याचे नाते आहे आणि या नात्याचा या उपाहारगृहाला अभिमान आहे.

सुकियाकी तयार होते—आणि आमच्या बश्यांत वाढली जाऊ लागते. तिची चव आमच्या जिभेवर वितळते आहे आणि तिचा स्वाद आमच्या वृत्तीत मिसळतो आहे तोच प्लम ब्लॉसम माझ्या चौरंगावरची साकेची बाटली घेते नि स्टोव्ह-वरच्या सुकियाकीत ओतते—एकदम चुर्र आवाज येतो आणि घमघमाट पसरतो. प्लम ब्लॉसम त्या साकेने भरलेला तेवढाच भाग काढते, आणि माझ्या बशीत टाकते – आणि एकदम खट्याळ हसते. त्याबरोबर सारेजण हसतात; आणि मग यामाकाटा म्हणतात की तुमच्या चौरंगावरची साके तुमच्या पोटात गेलीच पाहिजे असा तुमच्या मैत्रिणीचा कटाक्ष आहे! तिच्या नजरेच्या कटाक्षाइतकाच हा कटाक्ष मला सुंदर वाटतो. माझ्या साकेची चव शोधीत मी सुकियाकी खाऊ लागतो.

खाणे संपले—आता काय? खरे म्हणजे प्लम ब्लॉसमशी गप्पा मारायला हव्यात. ती हसली म्हणजे तिचे काळेशार डोळे मासोळीसारखे उड्या मारतात हे तिला सांगायला हवे. ती चेष्टा करू लागली म्हणजे तिचे लालचुटुक ओठ अगदी मंद थरथरतात त्याचे वर्णन तिजपाशी करायला हवे. आणि ती गंभीर झाली म्हणजे तिला एकदम हसू लोटणार असे वाटते ते तिला कळवायला हवे. पण मी यातले काहीच करू शकत नाही. माझे दोनही मित्र आपापल्या मुलीशी गप्पा मारण्यात रमून गेलेले असतात. मला त्यांचा हेवा वाटतो. मी तिच्याकडे नुसता पाहतो नि हसतो. पण असे किती पाहणार नि किती हसणार? मी आपला खिडकीतून बाहेर नजर टाकतो. बाहेर सुमिदा नदीचे पात्र दुथडी भरून चाललेले असते. वाहत्या पाण्यावर सायंकाळच्या छाया नाचत असतात.

पाण्यावरचे तरंग मध्येच काळवंडतात—अगदी प्लम ब्लॉसमच्या डोळ्यांसारखे. तिला हे सांगायला हवे, पण कसे सांगणार? मला जपानी येत नाही आणि मित्रांच्या मध्यस्थीने सांगावे असे वाटत नाही. मी आपला पुन्हा बाहेर पाहू लागतो.

तो सामीसेनचा सूर ऐकू येतो. मी चमकून पाहतो. तो खोलीच्या कोपऱ्यात एक किमोनो-सुंदरी हातात पंखा घेऊन उत्सुक मुद्रेने उभी असते आणि एक साधारण वयस्क बाई सामीसेनच्या तारा छेडीत असते. म्हणजे आता नृत्याचा कार्यक्रम—छान!

नृत्य सुरू होते. नृत्य म्हणजे नृत्य नव्हेच! नाचणाऱ्या मुलीचे पाय गुडघ्यात लवतात आणि तिची टाबीने वेष्टिलेली पावले लयदार मुरडतात. यापलीकडे नृत्य असे दिसतच नाही. पण तिच्या हातात घडीचा रंगीत पंखा असतो. तो उघडतो. मिटतो. फिरतो. निरनिराळे आकार धारण करतो. कोन काटकोन करतो. आडवाउभा होतो— आणि त्याच्या गतीबरोबर, फिरकीबरोबर, वक्र वळणाबरोबर नर्तिकेची नजर फिरते, नाचते, ओथंबते. आपल्या भारतीय नृत्यात मुद्रांना अर्थ असतो तसाच पंख्याच्या या हालचालींना असतो हे लगेच ध्यानात येते. पण हा अर्थ मला समजणार कसा? मला तो सांगणार कोण? मित्रांनी सांगितला असता—पण मला तो प्लम ब्लॉसमकडून हवा असतो, आणि ती तर सांगू शकत नाही. काही वेळ मी नृत्य तसेच निर्बोध नजरेने पाहतो. पण मग राहवत नाही, आणि तिला विचारतो. इंग्रजीतच विचारतो, पण तिला कळते. ती लगेच उठते. तुरतुर पावले टाकीत जाते आणि कागदपेन्सिल घेऊन तशीच चवड्यावर उडत पावले टाकीत येते. नर्तिका नाचत असते. तिचे पंख्याचे हात सुरू असतात. ती पंखा पूर्ण उघडते आणि पाटीमागे नेऊन हळूहळू वर आणते. त्याबरोबर प्लम ब्लॉसमची पेन्सिल कागदावर रेखाटू लागते —आणि उगवत्या चंद्राची आकृती उमटते. नर्तिका दोन रंगीत पंखे घेऊन पक्ष्याच्या पंखासारखे हलविते आणि प्लम ब्लॉसमच्या कागदावर उडणाऱ्या पक्ष्याचे चित्र निघते. नर्तिकेचा पंखा डोक्यावर जातो आणि हवेत तरंगल्यासारखा हळुवार फिरतो. त्याबरोबर आकाशात संचरणाऱ्या ढगाची आकृती तयार होते. प्लम ब्लॉसमच्या चित्रकलेतला वेग आश्चर्यकारक असतो. इतक्यात स्वच्छशुभ्र पंखा हलक्याफुलक्या हालचालीने वरून खाली येतो. त्याबरोबर प्लम ब्लॉसम

पेन्सिल टाकते, हातातल्या कागदाचे बारीक बारीक तुकडे करते आणि ते वर धरून अलगद सोडून देते—आणि मला समजते की हा हिमवर्षाव! पण आता— ? नर्तिकेच्या आडव्या हालत्या हातावर दोन पंखे जुळून राहिले आहेत. हे हलणाऱ्या फांदीवर पक्ष्याचे डोलणे एवढे कळण्याइतकी माझी प्रगती झाली आहे. पण प्लम ब्लॉसम याचे चित्र कसे काढणार याचेच आता मला कुतूहल आहे. ती घोटाळते. हसते. पण तिचा चेहरा गोरामोरा होतो. मी लगेच चौरंगावरची काडेपेटी उचलतो, तिच्या हातातली पेन्सिल घेऊन, पेटीवरच्या मोहरलेल्या फांदीवर पक्ष्याचे चित्र काढतो आणि पेटी हातात घेऊन ती खालीवर हालवतो. तिला ते पटते. ती कौतुकाने हसते. पण लगेच तिचा चेहरा गंभीर होतो. हिरमुसला होतो. आपल्याला या नृत्याचे रेखाटन जमले नाही याची ही खंत आहे हे मी ओळखतो. मी पेन्सिल तिला देण्याच्या मिषाने तिचा हात हळूच दाबतो. तिला त्याचा आश्वासक अर्थ समजतो. तिची कळी खुलते.

नृत्य संपते. सामीसेनचे सूर थांबतात. नर्तिका निघून जाते. पाठोपाठ सामीसेन जाते. आता माझे मित्रही निघण्याची तयारी करतात. इतक्यात फुकुझावांना फोटो काढण्याची लहर येते. ते क्यामेरा सरसावतात. फ्लॅश बल्ब बसवतात आणि ॲंगल् घेण्याच्या उद्योगास लागतात. फोटोची ही कल्पना सर्वांनाच पसंत पडते. सर्वांचे चेहरे खुलतात. मुली झटकन् किमोनोंच्या सुरकुत्या साफ करतात. फुकुझावांचा क्यामेरा भराभर चालतो. फ्लॅश लाइटचे बल्ब लगोलग पेटतात नि बदलतात. सर्वांचे सर्व तऱ्हेचे फोटो निघतात. एकत्र निघतात, वेगवेगळे निघतात. गंभीर निघतात, हसतखेळत निघतात. इतक्यात फुकुझावांना एक कल्पना सुचते आणि ते प्लम ब्लॉसमला कायसेसे म्हणतात. त्याबरोबर यामाकाटा हसतात, त्यांची मुलगीही हसते. पण प्लम ब्लॉसम विलक्षण लाजते, संकोचते, मानेने नाही म्हणते, आणि ततामीवर नजर रोखून थिजल्यासारखी बसते.

मला काहीच कळत नाही. हे काय चालले आहे? हे हसतात का? ही संकोचते का? मी यामाकाटांकडे पाहतो. ते म्हणतात, फुकुझावा तुझ्या मैत्रिणीला तुला अगदी खेटून बसायला सांगतात — त्यांना तसा फोटो घ्यायचा आहे, पण तिला ते मान्य नाही, ती नकार देत आहे.

माझ्या मनात आनंद आणि निराशा यांच्या छटा एकदम एकमेकांवर उमटतात. तिला शेजारी घेऊन फोटो काढण्याची कल्पना किती गोड! दोन

तासांत प्लम ब्लॉसमने मला आपलेसे करून घेतलेले असते. आम्हा दोघांत एक जिव्हाळयाचे नाते निर्माण झालेले असते. तिच्या माझ्या स्नेहाच्या तरल अदृश्य धाग्याला फोटोचे मूर्तरूप देण्याची कल्पना मला फार आवडते. हे नाते निर्माण झाले खरे, पण आता दहा-पाच मिनिटांतच ते निमेल, प्लम ब्लॉसम मला पुनः भेटेल असा मुळीच संभव नाही — फुकुझावा या क्षणजीवी संबंधाला चिरस्थायी स्वरूप देण्याची ही युक्ती काढतात म्हणून मला फार आनंद होतो. पण होतो तोच त्याच्यावर विरजण पडते. प्लम ब्लॉसमला फुकुझावांची कल्पना मान्य नाही—माझ्या अंतःकरणातला एक धागा तट्कन तुटतो.

हा असा फोटो काढण्याची कल्पना प्लम ब्लॉसमला का पसंत नाही? कारण स्पष्ट आहे. मला तिच्याबद्दल वाटते तसे तिला माझ्याबद्दल वाटत नाही. तिच्या ठिकाणी तो जिव्हाळा निर्माण झालेला नाही. स्नेहाचे ते स्पंदन तिला जाणवलेले नाहीं. मला एकदम चरका बसतो. मी स्वतःशीच चूर होतो. विचार करू लागतो. आपला असा तोल कसा सुटला? तिच्या वागण्याचा अर्थ आपल्याला कळू नये म्हणजे काय? आपल्याला ही अशी एकच भेटली —पण तिला माझ्यासारखे रोज छप्पन भेटत असतील. छप्पन जणांचे आदरातिथ्य ती रोज करते. त्या सर्वांशी तिने असे स्नेहाचे नाजुक धागे जोडावे काय? उपाहारगृहात चहाच्या कपासाठी अगर साकेच्या पेल्यासाठी अगर ती भरून देणाऱ्या मुलीच्या स्नेहाळ हस्तस्पर्शासाठी येणाऱ्या दरेक गिऱ्हाइकागणिक ती स्नेहाचे धागे स्वतःच्या अंतःकरणाभोवती असे गुंडाळू लागली तर लवकरच तिचे अंतःकरण श्रावणात मुते गुंडाळलेल्या पिंपळाच्या खोडासारखे होईल— !

माझे मीच समाधान करू लागतो. प्लम ब्लॉसमला माझ्या स्नेहाची पर्वा नसली तरी ती माझा तिरस्कार करीत नाही; माझ्या निकट फोटो काढून घेण्याची तिची तयारी नाही म्हणजे ती माझा तिरस्कार करते असे नाही, हे पटते नि जरा बरे वाटते. मन शांत होते. पण लगेच ते पलटी खाते. विचारते —पण मग ती अशी का वागली? इतका जिव्हाळा तिने का दर्शविला? तिच्या हास्यात इतका स्नेह का ओसंडला? तिच्या स्पर्शात तिने इतकी आपुलकी का ओतली?—म्हणजे, हा केवळ एक उपचार! केवळ एक धंदेवाईक क्लृप्ती! माझे मन एकदम धुमसू लागते. या दोन तासांतले तिचे सारे वर्तन अंतरंगात वर्दळू लागते. साकेच्या पेल्याला तिच्या ओठांचा नाजुक स्पर्श! पण

असे शंभर पेले रोज हिच्या ओटांनी कळकटत असतील! शंभर हातांना तिचा रोज जिव्हाळ्याचा स्पर्श होत असेल! गिऱ्हाइकाच्या हातातल्या काडेपेटीवरील चित्रागणिक तिचे नाव बदलत असेल!

मन आता निष्ठुर बनते, दुष्ट बनते, स्वतःच्या दुखावलेल्या अहंकारावर फुंकर घालण्यासाठी विपरीतही बनते. म्हणते, असे जर आहे तर मग असे फोटोला बसायला काय हरकत आहे? शंभर ओटांनी विटाळलेला साकेचा पेला चालतो तर शंभर शरीरांना चिकटून बसायला काय हरकत आहे? हा विचार मनात येतो नि मन थोडे चरकतेच—तू काय शंभर गिऱ्हाइकांतलाच एक?

आता मन अगदी कोंडते. एक प्रकारच्या बधीर दुःखाने भरून जाते. काही बोलावेसे वाटत नाही. कोणीच काही बोलत नाही. साऱ्यांनाच विचित्र वाटते. सारे वातावरण चमत्कारिक बनते. ताणते. एका उपहारगृहाच्या क्षुल्लक मुलीने आपल्या साध्या विनंतीला नकार द्यावा म्हणजे काय, या रोषाची छटा फुकुझावांच्या चेहऱ्यावर उमटते. उलट गिऱ्हाइकाच्या तसे म्हटले तर अगदी साध्या अशा विनंतीला आपण मान देऊ शकत नाही म्हणून वाटणारी खिन्नता, आपल्या कर्तव्यात काही कसूर तर होत नाही ना अशी वाटणारी शंका, आणि आपल्या व्यक्तित्वाचा एक विलक्षण अभिमान, या साऱ्यांच्या विलगमिश्र छटा प्लम ब्लॉसमच्या चेहऱ्यावर उमटतात. खोलीतले वातावरण एक प्रकारच्या चमत्कारिक कुंदपणाने भरून जाते.

आणि मग यामाकाटांचे तोंड उघडते, त्यातून शब्द बाहेर पडतात आणि हे विचित्र वातावरण मोडते. यामाकाटा मला सांगत असतात. असे गिऱ्हाइकाशी खेटून फोटोला बसणे हे या मुलींच्या वागणुकीत बसत नाही. या मुलींनी गिऱ्हाइकांशी कसे वागायचे अन् कसे वागायचे नाही, याबद्दल काही संकेत आहेत. या संकेतात जे जे बसते ते ते या मुली अगदी जिव्हाळ्याने पार पाडतील. ते पार पाडताना त्यात आपले सारे अंतरंग ओततील. सर्वस्व वेचतील. पण काही झाले तरी या संकेतांच्या पलीकडे जाणार नाहीत. या तुझ्या मुलीला फुकुझावांच्या इच्छेला नकार देताना अतिशय यातना होत आहेत. पण तिचा इलाज नाही. तुझा अपमान करण्याची लवमात्र बुद्धी त्यात नाही.

यामाकाटांच्या खुलाशाने माझा जीव भांड्यात पडतो. तिच्या वर्तनाची उमज पडते. प्लम ब्लॉसमने जे स्नेहाचे वातावरण निर्माण केले होते ते ध्यानात येते

# असाकुसा



टोकिओच्या आसाकुसा कन्नोन मंदिराची कीर्ती मी ऐकलेली होती. करुणेचा साक्षात स्रोत असलेली आठ-नऊ इंचांची इवलाली मूर्ती आणि त्यासमोरचा हत्तीएवढा कंदील—आणि तोही आसाकुसाच्या गेशांनी आपसात वर्गणी करून उभारलेला, एवढा तपशील त्या मंदिराकडे ओढायला पुरेसा होता. पेन-परिषदेच्या कार्यक्रमपत्रिकेत आसाकुसा मंदिराला भेट समाविष्ट आहे हे पाहिले तेव्हा खूष झालो, आणि वेळ आली तेव्हा आम्हा प्रतिनिधींना मंदिराकडे नेणाऱ्या बसमध्ये पटकन् उडी मारली.

आणि विलक्षण आनंद वाटतो. ते संकेतांतल्या चक्रटीतले असेल, पण याला खोटेपणाचा स्पर्श नसतो ही जाणीव मन समाधानाने भरून टाकते. आणि मी, ही फोटोची कल्पना सोडून द्या असे फुकुझावांना सांगण्याचा विचार करतो. मी त्यांना तसे सांगणार इतक्यात 'चिवार' खोलीत प्रवेश करते, आणि खोलीतले तंग वातावरण तिच्या लगेच ध्यानात येते. ती काय झाले म्हणून विचारते, आणि फुकुझावांनी वस्तुस्थिती सांगितल्याबरोबर ती मोठ्याने हसते नि म्हणते, "हत्तिच्या, ती बसत नसेल तर मी बसते." तिच्या या जपानी उद्गारांचा अर्थ माझ्या ध्यानात येतो न येतो तोच ती माझ्या शेजारी येऊन बसते, मला घट्ट मिठी मारते आणि म्हणते, "हं काढा—हवे तितके फोटो काढा." तिच्या आविर्भावाने मी गार होतो. पण फुकुझावा लगेच क्यामेरा सरसावतात.

मी पार ओशाळतो—तिने अशी चमत्कारिक मिठी मारली म्हणून, आणि अधिक म्हणजे ही मिठी खोटी होती म्हणून. या मिठीत जिव्हाळा नसतो, स्नेह नसतो, आपलेपणा नसतो; नुसताच शिष्टपणा असतो. संकेतांना आपण जुमानीत नाही असे दाखविण्याचा दिमाख असतो. हा दिमाखच मला बोचतो. ही संकेतांना जुमानीत नाही—म्हणजे काहीही करण्याची हिची तयारी आहे. तिने कित्येक गिऱ्हाइकांना अशा मिठ्या मारल्या असतील आणि त्या मिठ्यांना हवा तो अर्थ असेल. या जाणिवेने मी अस्वस्थ होतो. फुकुझावांचे फोटो घेणे संपण्या-पूर्वीच मी उठतो.

आम्ही निघतो. आमच्या तीनही मुली आम्हाला पोचवायला येतात. पण प्लम ब्लॉसम मागे मागे असते. मी टॅक्सीचा दरवाजा उघडतो तेव्हा चिवार आणि ती दुसरी मुलगी, दोघी आम्हाला मोठमोठ्याने निरोप देतात— 'आरिगातो, आरिगातो, आरिगातो गोझाय् मास्ता.' पण प्लम ब्लॉसमचा आवाज फारसा फुटत नाही. ती अजून मागेमागेच असते—पण आमची टॅक्सी निघते तेव्हा माझ्याकडे पाहते, आणि त्या नजरेत पाणी तरळते.

ती नजर मला अद्याप दिसते आहे!

टोकिओच्या अनेक रस्त्यांत आणि अनेक वळणांत वेळ विसरलेली बस एका-एकी थांबली आणि 'आले आसाकुसा' असा पुकारा झाला! मी तर मधली पायरी सोडूनच रस्त्यावर उडी मारली—आणि आसाकुसाचे मंदिर आणि समोर टांगलेला तो हत्तीएवढा कंदील पाहण्यासाठी नजर लावली. पण कसले मंदिर नि कसले काय! समोर थाप गर्दी! गर्दी म्हणजे अठरापगड गर्दी! स्त्री, पुरुष, मुले! अठरा प्रकारची आणि अठरा तऱ्हांची! लेदरचा जर्किन आणि मुंडी कौंटी कॅप घातलेले पुरुष तर गोणत्यासारखा अमेरिकन सॅक–स्टाइलचा झगा चढविलेल्या स्त्रिया, गेश्यात रोवलेले मुरकुतलेले पाय तर नायलॉनमध्ये तंग दिसणाऱ्या रेशमी पोटऱ्या, लालचुटुक झोऱ्या मिरविणाऱ्या मुली तर फाटक्या टेनिस-बुटांत पावले लपविणारी मुले, दुर्बिणीत खुपसलेले डोळे तर क्यामेरे उडविणारे हात—पण मुख्य म्हणजे हा तपशील इकडून तिकडे फेकणारी गर्दी! गर्दीची ही राळ का हेच ध्यानात येईना. नजर सुन्न करून क्षणभर उभा राहिलो तोच—

माझ्या नजरेस आमच्या मदाम सोफिया वाडिया दिसल्या. म्हणजे नेहमीच्या, सळसळत्या सफेत साडीच्या, गोऱ्यापान भालप्रदेशावर कुंकवाचा उज्ज्वल टिळा रेखलेल्या, चेहऱ्यावर सदैव स्नेहाळलेले स्मित असणाऱ्या सोफिया वाडिया नव्हत! आता त्यांच्या हातात एक पताका होती. चेहरा गंभीर होता. नजर स्तब्ध होती. आणि वृत्ती भारलेली होती—आणि सभोवार गेशांचा गराडा! सर्व परंपरागत सौंदर्यप्रसाधनांचे कळीदार काव्य अंगावर सळसळते आहे अशा गेशा! किमोनोवर इंद्रधनुष्याची माया, चेहऱ्यावर गुलाबाच्या पाकळ्यांची शोभा, डोळ्यांत काळेशार पाणी आणि वृत्तीत शांत, तुष्ट समर्पण! त्या क्षणी मला मदाम सोफिया वाडिया अप्सरांनी घेरलेल्या तपस्विनी महाश्वेतेप्रमाणे भासल्या.

मदाम वाडियांच्या दर्शनाबरोबर एकदम आधार सापडला! दिशा गवसली! मी क्षणाचाही विचार न करता त्यांच्या दिशेने निघालो—आणि मला कोणी अडविले नाही. माझ्या एकेक पावलाबरोबर गेशांनी मला वाट दिली. काय होते आहे हे कळण्यापूर्वीच मी मदाम वाडियांच्या शेजारी जाऊन उभा राहिलो. पण त्यांनी माझ्याकडे पाहिलेही नाही. त्यांची नजर पुरी भारलेली होती. मी जाऊन पोचतो आहे तोच मिरवणूक सुरू झाली – आणि मिरवणुकीबरोबर मीही!

क्षणात ध्यानात आले की कन्नोनदेवीच्या दर्शनासाठी असे समारंभाने जायचे आहे आणि मिरवणुकीचे नेतृत्व मदाम वाडियांकडे आहे! आणि त्यांच्या डावी-उजवी-कडे मागे असलेला गेशांचा ताफा हा या मिरवणुकीचा एक उपचार आहे! ध्यानात आले नि मी एकदम विरमलो. पण आता तेथून हलणेही शक्य नव्हते. दोनही बाजूंना दुकानांची रांग आणि दुकानांच्या समोर गर्दी! या महिलांच्या मिरवणुकीत मी एकटाच पुरुष! 'लांबोडा'! मला अतिशय शरमल्यासारखे झाले. इतक्यात कुठूनसे उमाशंकर जोशी आले नि शेजारी चालू लागले. मला एकदम बरे वाटले. आणखी एक 'बायकात पुरुष मिळाला!' पण तेही संकोचले होते. म्हणाले 'We look like geisha boys, don't we?' (आम्ही गेशा-पोऱ्या-, प्रमाणे दिसतो, नाही?) अनेक क्यामेरे चालू होते, अनेक बल्ब जळत होते, पण निघालेल्या शेकडो फोटोतला एकही मिळवून ठेवण्याची हिंमत मला झाली नाही!

मिरवणुकीच्या अग्रभागी असण्याचा एक फायदा झाला. बाजूच्या दुकानांतली आरास नीट न्याहाळून पाहता आली. आजच्या या समारंभात सारी दुकाने मनःपूर्वक सामील झाली होती. एकेक दुकान नववधूप्रमाणे सजले होते. जपानी प्रसाधनाच्या साऱ्या युक्त्याप्रयुक्त्यांचा वापर करण्यात आला होता. किमोनोच्या दुकानांतल्या दिखाऊ पुतळ्यांवर ठेवणीतले नमुने चढले होते. बरयाबरण्यांच्या दुकानांतली एकेक फुलदाणी पॉलिशने झगमगली होती आणि वाडगा ऐतिहासिक दिमाखाने नटला होता. कापडावरचे रंग आणि रेषा सळसळत होत्या. फुल-झाडांच्या दुकानावरचे निऑन लाइट्स तर नक्षत्रांचे तेज पिऊन फाकले होते. एकेक दुकान म्हणजे कालिदासाच्या उत्तरमेघातील एकेका कडव्याचे प्रात्यक्षिक! मग त्या दुकानातल्या हसऱ्या चेहऱ्याच्या आणि चंचल नजरेच्या मुली यक्षिणीं-प्रमाणे भासाव्या यात नवल ते काय?

या दुकानाच्या भपक्याने नजरेवर एक प्रकारची भूल पसरली. एक प्रकारच्या तंद्रीतच आम्ही देवळासमोरच्या पटांगणात आलो, नि मग जरा भानावर आलो. माझी नजर तो हत्तीएवढा कंदील धुंडाळू लागली. पण तो कंदील बाहेर नव्हता, आत देवळाच्या ओसरीवर होता. नजरेला समोरचे देवळाचे आवाढव्य वास्तुशिल्पच दिसले. आठ-नऊ इंच उंचीच्या कन्नोनदेवीचे हे अवाढव्य मंदिर! वाटले, तिच्या अलौकिक शक्तीला साकार करण्याचाच हा प्रयत्न आहे? की तिच्या चिंतनाने येणारी प्रतीतीच ही अशी साकार झाली आहे? काही असो. समोरचे, देवळाचे सरळ, साधे, अखंड उंचावत गेलेले छप्पर – एखाद्या पर्वताचे शिखर

समोर उभे राहावे तसे वाटले, आणि त्यांची दोन बाजूंना पसरलेली पाखे देवमाशांच्या जबरदस्त शेपट्यांसारखी भासली. मला एकदम जाऊन तो कंदील पाहावा असे वाटले. गेशांनी उभारलेला कंदील तो. आता आजूबाजूस गेशाच उभ्या होत्या. कंदिलाला, अलकेतल्या यक्षाच्या बागेतल्या हिऱ्यामाणकांच्या टेकडीचे कल्पनारम्य आकर्षण प्राप्त झाले. पण माझी एकटाच सटकून जाण्याची हिंमत नव्हती. शिवाय आम्ही एका विधीच्या कचाट्यात सापडलो होतो. समोर देवालयाच्या पुढे कमळाच्या आकाराचे एक प्रचंड धूपपात्र होते. धूपधूमाच्या संस्कारांनी शुद्ध होऊनच देवळात जायचे होते. मदाम वाडिया त्या धूपदानाकडे गेल्या. गेशाही त्यांच्याभोवती जमा झाल्या. धूपदानाभोवती एकदम गर्दीच उसळली, आणि मग या गर्दीत तो लाल रंगाचा कंदील नीट पाहण्याचे राहूनच गेले. एक निसटशी नजर टाकून मी पुनः बाहेर आवारात आलो. आवारात पेन-परिषदेचे अनेक प्रतिनिधी उभे होते. त्यांच्याशी गप्पागोष्टी करू लागलो. व्याख्यान वगैरे गोष्टी चाललेल्या होत्या. पण माझ्या नजरेवर त्या दुकानांच्या आराशीची, गेशांच्या गराड्याची, मंदिराच्या भव्यतेची अशी काही विलक्षण धुंदी पसरली की मला त्यातले फारसे काही आठवतच नाही. एवढेच आठवते की, एकदम वर आकाशात एक हेलिकॉप्टर आला--आणि त्याने वरून कागदाचे असंख्य तुकडे उधळून दिले. वस्तुतः त्याने उधळायला हवी होती कल्पवृक्षाची फुले, पण उधळल्या मात्र जाहिरातींच्या हस्तपत्रिका! पण त्यामुळे डोळ्यांवरचा अलकापुरीचा अंमल उतरला नाही. त्या हेलिकॉप्टरचीच कीव आली!

* * *

आसाकुसाचे हे चित्र डोक्यात बसते. कित्येक दिवस त्याचीच आठवण चाळवते. त्याचेच रंग डोळ्यांपुढे तरळतात. वाटते, एकदा हा आसाकुसा फुरसतीने नजरेखालून घातला पाहिजे. म्हणून एक दिवस टॅक्सी रोखतो, आणि पुकारतो ' आसाकुसा '! लगेच टॅक्सी-ड्रायव्हरच्या अंगात संचारते. अनेकांच्या जिवाशी शिवाशिवीचा खेळ खेळून तो एकदम टॅक्सी उभी करतो नि म्हणतो, ' आसाकुसा '. मी टॅक्सीच्या बाहेर पाहतो, पण मला ओळखीची एक खूण दिसत नाही. मी साशंक स्वरात विचारतो, ' आसाकुसा ? ' तो ठाम स्वरात म्हणतो ' होय '. मला पटत नाही, पण नाइलाजाने उतरतो. एकाला विचारतो, ' आसाकुसा मार्केट ? ' मी काय विचारतो हे त्याला नीट कळले असावेसे वाटत

नाही, पण तो बोट दाखवितो, आणि आपल्या बावळटपणाची जाणीव असूनही मी तो बोट दाखवितो त्या दिशेकडे जातो. जरा वेळाने दुतर्फा दुकानांच्या रस्त्याला लागतो. दुकाने दिसतात – किमोनोंची, कापडांची, बश्या-फुलदाण्यांची, फुलझाडांची – नि खात्री पटते, बस्स याच रस्त्याने परवा आपण गेलो. पावलात आत्मविश्वास चढतो. नजर ओळखीने पाहू लागते. पण दिखाऊ पुतळ्यांच्या अंगावरच्या किमोनोत ते पाणी दिसत नाही. फुलदाण्यांवरच्या पॉलिशात ते तेज नाही. कापडावरच्या रंगरेषांत ती सळसळ नाही. निऑन–लाइट्समध्ये ती किमया नाही. हीच ती दुकाने असे वाटतच नाही. छट्, आपले चुकले. परवाचा रस्ता तो हा नव्हे.

मी एका तिठ्यापर्यंत येतो. तेथून दोन बाजूंना दोन थेट तसेच रस्ते जातात. दोनही बाजूंना दुकाने थेट तशीच असतात. खगा दोन खणांची, छोटी, सुबक, नीटनेटकी. जपानी प्रसाधनाचा एखाद दुसरा हात फिरलेली. एखादी बॉन्सायची कुंडी दारात मिरवणारी! निऑनच्या दिव्यात एखादा नवलाचा डिझाइन दाखविणारी. विकणाऱ्या मुलींच्या हास्याने सजलेली. विक्रीचा व्यवहार नेटाने करणारी. पण त्यात त्या दिवसाचा भपका नाही, झगमग नाही, उत्सवी आरास नाही. साऱ्यावर एक प्रकारचा संथ बासेपणा! खाली रस्त्यावर तर कचरा आणि चिखल! बरोबर आहे, त्या दिवसाचे सणाचे वातावरण आज कसे असणार? पण एकाही दुकानाची ओळख पटत नाही. त्या दिवशी डोळे भरून पाहिलेला एकही चेहरा ओळख चाळवीत नाही. आपण कुठल्या तरी वेगळ्याच जगात पडलो आहोत असे वाटू लागते. हा आसाकुसा-बाजारच काय, असे एखाद्या दुकानदाराला विचारावेसे वाटू लागते. पण तेवढा धीर होत नाही. माझी गोंधळलेली नजर एकादोघा दुकानदारांच्या ध्यानात आली आहे असे जाणवते आणि माझे रेंगाळणे संपते. पावले झपाझप पडू लागतात. मात्र नजर परवाची ओळख धुंडाळू लागतेच. पण काही लक्षात येत नाही. जरा वेळाने हा रस्ता संपून आपण मोकळ्यावर येणार हे ध्यानात येते व या चक्रव्यूहातून सुटणार याचे समाधान वाटते. पावले अधिकच झपाट्याने पडू लागतात—आणि दीड दोन मिनिटांत खरोखरच त्या बाजाराच्या बाहेर मोकळ्या जागेत येतो नि पाहतो तो हे देवळासमोरचे पटांगण! म्हणजे परवा आपण याच रस्त्याने आलो होतो, आणि आता काही ओळखले नाही! म्हणजे परवाच्या समारंभाची किमया या दुकानांवर चढली होती तशीच आपल्या नजरेवरही चढली होती!

मी समोर देवळाकडे पाहिले. देऊळ अवाढव्यच, पण परवाची वास्तुशिल्पाची भव्यता आता जाणवत नाही. ते समोरचे, आढ्याची उंची अतूट चढत गेलेले छप्पर आता मला बोजड, बेढबच वाटते. का नकळे, थायलँडमधल्या भातशेतात काम करणाऱ्या काळ्या कपड्यांतल्या शेतकऱ्यांच्या डोक्यावर उंच दिवाळाची परडीसारखी हॅट असते तिची मला आठवण होते! मी पुढे होतो नि देवळात नजर टाकतो. तो कंदील दिसतो, पण त्याचा लाल रंग, त्याच्यावरची काळी अक्षरे यांत एक निश्चेष्टपणा जाणवतो. देवळात देवीच्या मूर्तीसमोर समयांची आरास असते त्यात एक तांत्रिकपणा आढळतो. वरचे छतावरचे ड्रॅगनचे चित्र —ड्रॅगनच्या चित्रातले सौंदर्य मला कधी आकलन झालेच नाही, पण आज ते चित्र हिडिस वाटते! छे, हे ठीक नाही, मघाशी बाजारात झालेल्या निराशेचा फारच पगडा आपल्या मनावर बसला आहे!

काही तरी चांगले, आवडण्यासारखे दिसेल म्हणून मागे वळून पाहतो आणि एक दगडी जपानी दिवा दिसतो. जपानी मंदिराच्या आवारात आणि जपानी बागांत दिसणारा दगडी दिवा मला फारच आवडतो. त्याचे शिल्प जपानी नसते, भारतीय असते, म्हणून तो मला आवडतो का? लहानपणी तुळशीवृन्दावनाच्या कोनाड्यात पाहिलेल्या निरंजनाची त्याने आठवण होते म्हणून तो मला आवडतो का? कारण काहीही असो, नाराच्या कासुगा मंदिराकडे अगर निक्कोच्या तोशोगू मंदिराकडे नेणाऱ्या अशा दगडी दिव्यांच्या रांगा पाहून माझे मन हरखले होते. मंदिरातल्या पावित्र्याचे हे कोणी रखवालदारच असा काहीतरी विचार मनात आला होता. मंदिराला असा एखादा दिवा अर्पण करण्याचे पुण्य महान असे वाटले होते, आणि प्रत्येक वेळी या दगडाच्या दिव्याला जाऊन हात लावावा असे वाटले होते, तसेच आता वाटते. आणि मी त्या दिव्याकडे जातो. हा दिवा नेहमीसारखा लहान दीडदोन फुटांचा नसतो, दीपस्तंभासारखा चांगला उंच असतो. मी त्याला हात लावतो, त्याला टेकून उभा राहतो नि समोर पाहतो —

समोर एक कबुतरांचा अड्डा असतो आणि त्याच्या सभोवताली लोखंडी बाके टाकलेली असतात. जुनाट गंजलेली. समोरच्या एका बाकावर एक म्हातारा बसलेला दिसतो. त्याचे सारे दर्शन विटके असते. चेहऱ्यावर सुरकुत्या, अंगावर विटका युकाता आणि पायांत तुटका गेटा अशी सारी सुतकी

कळा. पण समोर एक छोटे मूल कबुतराबरोबर खेळत असते त्याच्याकडे तो नजर लावून पाहत असतो. काय पाहत असतो तो? स्वतःच्या आयुष्याच्या आरशात त्या मुलाचे भवितव्य पाहत आहे का तो? पाहता पाहता तो एकदम मांडी चाळवतो नि माझ्या ध्यानात येते की ह्याचा एक पाय थोटा आहे. एकदम वाटते, अरे, हा पाय युद्धात तुटला. जपानच्या असंख्य लुळयापांगळ्या सैनिकांपैकी हा एक. त्यांच्याप्रमाणेच याचेही आयुष्य भकास आणि अंतःकरण ओसाड बनलेले असेल. हा असा अपंग म्हातारा आणि कबुतराच्या प्रत्येक फडफडण्याबरोबर अंग बागडणारे ते मूल : जपानचे 'भूत' आणि 'भविष्य' एकमेकांशी काटकोन करून जोडून ठेवले आहेत असे वाटते.

इतक्यात जपानचे 'वर्तमान' आईच्या रूपाने येते आणि त्या मुलाला उचलून घेऊन त्याला लडिवाळपणे खेळवीत निघून जाते. तिचा पोशाख पाश्चात्त्य असतो. तिच्या लाल स्कर्टवरचे काळे झारदार पट्टे, तिचा पिवळा ब्लाऊज आणि डोक्यावरच्या अर्ध्या कापलेल्या केसांच्या भुरभुरणाऱ्या बटा. हे सारे तिच्या आधुनिक स्वच्छंद बेफिकीर वृत्तीची साक्ष देते, पण तिच्या हातात गुलाबी चित्रे रेखाटलेली रेशमी जपानी छत्री असते!— आणि ती जपानी जीवनावरच्या जपानी संस्कृतीच्या छायेसारखी वाटते!

मी चालू लागतो — कुठे तरी जायचे म्हणून उजवीकडे वळतो आणि थोड्याच वेळात एक विलक्षण दृश्य नजरेसमोर उभरते. आपल्याकडच्या जुन्या बाजारासारखा (चोर बाजारासारखा) बाजार समोर पसरलेला असतो. छोटेछोटे आडवे कट्टे आणि त्यांवर मालांच्या—तयार मालांच्या—राशी! कोट, पँट, शॉर्ट, शर्ट यांच्या घड्या, किमोनोंच्या घड्या, स्कर्टब्लाऊजच्या घड्या, नेकटायच्या बंडलांचे ढीग, बटने, फण्या, खेळणी, भांडी, पेले, कपबश्या—नाना प्रकार! या ढिगांच्या दरम्यान मालविक्ये उभे असतात, माल पुकारतात, किंमती ओरडतात, गिऱ्हाइकांशी घालमेल करतात, हुज्जत घालतात, आणि मालाच्या घड्या खालच्या वर करीत दुसऱ्या हाताने ऐटीत सिग्रेट शिलगावतात! आणि गिऱ्हाइके या साऱ्या गडबडीत एकमेकांची आणि स्वतःची ओढाताण करतात! आणि या साऱ्यावर ताण म्हणून एखादी विटक्या किमोनोवर विटका कोट घातलेली, मुलाला पाठुंगळीला मारलेली, आपली जाडीभरडी रुंद चवड्याची पावले गेट्यात रोवलेली बाई या साऱ्याकडे आपण या गावचेच नाही अशा तोऱ्याने पाहात असते.

मी या उघड्या बाजाराकडे पाहत राहतो, तेथल्या दुकानांच्या दरम्यान पाचदहा पावलांचा फेरफटका करतो; काही वेळ डोळे मिटून त्या ठिकाणच्या नुसत्या आवाजाचा आस्वाद घेतो नि वाटते, हे खरे जीवन – उघडे, नागडे, कच्चे जीवन! निदान आपल्या साऱ्या ओढाताणींच्या मुळाशी असलेल्या पाशवी शक्तीचा संचार येथे आढळेल! आपल्या साऱ्या संस्कृतीच्या मुळाशी असलेल्या जंजाळाचा आढळ येथ होईल. सौंदर्याच्या, स्नेहाच्या, प्रेमाच्या मुळाशी असलेल्या सत्याचा साक्षात्कार – थेंबभर दुधात, अगर पाण्यात अगर तेलात शास्त्रज्ञाच्या काचेतून जसा जंतूंचा होतो तसा साक्षात्कार – येथे होईल.

जपानच्या साऱ्या नाजुकसाजुक, मधुर, मुलायम सौंदर्याने भरलेल्या माझ्या अंतःकरणाला हा फटका जबरदस्त टरतो, आणि मी तेथून काढते पाऊल घेतो. चालू लागतो, तो समोरून येणाऱ्या इसमाला पाहून माझी दृष्टी थबकते. त्याच्या खाकोटीला एक पडशी असते आणि हात दोन माकडांना ओढीत असतात! आपल्या गारुड्याचा अगर डोंबाऱ्याचा अवतार जपानात पाहण्याची अपेक्षा मी केलेली नव्हती. जरा वेळाने समोर एक म्हातारा-म्हातारीचे जोडपे कचऱ्याची हातगाडी ओढीत चाललेले दिसते. या जोडप्याच्या जीवनाचे वस्त्र चांगलेच विरलेले आहे हे त्यांच्या चेहऱ्यावरच्या सुरकुत्यांत दिसते. त्याच्या जीवनाच्या गाठी आणि ठिगळे त्याच्या अंगावरच्या कपड्यात दिसतात. त्याच्या जीवनाचा पिकलेला सुकलेला पालापाचोळा त्या हातगाडीत ओसंडून चाललेला असतो. सौंदर्याची सुसंगती आणि जीवनातली विसंगती यांचे एकत्र दर्शन मला त्या जोडप्यात दिसते. मागासलेल्या देशांतली दृश्ये जीवनाच्या जीवघेऊ पाशांनी खेचून आणून या सुधारलेल्या जपानात आणून ठेवलेली दिसतात. माझे चालते पाऊल, काही कारण नसता, अडखळते!

* * *

जरा वेळाने मी थिएटर्सच्या विभागात येतो. रस्त्याच्या दोनही कडांनी सिनेमा-थिएटरे एकमेकांना चिकटून उभी असतात; आणि त्यांचे पुढचे दर्शनी भाग चित्रपटांच्या पोस्टर्सनी चितारलेले असतात. काही वेळ माझे लक्ष थिएटर्सच्या लाउंजमधल्या व्यवस्थेवर ओझरती नजर फिरवीत जाते, पण थोड्याच वेळात या पोस्टर्सनी भारले जाते. या पोस्टर्समुळे एक नवीनच जबरदस्त जग उमलते – सामुराईचे जग. बहुतेक सर्व पोस्टर्सवर सामुराईच्या

जगातली दृश्ये असतात. त्यांचे हाफ्‌पँट आणि सैल अंगरखा यांच्या विचित्र युतीचे पोशाख, तुळतुळीत तासलेली डोकी, चमत्कारिक शेंड्या, कमरेला कसलेल्या पट्ट्यांस अडकवलेल्या तलवारी, नजरेतले बेबंद भाव, चेहऱ्यावरचा क्रोध, शौर्य, स्त्रियांच्या नजरेतली भीती अगर संपूर्ण शरणागती! एक सामुराई एका स्त्रीची बाही पकडून तिला खेचीत आहे; दुसरा हातात शत्रूचे कापलेले मुंडके घेऊन घोडयावरून भरधाव सुटलेला आहे; एक स्त्री पिशाच्चाच्या दर्शनाने निश्चेष्ट पडली आहे; हाराकिरीच्या क्रियेमुळे एका सामुराईच्या तोंडाचे स्नायू पिळवटले आहेत – असे हे मध्ययुगीन जपानी सरंजामशाहीचे जग दोनही बाजूंनी अंगावर चालून येते. मध्येच एखाद्या अमेरिकन धमाल बोलपटाच्या पोस्टर्सने यात खंड पडतो तेवढाच. इतक्यात माझे लक्ष एका निराळ्याच पोस्टरकडे जाते. या पोस्टरमध्ये नंग्या समशेरींचे हातघाईचे युद्ध दिसते. पोशाख तसेच, जग सामुराईचे; पण हे सामुराईचे सोंग स्त्रियांनी आणलेले. मी जरा आजूबाजूला नजर टाकतो नि ध्यानात येते की हे सिनेमाचे थिएटर नव्हे, तर तलवारींच्या मुकाबल्याचे – आणि या समशेरीच्या मामल्यात भाग घेणाऱ्या स्त्रियाच आहेत. त्या स्त्रीच्या वेशात तर लढतातच, पण पुरुषाचा वेश धारण करूनही लढतात. मला गंमत वाटते. काबुकी नाटकात आजही स्त्रियांची कामे पुरुष करतात आणि येथे पुरुषांची मर्दुमकी स्त्रिया गाजवतात! काबुकीत पुरुषांनी केलेल्या स्त्रीच्या हसण्यामुरडण्याचा बदला त्या येथे समशेर-बहादुरीने घेतात!

मी समशेरबहादुरीचा (नुसता चित्रमय) आस्वाद घेत उभा असतो तो शेजारच्या गल्लीतून दोन किमोनोधारी स्त्रिया भांडततंडत येतात. जपानी भाषेतले भांडण मी पूर्वी ऐकलेले नव्हते. जपानी स्त्रियांचे बोलणे म्हणजे कलदार बिलोरी, पण या बिलोरी बोलांना तडयावर तडे जात असलेले मी आता पाहत असतो. आधी जपानी स्त्रिया रस्त्यावर येऊन अशा भांडतील यावरच मी विश्वास ठेवला नसता, आणि भांडल्या तर आपल्या बिलोरी बोलांचा असा भगरा करतील, हे मी स्वप्नात देखील देखिले नसते, पण ते आता समोर घडत असते. नुसता भाषेचा भगरा नव्हे तर हावभावांचा थयथयाट! त्यांचे किमोनोच्या बाह्यांतून बाहेर पडून एकमेकांवर चालून जाणारे हात म्यानातून बाहेर पडलेल्या तलवारीसारखे भासतात. या भांडणाऱ्या बायांकडे पाहत राहणे शिष्टसंमत नाही हे माहीत

असूनसुद्धा माझी नजर त्यांच्यावर खिळून राहते. पाहता पाहता त्यांचे भरदार भरभक्कम पाय आणि नाजुक निमुळते हात यांतला विसंवाद मनाला जाणवतो, आणि त्याबद्दल पूर्वी अनुभवलेले असूनही तो खटकतो. आणखी एक जाणीव होते. जपानी कातडी, गेशांच्या चेहऱ्यावर दिसते तशी गोडगुलाबी मुलायम नसते तर पिवळी भरभरीत असते; आणि गेशांच्या चेहऱ्यावरची माया म्हणजे प्रसाधनाची किमया असते. आणि मग त्या दिवसाचा गेशांचा गराडा आठवतो आणि त्यांच्या चेहऱ्याप्रमाणे त्यांच्या मानेलगतच्या पाठीचे प्रसाधनही आठवते. गेशांच्या किमोनोला पाठीवर मानेखालीच व्ही–च्या आकाराचा काप असतो, आणि जपानी रतिशास्त्रात या जागेचे आकर्षण विलक्षण असते. किमोनोची ओबी स्तन साफ आवळून–आच्छादून टाकते, आणि स्तनाच्या आकर्षणाची जागा पुष्ट पाठीचा मानेखालचा रंगरंगोटी केलेला भाग, विशेषतः मानेवरून उतरलेली लवदार केसांची नाजूक नखरेल रेषा घेते !

माझ्या नजरेसमोर रतिशास्त्रातला हा मानेमागचा विलास तरळत असतानाच स्ट्रिप-टीझ्चा पोस्टर दिसतो. स्ट्रिप–टीझ् म्हणजे नटीने वा नर्तिकेने रंगमंचका-वर येऊन अल्लद हाताने एकेक वस्त्र काढून टाकून कायद्याच्या कमाल मर्यादे-पर्यंत ( किंवा निसर्गाच्या नाजूक मर्यादेपर्यंत असे म्हणावे ) विवस्त्र होणे. पाठीचा पुष्ट तुकडा नजरेसमोर मस्त नाचत होता म्हणून असेल. मी, काडीचाही विचार न करता, स्ट्रिप-टीझ्चे तिकीट काढतो.

मी बाल्कनीचे तिकीट काढलेले असते, पण स्ट्रिप-टीझ्च्या थिएटरात बाल्कनीतील जागा महत्त्वाची नसते, ती खाली पिटात असते. काबुकीच्या रंगमंचकाप्रमाणे या ' नागव्या ' मंचकाचीही एक पट्टी पिटात, प्रेक्षकांत, आलेली असते, आणि आपला वस्त्रसंभार विंगात फेकून काम करणाऱ्या बाया येथे या पट्टीवर येऊन आपल्या देहाचे कोन-काटकोन-त्रिकोण प्रदर्शितात. येथेच त्यांच्या शरीराची वेडीवाकडी वळणे व्यक्त होत असतात. म्हणून दर्दी प्रेक्षक या पट्टीच्या कडेच्या जागा पटकवितात. निदानपक्षी रंगमंचकाच्या कडेलगतच्या ! वर बाल्कनीत अगदीच फालतू, म्हणजे त्या मानाने सभ्य, किंवा लाजवट लोक ! बाल्कनीत मला फारच थोडे लोक दिसतात, आणि त्यांत पाचसहा स्त्रियाही असतात. ( मी मनातल्या मनात विचारतो, पुरुषांच्या स्ट्रिप-टीझ्ला एक तरी पुरुष प्रेक्षक मिळेल काय ? ) खाली त्या मानाने बरेच. पण बहुतेक सारे माझ्या-

सारखे मध्यमवयस्क — खऱ्याखुऱ्या अर्थाने आंबटषोकी! तरुणांचा बहुतेक अभाव. आपल्याकडे स्ट्रिप-टीज्‌चा मामला आला तर अशा कार्यक्रमांना तरुण तोबा करतील. आपल्या बहुतेक अविवाहितांना स्त्रीदेह म्हणजे एक गूढच असते (आणि या गूढाचे शक्य तितके संरक्षण करण्याची आपली नीती असल्यामुळेच आपल्याकडे स्ट्रिप्-टीज् येण्याचा संभव नाही.) पण जपानी तरुणांनी या गूढाचा केव्हाच भेद केलेला असतो. तरुण देहाची मस्त सळसळ ज्यांना कित्येक दिवसांत अगर वर्षांत पाह्यला सुद्धा मिळालेली नसते तेच येथे गर्दी करतात. पण यातले देखील निव्वळ नग्नदेहाच्या आकर्षणाने थोडेच येतात. नग्न देहदर्शनाच्या दरम्यान तमाशेवजा अगर फार्सवजा प्रहसने असतात ती पाहण्यासाठी ते फार करून येतात. नग्नतेच्या वस्तादणी आपल्या कलेच्या कारवाया करीत असतात, तेव्हा हे प्रेक्षक बहुतेक थंड, सुस्त, सिग्रेट झुकीतच असतात; पण जेव्हा एखादा फर्मास फार्स उघडतो तेव्हा ते एकदम जागे होतात, तवाने होतात; कान, डोळे, सारे शरीरच टवकारतात. लवकरच हसणे-खिदळणे–ओरडणे सुरू होते. हे फार्स म्हणजे भलतेच रांगडे प्रकरण असते. पाहता पाहता आमच्या समोर संडासाचा सीन मांडला जातो. मला कळमळायला लागते, पण जपानी प्रेक्षकांना त्यात विलक्षण रस वाटतो! (अगदी अत्र्यांच्या गोमागणेश पितळी दरवाजा या गोष्टीमुळे आपल्याला वाटतो तसा— पण या गोमागणेशाचे प्रकरण स्टेजवर रंगविण्याची अत्र्यांना सुद्धा हिंमत होईल असे वाटत नाही!)

हा संडास-सीन संपतो, नग्न देहाची चेष्टिते सुरू होतात, आणि मघांचा हशा–ओरडा एकदम थंड होतो. मी विचार करू लागतो, नग्न देहाचे प्रकरण यांना असे बेचव का वाटते, आणि मग ध्यानात येते की ही सारी (उलटी) जादू त्या देहावर जे गडद रंगीत प्रकाश टाकण्यात येतात त्याची आहे. जपानात नग्न देह रंगीत प्रकाशाने अगदी माखून टाकण्यात येतात. पॅरीसच्या प्लास पिगालमध्येच असे करीत नाहीत आणि म्हणून स्ट्रिप-टीज्‌चे माहेर अद्याप पॅरिसमध्येच आहे. पुष्कळ प्रेक्षकांना ही फसवणूक पसंत पडत नाही. त्यातले एकेक बाहेर पडू लागतात. मीही त्यांच्यात सामील होतो.

*　　*　　*

माझी पावले आपोआपच त्या 'चोर बाजार'कडे वळतात. त्या बाजारातला जोर, जोम, जोश मला अधिक आकर्षक वाटतो. तेथे प्रतीत होणारी वखवखलेल्या

जीवनाची उसळी मला आपल्याकडे खेचीत असते. पण आता, मघाशी ज्या पेयगृहांकडे आणि आहारगृहांकडे माझे दुर्लक्ष झाले होते, ती आता नजरेत भरू लागतात. त्याचा स्वाद नाकात शिरू लागतो. काचेच्या तावदानापलीकडे तयार पदार्थांच्या बश्या असतात. त्यांचे रंगरूप वेध लावते. पण ध्यानात येते की या बश्या, हे पदार्थ प्लास्टिकचे आहेत—जाहिरातीसाठी मांडलेले आहेत. आणि मग जाणीव होते की, येथल्या या उपाहारगृहांची दृष्टी अधिक रोखठोक आहे. गिंझातल्याप्रमाणे दर्शनी भागावर कलेची वायफळ उधळपट्टी करण्यापेक्षा आतल्या खाद्य पदार्थांचे रोचक सत्य गिऱ्हाइकांच्या डोळ्यांत ओतण्याकडे त्यांचे अधिक लक्ष आहे. अर्थात जपानी रक्तात मुरलेले कलाप्रेम जाते कोठे ? दरवाज्यात एखादी बॉन्सायची कुंडी किंवा शेवंतीचा रोपा ठेवलेला असतोच. पण आता माझ्या मनावर खाद्यपदार्थांचाच अधिक अंमल असतो. मी एका सुशीच्या दुकानात शिरतो.

हे सुशीचे दुकान म्हणजे काय, दुकानाच्या मधोमध पार्टिशनवर एक आडवी फळी आणि त्यावर भराभर ठेवण्यात येणाऱ्या सुशीच्या बश्या. या फळीपाशी पाचसहा इसम उभे असतात. खात असतात, पीत असतात; आणि पार्टिशन-पलीकडच्या, सुशीच्या बश्या देणाऱ्या मुलीशी गप्पा मारीत असतात. पण ती मुलगी एखादाच शब्द बोलते, बहुतेक हसतेच, आणि क्वचित डोळ्यांभोवतालच्या वळ्या मुरडते. तिचे खरे लक्ष सुशी बनविण्यात असते. सुशी म्हणजे समुद्रातील एका वनस्पतीच्या पापुद्र्यावर पसरलेल्या भातात ताजा कच्चा माशाचा तुकडा गुंडाळून तयार केलेले गोलाकार सॅण्डविच. ही मुलगी पापुद्र्या-वर भात पसरते, आणि त्यात माशाचे लाल गुलाबी तुकडे टाकण्याचे काम तिच्या पलीकडचा एक पुरुष करतो. त्याचा उद्योग पाहून माझे काळीजच थरथरते. एका पाण्याच्या टाकीतून तो जिवंत मासा काढतो, मोठ्या झपाट्याने एका फळीच्या तुकड्यावर त्याचा तडफणारा देह ठेवतो, आणि सुरीने चीजचे तुकडे करावे तसे त्याचे तुकडे करतो! ताजा मासा म्हणजे जिवंत मासा—इतका जिवंत की, सुशीत गुंडाळलेला तुकडासुद्धा तडफडत आहे असे वाटते. माझ्या समोर बशी येते तेव्हा या तुकड्याने तोंडातून उडी टाकली तर, या विचाराने हात थोडासा अडखळतोच! असा हा सुशीचा प्रकार! 'जीवो जीवस्य जीवनम्' याचे प्रात्यक्षिक!

माझी पावले कन्नोन मंदिराकडे वळतात. मंदिराचे शिखर दिसत असते— माझी दृष्टी त्याचा वेध घेत आहे तोच कसला तरी गलका उठतो. घोषणा ऐकू येतात. मंदिराकडूनच येत असतात. माझी पावले भराभर पडू लागतात...... मंदिराच्या आवारात गर्दी असते. तरुणांचा मेळावा असतो. काहींच्या हातात पताका असतात. एकीवर अणुगोलाचे प्रचंड चित्र असते. का नकळे, माझी दृष्टी त्या चित्राकडून मंदिराच्या कंदिलाकडे जाते. मी विचारतो, हे काय आहे? एक जण सांगतो, अण्वस्त्रांच्या निषेधासाठी हे विद्यार्थी जमलेले आहेत. पण मग हे या मंदिरात कशाला? शांततेसाठी प्रार्थना करण्यासाठी हे इकडे आले आहेत. इतक्यात या विद्यार्थ्यांच्या घोळक्यातून एकजण मंदिरात शिरतो. त्याच्या अंगावर बौद्धपंथीय पुजाऱ्याचा पोशाख असतो. तो देवळात शिरतो. कन्नोनच्या मूर्तीपुढे लीन होतो आणि परवच्यासारखे भासणारे मंत्र म्हणू लागतो. मी विचारतो, हे मंत्र कसले? मला माहिती पुरविणारा इसम सांगतो की, हे तरुण विद्यार्थी एका बौद्ध पंथाचे अनुयायी आहेत. जपानमध्ये असे अनेक पंथ महायुद्धानंतर उदयास आले आहेत.

मी ते मंत्र ऐकत उभा राहतो. इतक्यात माझे लक्ष त्या बाकावर बसलेल्या म्हाताऱ्याकडे जाते. त्याने आपला लाकडी पाय आता शेजारी बाकावर ठेवलेला असतो! तो विद्रूप दिसतो, आणि माझे लक्ष पुनः त्या विद्यार्थ्यांच्या जमावाकडे जाते. त्यातले काही अतिशय देखणे, तरतरीत, जोमदार दिसतात. माझी नजर तो म्हातारा, तो लाकडी पाय आणि तरतरीत तरुणांचा मेळावा यांच्या दरम्यान फिरू लागते. इतक्यात त्या म्हाताऱ्याची इतका वेळ जमिनीवर खिळलेली नजर त्या मेळाव्याकडे वळते – आणि लगेच मागे येऊन जमिनीला भिडते. आता ती अधिकच निस्तेज दिसते. माझ्या मनातले सारे विचार एकदम गळून पडतात. मन अगदी रिकामे झाल्यासारखे वाटते. वाऱ्यावर उडणाऱ्या फाटक्या कपट्या-सारखे वाटू लागते. इतक्यात मंदिराच्या पडवीत एक सुंदर गेशा एका गलेलठ्ठ पोटाळ पेहेलवानाच्या हातावर रेलून येताना दिसते! गेशा जगाची करमणूक करतात, पण त्याचे प्रात्यक्षिक हे असे, आता या वेळी, मिळेल असे वाटले नव्हते! जगाच्या व्यवहारात शक्तीचीच पूजा चालते! करुणादेवीच्या आवारात सुद्धा!



# किमोमियाची जत्रा

आमची मोटर यावातानोच्या एका बसस्टँडवर थांबते.

"चला उतरा-" योशिए म्हणते. मी उतरतो नि माझे लक्ष स्टँडवर उभ्या असलेल्या बसकडे जाते. ही बस किती ऐषआरामी, ऐश्वर्यशाली! मला आमच्या एस्. टी.ची आठवण होते आणि हाडे आतल्या आत थरकापतात!

आणि बसस्टँड तरी किती झकास! छोटासाच. पण तेवढ्या गर्दीतसुद्धा एका कोनात बॉन्सायची कुंडी ठेवण्याची दक्षता! आणि तुमची विचारपूस करण्यासाठी एक गोड हसरी पोरगी आहेच. पासीन तिला काही तरी सांगतो, आणि ती फोन उचलते. मी योशिएकडे प्रश्नार्थक नजर टाकतो. ती म्हणते "हॉटेलमध्ये जागा आहे का याची चौकशी चालली आहे." बरोबर, आज जत्रा! आज हॉटेले भरगच्च असणार. जागा नसली तर कसे होणार बुवा!— काळजीची रेषा अंतःकरणावर उमटून जाते.

आता तेथल्या खुर्चीवर टेकून वाट पाहण्याखेरीज दुसरा मार्गच नसतो. मी व योशिए एकमेकाकडे बघून करवादलेले हसतो आणि जागा मिळेल तेथे टेकतो.

"आहे बुवा एका हॉटेलमध्ये जागा. त्याचा मनुष्यच आम्हाला न्यायला येतो आहे." पासीन सांगतो आणि लगेच कौंटरवरच्या पोरगीशी 'आसो-ओनोने'ची जपानी गंमत सुरू करतो. योशिए आपल्या निमुळत्या डोळ्यांभोव-तालच्या वळ्या हसऱ्या करून त्यांच्या बातचितीत भाग घेते, आणि मी समोरच्या दुकानाचे निरीक्षण करीत बसतो.

समोरच्या दुकानात दीपोत्सव सुरू असतो. जपानी दुकानांच्या समोर कंदिलांची रांग नेहमीच उजळत असते, पण आज या कंदिलांत काही एक निराळीच झळाळी भासते. कंदिलांचे लाल, निळा, नारिंगी, हिरवा असे रंग ताजे तकतकीत भासतात आणि त्या प्रत्येक कंदिलावर जपानी चित्रलिपीतले निळे, पिवळे, हिरवे, गुलाबी रंगाचे अक्षर असते. साऱ्या कंदिलांवर एकच अक्षर. माझे लक्ष एका कंदिलावरील अक्षरावरून दुसऱ्या कंदिलावरच्या अक्षरावर उड्या मारते. थोडा वेळ नजर अशी नुसती धावत राहते. जरा वेळाने ही चंचल नजर मधल्या हिरव्या कंदिलावरच्या गुलाबी रंगावर स्थिरावते – आणि मग कंदिलांवरची अक्षरे एकत्र येऊन या एका अक्षरात विलीन होत आहेत असे वाटते – आणि त्या अक्षरांच्या वेलांट्यांत इंद्रधनुष्य नाचू लागते. माझी नजर मुग्ध होते. या रंगांच्या जादूत रमते – किती तरी वेळ रमते – मग अबोध बनते. क्षणभर रंग लोपतात, सफेत बनतात, पुन्हा उजळतात.

योशिएची 'पाध्ये' अशी हाक कानांवर येते नि माझी तंद्री मोडते. पुन्हा ती निळ्या, पिवळ्या, हिरव्या, गुलाबी, नारिंगी रंगांची रांग



साकार होते. इतक्यात योशिएची आणखी एक हाक कानांवर येते नि मी उठतो. उठता उठता मी मनाला झटकतो आणि मग ध्यानात येते की हॉटेलचा माणूस आला आहे. त्याच्या हातात तसाच एक कलिंगडाच्या आकाराचा कंदील आहे. त्यावरही चित्रलिपीतले तेच अक्षर आहे. मी योशिएला विचारतो, "काय ग, या कंदिलावरचं हे अक्षर कसलं?" ती उत्तरते, "अहो, ही किनोमियाची जत्रा नाही का – तिचं हे बोधचिन्ह." माझ्या मनात विचार येतो, एकंदरीत अक्षरात दैविकता ओतण्याची आमची युक्ती जपान्यांनाही अवगत आहे.

इतक्यात पासीन मोटार नीट आडोशाला उभी करून येतो आणि आम्ही हॉटेलच्या माणसाबरोबर चालू लागतो. दहापाच पावले जातो तोच आड-वाटेला लागतो – आणि मोटारचे, मोटाररस्त्याचे, बसस्टँडचे, दुकानांच्या झकपक आराशीचे आधुनिक जग संपुष्टात येते; आणि खडकाळ पाऊलवाटांचे, खडक-खबदाडींचे, रानगवताचे, झाडाझुडपांचे, आणि या साऱ्याला वेढून राहिलेल्या संथ मुग्ध काळोखाचे सनातन जग सभोवार पसरते. लवकरच या काळोखाची कळा आमच्या अस्तित्वात भिनू लागते. काळोखाचा एकेक कण

आमच्या रोमरंध्रात शिरतो. त्याचे काजळ पापण्यांवर चढते. त्याच्या लाटेवर हेलावत हेलावत मी चालत राहतो.

पण हॉटेलच्या माणसाच्या हातातल्या कंदिलाने या काळोखाच्या विश्वात एक उजेडाचा गोल निर्माण झालेला असतो. आम्ही सारे या गोलात असतो. हा गोल आमच्याबरोबर चालत असतो आणि आम्ही त्या गोलात पावले टाकीत असतो. पण सभोवतालचा काळोख चारी दिशांनी आपल्यावर चालून येत आहे, आपल्या पोटात आमचा हा उजेडाचा इवलासा गोल गडप करीत आहे, असे वाटते. इतक्यात या उजेडाचा एक पट्टा कडेच्या झाडाच्या फांद्यांच्या आधाराने त्याच्या विस्तारात शिरलेला दिसतो; पण तेथे दाटलेला काळोख डोळे वटारतो आणि बिचारा उजेडाचा पट्टा मागे फिरतो. माझी नजर क्षणभर उजळलेल्या त्या विस्तारातच अडकून पडते. क्षणार्धात तिच्यावर अंधार येतो. डोळे पाहातनासे होतात–आणि आवाजाची दुनिया एकदम जिवंत होते. रातकिड्यांची किरकिर, पायाखालचा खरख, बांधावरून पडणाऱ्या धारेचा संतत आवाज – या अंधाऱ्या आवाजात माझे मन मुग्ध होते आणि एक प्रकारच्या निरभ्र निर्मळ शांतीचा प्रत्यय येतो.

मी स्वतःला विसरतो आणि भूत[illegible] जमा होतो. लहानपणी कोकणात मी असाच रात्रीबिरता भटकलो होतो – कधी चुडीच्या उजेडात तर कधी कंदिलाच्या, पण बहुतेक काळोखातच. तो पाटाच्या पाण्याने ओला झालेला काळोख. झाडांच्या विस्ताराने दाटलेला काळोख. क्वचित आकाशातील ताऱ्यांच्या प्रकाशाने विरविरीत बनलेला काळोख. एकदा एका झाडातून चीत्कार करीत उडालेल्या व लगेच दुसऱ्या झाडात गडप झालेल्या पक्ष्याच्या झेपेने तो काळोख हेलावला होता. एकदा रानमांजराच्या ओरडीने तो कंपित झाला होता. एकदा शिडशिडलेल्या पावसाने तो शहारला होता – पण प्रत्येक वेळी नंतर एक प्रकारच्या दाट, खोल स्तब्धतेचा, नीरव शांतीचा प्रत्यय आला होता. मला त्याची आठवण होते आणि तसाच प्रत्यय आता येऊ लागतो.

जरा वेळाने आमची पाऊलवाट ओढ्यात शिरते, ओढ्यातल्या दरडीवरून उड्या मारते आणि पाण्याचा स्पर्श न होता पलीकडे जाते. पलीकडे जाताना माझे डावीकडे लक्ष जाते, आणि काळ्याभुरकट पेन्सिलने काढलेले एक चित्र नजरेसमोर रेखते. काही नाही, एक साधे शेत, मध्ये छोटेसे आवार आणि

आवारात गडीगूप झालेले केंबळी घर. लहानपणी भावंडाबरोबर लपंडाव खेळतानाचा ‘ सुट्ट्यो ’चा पुकारा मला ऐकू येतो आणि कोकणातले बालपणाचे टसे अंतःकरणावर उमटवीत मी ओढा ओलांडतो.

ओढा पार होतो आणि आमच्या पाऊलवाटेचा एकदम रस्ता बनतो. रस्ता म्हणजे छोटीशी पांदण. उजवीकडे कमरभर उंचीचा धक्का आणि डावीकडे एकमेकांच्या खांद्याला खांदा भिडवून उभी असलेली घरे. प्रत्येक घरासमोर किनोमियाचा कंदील, पण घरात मात्र सामसूम. दुरून कसल्या तरी गलबल्याचा आवाज येतो, पण तो कानांत सामावण्याची शक्ती आता नसते. पाय दमलेले असतात. दिवसभराच्या प्रवासाचा थकवा अंगावर पसरलेला असतो. दमलेली पावले थोडा वेळ ओढल्यावर हॉटेलच्या जाळीदार दरवाजाचे दर्शन होते आणि शरीरातल्या नसा एकदम मोकळ्या होत आहेत असे वाटते. हलक्या पावलाने हॉटेलात पाऊल टाकतो तो हॉटेलची मुलगी हातात सपाता घेऊन समोर उभी. ती आमच्यापुढे येते. कलदार हसते आणि लयदार लवून आमचे स्वागत करते. त्याबरोबर जपानचा साक्षात्कार होतो—आणि अंतःकरणातल्या कोकणच्या कळ्या एकदम किसाराणीच्या * फुलांत उमलतात !

हॉटेलच्या पडवीत बूट काढताना डावीकडच्या ओसरीकडे लक्ष जाते. ओसरीवर बुद्धिबळासारख्या खेळाचे दोन अड्डे सुरू असतात. मी बुद्धिबळाचा उल्लेख केल्याबरोबर पासीन म्हणतो, “ हां सांभाळ. तू या खेळांचा अपमान करीत आहेस. या खेळाचं नाव ‘ गो ’. बुद्धिबळाच्या एकदम सातदा तोंडात भडकवील असा हा खेळ आहे. ” पासीनचे म्हणणे मला पटते. त्या खेळात गढून गेलेल्यांचे चेहरेच तसे सांगतात. बुद्धिबळे खेळतानाची त्रस्त व्यग्रता प्रत्येकाच्या चेहऱ्यावर सात पटींनी वावरत असते. मनातल्या डावपेचांच्या तेढीने प्रत्येकाचा चेहरा सातपट ओढलेला असतो. बाहेरच्या जगाविषयीची बेफिकिरी चेहऱ्यावर मख्खपणा धारण करून वावरत असते. सारे एकजात तरुण आहेत — पण आजची जत्रा त्यांच्या गावीही दिसत नाही. या जत्रेसाठी मुद्दाम टोकिओहून आलेले आम्ही, पण आमचे आगमन त्यांच्या खिजगणतीतही नाही.

---

* पारिजातकासारख्या पानांचे आणि करवंदीसारख्या फुलांचे, पारिजातकाची आठवण करून देणारे, एक जपानी झाड.

अतामीच्या मानाने हे हॉटेल गरीब. अतामीच्या गोड अनुभवांची पुनरावृत्ती येथे होत नाही. म्हणजे तुम्ही खोलीत शिरल्याबरोबर हॉटेलची मुलगी तुमच्या मागोमाग पिसाच्या पावलाने येत नाही. तुमच्या अंगावरचे एकेक वस्त्र अलगद हाताने दूर करीत नाही. आपले शरीर लहान मुलाच्या निरागस कुतूहलाने, नि त्याचबरोबर प्रियकराच्या मिस्किल मुग्धतेने तिच्या स्वाधीन करण्याचा अधुरा अनुभव मिळत नाही. हे चालू असताना अंतः-करणाच्या अवकाशात फुलपाखरे उडत आहेत असे वाटत नाही. न्हाणीघरा-तल्या गरमगरम पाण्यात तुमच्या शरीरातला सारा थकवा विरून टाका, असे ती शब्दात बिलोरी हास्य मिसळून सांगत नाही. खरे म्हणजे, शरीर इतके थक-लेले असते, इतके थकलेले असते की या हॉटेलमध्ये न्हाणीघर – उष्ण झऱ्याचे न्हाणीघर – आहे का अशी चौकशी करण्याचेही मनात येत नाही. मी खोलीत शिरतो नि भरकपड्यानिशीच अंग ततामीवर झोकून देतो. मुलीचे कार्य ततामीच करते. तिचा स्पर्श शरीराला विलक्षण विसाव्याचा वाटतो. पण सारी इंद्रियेच थकलेली असतात. डोळ्यांना बोध होत नाही. कान ऐकत नाहीत. अवयव हाल-चाल करीत नाहीत. किती तरी वेळ तसाच पडून राहतो. जरा वेळाने कानांना बोध होऊ लागतो. जवळपास कसलासा गलका सुरू आहे असा भास होऊ लागतो. मरू दे – असेल जत्रेचाच काही कार्यक्रम – पाहू उद्या, असे म्हणून इंद्रिये आवरण्याचा प्रयत्न करतो. पण लवकरच गलक्याला आकार येऊ लागतो. रूप येऊ लागते. नाटकाबिटकातला संवाद ऐकू येतोसे वाटते. जत्रेतले नाटक? शरीरातली चेतना डोळे उघडते – अंगाला एक झटका देते. मी उठतो. खिडकीतून बाहेर पाहतो. नाटकाच्या स्टेजचा एक कोपऱ्यातला तुकडा छपरांच्या दाटीवाटीतून नजरेस पडतो. समोर उघड्यावर बसलेल्या गर्दीचा एक चिंचोळा तुकडाही दिसतो. मुले, बाया, बाप्ये – त्यांतला एक उठतो आणि तावातावाने बोलतो. पण त्याच्या हातवाऱ्यांचा वेध घेण्याची शक्ती पेंगलेल्या नजरेत नसते. मी पुन्हा पडण्यासाठी वळतो, इतक्यात मुलगी अंथरूण घेऊन येते. मी अंथरुणावर लोळण घेतो नि डोळे मिटतो. थकलेले डोळे मिटतात, पण झोपत नाहीत. डोळ्यांपुढे कसली तरी पुसट पुसट चित्रे सरकू लागतात. जरा वेळाने ती स्पष्ट होतात. कोकणात लहानपणी जत्रेत पाहिलेल्या नाटकाची चित्रे आकारतात. असाच गलका, अशीच थाप, रडणाऱ्या कार्ट्यांना उगी करू पाहणाऱ्या आयांची अशीच कंटाळलेली नजर आणि नाटक चालू असताना

उठून, 'अरे काय, तुम्हास आज वाईच अधिक झाली काय?' अशी नटांना शिवी घालणारा प्रेक्षक!... मिटलेल्या पापण्यांवर तरळणारी ही दृश्ये केव्हा उडून जातात कळत नाही.

* * *

सकाळीं न्याहरीसाठी आम्ही तिघेही माझ्याच खोलीत जमतो. न्याहरीची वाट पाहात असता पासीन भिंतीवर लावलेल्या एका नोटिशीकडे माझे लक्ष वेधतो आणि मिस्किलपणे हसतो. ते जपानी गौडबंगाल मला काही कळत नाही, पण ते कळण्यासाठी फार वेळ वाट पाहावी लागत नाही. पासीन लगेच सांगतो, "ही नोटीस म्हणते की पाहुण्यांना एखाद्या सन्मान्य गेशाचा कार्यक्रम करायचा असेल तर पंचवीस टक्के कर द्यावा लागेल, आणि एखाद्या नफेबाज स्त्रीला (म्हणजे वेश्येला) आणायची असेल तर पंधरा टक्के कर द्यावा लागेल." एकंदरीत गेशा महाग. गेशा मनाची करमणूक करते, तर वेश्या शरीराची गरज भागविते. "जपानमध्ये एकंदरीत शारीरिक गरजेच्या वस्तू स्वस्त!" माझ्या या उद्गारांवर पासीन हसतो आणि योशिए म्हणते, "Padhye, I didn't know you were so wicked."

न्याहरी येते. न्याहरीतल्या भातावर माझी नजर खिळते. कोकणात लाल भात असतो, थेट तसाच हा भात आणि त्यात काळेपांढरे तीळ. पासीन म्हणतो, "हा भात हे आजच्या सणाचं मुख्य पक्वान्न." मला गंमत वाटते. जपानी संस्कृतीत कोकण किती भरले आहे हे! मग मी आमच्या धुंधुर्मासाची माहिती सांगतो, तिळाच्या लाडवांचे वर्णन करतो, संक्रांतीच्या सणाचा तपशील रंगवितो आणि माझ्या भातातले तीळ गोळा करून योशिएच्या भातावर टाकून म्हणतो, "तिळ-गूळ खा आणि गोड बोला!"

आणि मग सणांचे वर्णन करण्याला भरती येते. पासीन आजच्या सणाची माहिती सांगतो. आजचा सण हा किनोमियाचा सण. किनोमिया म्हणजे यावा-तानोचे कुलदैवत. सागरी दैवत. या मच्छिमार गावाचे आवडते दैवत. पण किनोमिया कसला! तो महामिस्किल. चावट. सदानकदा खोड्या करण्यात गुंतलेला. या खोड्या निरुपद्रवी असत्या तर हरकत नव्हती. पण याच्या खोड्या म्हणजे उत्पात. आज काय समुद्रावर एखादे वादळ उठव, उद्या समुद्राच्या पोटात एखादे गलबत गडप कर—असे याचे उद्योग. त्याला ताळ्यावर आणण्याचे

असंख्य प्रयत्न यात्रातानीने केले. नवससायास झाले. आराधना झाल्या. साकेच्या हजारो बाटल्या रिकाम्या झाल्या. पण किनोमियाचे क्रूर चाळे चालूच. अखेर एक दिवस त्याने गावच्या म्होरक्यालाच बुडविले. तेव्हा मात्र गाव संतापला. याचा पुरा बंदोबस्त करायचा निश्चय झाला. समुद्रकाठच्या गुहेतून किनोमियाची उचलबांगडी केली आणि त्याला दूर डोंगरावर नेऊन ठेवले तर त्याचे चाळे बंद होतील, असा पुजाऱ्याला दृष्टान्त झाला. लगेच गावाने पूर्वेकडच्या डोंगरावर एक सुंदर देऊळ बांधले आणि किनोमियाला तेथे नेऊन ठेवले. देऊळ सुंदर आणि ठिकाण रम्य. किनोमिया खूश झाला. समुद्रावरची वेभरंवशी वादळे थांबली. पण पुजाऱ्याला पुन्हा दृष्टान्त झाला. किनोमियाला समुद्रदर्शनाची फार इच्छा झाली आहे; त्याला एकदा समुद्रदर्शन घडवा. तेव्हापासून या गावचे लोक किनोमियाला समुद्रकाठी मोठ्या समारंभाने आणतात. एक दिवस किनोमिया समुद्रकाठाने हिंडतो, हुंदडतो आणि मग लोक त्याला पुन्हा समारंभाने परत पोचवितात. आज किनोमियाला परत पोचविण्याचा समारंभ. किनोमियाच्या या कथेने आजच्या सगाचा अर्थ मला समजतो आणि त्यात एक नवीनच रस वाटू लागतो. जत्रेत सामील होण्याचा एक नवाच उत्साह अंगात संचारतो.

* * *

आम्ही किनोमियाची गुहा पाहण्यास जातो. गुहा म्हणजे काय, एक अवाढव्य खबदाड. अगदी उघडे. येथे बसून वादळाचे तडाखे मनसोक्त चाखण्याची सोय. गुहेत आम्हाला किनोमिया दिसत नाहीच, पण त्याच्या प्रतिमाही दिसत नाहीत. दहाबारा लाकडी देव्हारे वेडेवाकडे ठेवलेले आढळतात, पण त्यांपैकी एकाही देव्हाऱ्यात किनोमियाची मूर्ती दिसत नाही. फक्त सशाच्या प्रतिमा आणि साकेच्या बाटल्या दिसतात. त्यात एक मोठा देव्हारा असतो, त्यात किनोमियाची मूर्ती दिसेल म्हणून मी पाहू लागतो, पण त्यात साके-सशाबरोबर फक्त एक चकचकीत धातूचा आरसा दिसतो. मी पासीनला विचारतो,

—या एकाही देव्हाऱ्यात किनोमियाची मूर्ती नाही हे कसे?

—मूर्ती? कसली मूर्ती? जपानच्या देवळात मूर्तीबिर्ती काही नसते.

—म्हणजे?

—म्हणजे म्हणून काय विचारतोस? अरे, देव कधी दिसतो काय? तो अदृश्य असतो. मग त्याची मूर्ती कशी बनवायची?

—आणि तो आरसा ?—ती साकेची बाटली ?

—आरसा म्हणजे आत्म्याचे प्रतीक.

—आणि ती साके ?

—साके हवीच. ती आत्म्यापेक्षा अधिक आकर्षक आणि अधिक वास्तव.

—अच्छा! म्हणजे, आत्म्याचा शोध लावायचा असेल तर आधी भरपूर साके प्या, असा किनोमियाचा संदेश आहे!

('पाध्ये, यू आर व्हेरी व्हेरी मिसूचिव्हस' —योशिए.)

—बरं, हा ससा कशाला ?

— ससा ? ससा नव्हे तो वेड्या. कोल्हा.

—कोल्हा ? जपानी कोल्हा सशासारखा दिसतो की काय ? बरे, तो इथे कशाला ?

—अरे, कोल्हा हा किनोमियाचा आवडता प्राणी – तुमच्या शंकराच्या नंदीसारखा.

—का ?

—आपल्या व्रात्य उद्योगात त्याचा उपयोग होतो म्हणून. कोल्ह्याबद्दलच्या जपानी लोकांच्या समजुती तुला माहीत नाहीत वाटते ? अरे, कोल्हा हा महा-मिस्किल अन् महाबिलंदर. हव्या त्या प्राण्याचे अगर व्यक्तीचे रूप घेऊन लोकांना हुलकावणी देण्यात वाकबगार. मच्छीमारीला गेलेले कोळी एखाद्या बेटावर उतरले म्हणजे किनोमिया कोल्ह्याला सुंदर तरुणीचे रूप घेऊन तिकडे पाठवी, आणि ते कोळी तरुणीच्या लीलांत रमले की इकडे वादळ उठवून त्यांची गलबते बुडवी!

किनोमियाचे कौतुक करीत आम्ही पलीकडच्या टेकडीवर जाण्यासाठी निघतो. तोच गुहेच्या आवारातच एक स्तंभ दिसतो. स्तंभ म्हणजे कातळात रोवलेला एक लाकडी खांब आणि त्याच्या बुंधात काळ्याकाळ्या गोट्यांची रास. "हे काय ?" मी विचारतो. "हे त्या किनोमियाने बुडविलेल्या गावच्या म्होरक्याचे स्मारक." ते देव्हारे आणि ते स्मारक – आजच्या सणाचे रहस्य या दोहोंत सामावलेले दिसते.

टेकडीचा आकार मोठा विलक्षण असतो. एका खडकावर दुसरा, दुसऱ्या-वर तिसरा, अशी ती चढत जाते. आम्हीही तसेच चढत जातो. धारेवर येतो तो समुद्र आणि खाली टेकडी – एका कराळ कड्याच्या रूपाने तुटलेली. मी

कड्याच्या काठावर जातो आणि खाली नजर टाकतो. कड्याच्या पायथ्याशी लाटांचा राक्षसी खेळ सुरू असतो. एक पिसाळलेली लाट येते, खसकन् फुटते आणि लगतच्या घळीत लपकन् शिरते. शिरते नि फेसाळून परत येते. परत येताना थोडी लालट होऊन येते. पासीन सांगतो, परत येताना लाट थोडी लाल वाळू घेऊन येते; पण लोकांना वाटते, यात रक्त मिसळलेले आहे – किनोमियाच्या एखाद्या उपद्व्यापाचे.

परत येताना रस्त्याच्या कडेला एक खांब पडलेला दिसतो, आणि पासीन थबकतो. त्या खांबापाशी जातो. खांब खरोखर नमुनेदार असतो. लाकडाचे रेषासौंदर्य दाखविण्याच्या जपानी कलेचे कौशल्य त्या खांबात पहिल्या नजरेतच दिसते. एखाद्या स्त्रीच्या नितळ मानेवर लबदार केसांची माया दिसावी तशा त्या खांबाच्या रेषा दिसतात. त्या खांबाच्या टोकाचे कोरीव काम हा त्याच्या सौंदर्याचा अक्षरशः कळस असतो. पासीनच्या चेहऱ्यावर आश्चर्य उमटते — हा स्तंभ असा बेवारशी का पडलेला बुवा ?

—बेवारशी ? मी विचारतो.

—वास्तविक आजच्या सणात या स्तंभाचे महत्त्व फार. दर वर्षी त्या गुहे-पासून जत्रेच्या चौकापर्यंत तो उचलून नेण्याची शर्यत लागते. हा दिसतो नाजुक, पण त्याचे वजन भारी आहे. त्यातली ती गाठ पाहा, म्हणजे खात्री पटेल. मी मी म्हणविणाऱ्या तरुणांचा दम उखडतो तो. पण यंदा असा बेवारशी का पडलेला बुवा ?

शेजारच्याच आवारात एक इसम पार्सिमनची फळे निरखीत असतो. त्याला पासीन विचारतो, आणि तो सांगतो की, यंदा हा स्तंभ उचलून नेण्याच्या शर्यतीत भाग घेण्यासाठी कोणी तरुण पुढे सरसावलाच नाही. दिवसेदिवस तरुण मंडळीचे या असल्या सणांत लक्षच नाही. गावात सण उसळतो आणि हे तरुण गावात उनाडक्या करीत हिंडतात, नाही तर 'गो'चे अड्डे मारून बसतात. मला लगेच हॉटेलच्या ओसरीवर खेळत बसलेल्या त्या 'गो'-भक्तांची आठवण होते. काल रात्री आम्ही आलो तेव्हा ते जे 'गो'च्या अड्ड्यावर टाण मारून बसलेले होते ते आज सकाळी आम्ही बाहेर पडलो तेव्हा तेथ कायमच होते. काल त्यांनी आमच्याकडे ढुंकून बघितले नव्हते आणि आज सकाळीही बघितले नव्हते. या बहाद्दरांचा विचार करीत करीत आम्ही परत येतो आणि

येताक्षणीच माझे लक्ष त्यांच्याकडे जाते. त्यांचे चेहरे तसेच आक्रसलेले असतात. त्यांची नजर तशीच गढलेली असते. त्यांची वृत्ती तशीच मख्ख असते. मला खरोखर त्यांच्या निष्ठेचे कौतुक वाटते.

पण त्या कौतुकात रमून जायला अवसर मिळत नाही. क्षणार्धात आमच्या भोवती मुलांचा गराडा पडतो. आळीतली झाडून सारी मुले आमच्या भोवती गोळा होतात. एकमेकांच्या मागेपुढे सरकून आमच्याकडे टक लावून बघतात. आमच्याकडे म्हणजे माझ्याकडे. माझा अवतारच तसा असतो. एक हिंदी माणूस ती प्रथमच पाहत असतात. लांडा जपानी युकाता चढविल्यामुळे त्याचे पाय उघडेअंके नागवे दिसत असतात. मला मात्र हा मुलामुलींचा मेळावा पाहून खूप गंमत वाटते. अंगणात अवचित पांखरांचा थवा येऊन किलबिलावा तसे वाटते. मुलींचे ते छोटेछोटे शेंदरी, गुलाबी रंगांचे किमोनो, त्यांवरच्या बाहुल्यांच्या गोंडस आकृत्या, त्यांच्या झुलत्या तरंगत्या बाह्या; मुलींच्या निमुळत्या काळ्याभोर डोळ्यांतले अधीर, उत्सुक, लाजवट हसू. माझे मन कोथिंबिरीच्या वाफ्यासारखे मोहरून जाते. आणि ते मुलगे – जपानी मुलगे. छोटेछोटे, एवढ्याशा बांध्याचे, नितळ चेहऱ्याचे, निर्मळ नजरेचे! नेहमीच्या रबरी बुटावर, लांडया पाटलोणीवर निळ्या रंगाचा, पाटीवर किनोमियाच्या अक्षराचा लाल छाप असलेला सैलसा अंगरखा चढविला, नितळ डोक्याला एक पांढरा फडका टापशीसारखा बांधला, कपाळाला पांढऱ्या चंदनाचा उभा नाम फासला, आणि कमरेला आवळलेल्या पट्टयाला एक छोटीशी तरवार अडकवून दिली, की झालो आपण या सणाचे सैनिक – अगदी सामुराईचे अवतार – असे त्यांना वाटत असावे. माझ्या मनात विचार येतो, आणखी दहाबारा वर्षांनी हे मुलगे या सणाकडे पाठ फिरवून 'गो'च्या अड्डयात रमणार!

पण हा विचार फार वेळ टरत नाही. या मुलांच्या दुधाळ ओठांवर नाचणारा सणाचा आनंद दिसतो. त्यांच्या कोवळ्या चेहऱ्यांवरची क्षणात उमलणारी, क्षणात मावळणारी निरागस माया नजर टिपते. त्यांच्या इवलाल्या मूर्तीची इवलाली हालचाल डोळ्यांचा वेध घेते. त्यांच्या हातातल्या धरपकडीच्या चेंडू-बगेवर माझी दृष्टी खेळते आणि नाजुक जिवणीवर ओघळलेला कँडीचा आमसुली मुखरस अलगद पुसणाऱ्या बाहीबरोबर ती फडफडते. माझ्या क्यामेऱ्याला याहून अधिक उत्कृष्ट विषय कोणता? मी क्यामेरा सरसावतो नि मुले खूष होतात. फोटोसाटी ग्रूप करण्याची धांदल सुरू करतात. एकमेकांना ओढतात,

खेचतात. मी बांधाकडच्या फुलझाडांकडे जाऊन क्यामेरा रोखतो. इतक्यात फुलझाडावरची एक गांधीलमाशी चवताळून उठते आणि माझ्या हाताला कडाडून डसते. माझ्या बोटात वेदनेची सणक उठते आणि मी हात झाडतो. मुलांना त्याचीच गंमत वाटते. ती खिद्‌खिदळून हसतात, आणि मग मीही हसतो, पण बोट ठणकत असते. कसा तरी फोटो काढतो आणि बोटाकडे नजर टाकतो तो बोट चांगले सुजलेले. पासीनला दाखवतो, पण तो एक खट्याळ हास्य करून म्हणतो, " किनोमियाची मधाशी चेष्टा केलीस ती ! "

* * *

जरा वेळाने आम्ही जत्रेच्या चौकात फेरफटका करावा म्हणून निघतो. आमच्याबरोबर काही मुलेही येतात. त्यांतली एक मुलगी फारच गोड असते. मी तिचा गालगुच्चा घेतो. त्याबरोबर तिच्या पाठुंगळीला असलेले छोटेसे मूल रडू लागते. ती मात्र लाजते, मुरडते, खुशालते, आणि माझी दोस्त बनते. पण आमची मैत्री मुकी. मला तिच्याशी खूप खूप बोलायचे असते, पण बोलता येत नाही. म्हणून नुसताच हसतो आणि ओथंबलेल्या नजरेने तिच्या नजरेत पाहतो. मी असे पाहिले की तिची नजर गांधळते, ओशाळते, आनंदते. आमचा हा एक खेळच सुरू होतो. अन् मग तिच्या पाठुंगळीच्या मुलालाही समजते की हा मित्रपक्षातला आहे, आपल्या ताईचा दोस्त आहे. त्याचे रडणे पार पळते.

चौकाच्या तोंडाशीच दोन हातगाड्यांवर अष्टपादाची ( ऑक्टोपसची ) सोंगे सजवून ठेवलेली दिसतात. एकाला विदूषकाचे रूप दिलेले असते तर दुसऱ्याला अस्वलाचे ! दुपारी किनोमियाच्या मिरवणुकीत ही प्रकरणे सामील होणार ! हा धार्मिक समारंभाला दिलेला ' लाइट टच् ' ! त्या भयंकर जलचराला विनोदाचे साधन बनविण्याची ही युक्ती, खोडकर किनोमियाला डोंगरावरच्या देवळात अडकून ठेवण्याच्या युक्तीइतकीच मजेदार !—हा विचार माझ्या मनात येतो तोच समोरच्या सताड उघड्या मांडवजा घरात ठेवलेली मिकोशी दिसते आणि तिच्या वैभवाने आणि सौंदर्याने माझी नजर एकदम बांधली जाते. मिकोशी म्हणजे शिंटोपंथीय देवळाची प्रतिमा. जपानी देवळाच्या वास्तुशिल्पाची सारी किमया या मिकोशीत गोळा झालेली असते. जपानी मंदिराचे वैभव त्याच्या छपरात असते तसे या मिकोशीचेही असते. लाकडाचे कोरीव काम, लाखेचे रंगकाम आणि पितळेचे नक्षीकाम यांचा तसाच वर्षाव या मिकोशीवर झालेला

दिसतो. पण माझे लक्ष मिकोशीच्या तोरीवर खिळते. मंदिराची ही प्रतिमा बनविताना कलाकार तोरीलाही विसरलेला नाही. कसा विसरणार? तोरी हा जपानी मंदिरांच्या वास्तुशिल्पाचा एक चमत्कारच. तोरी म्हणजे मंदिराचे प्रवेश-द्वार. आपल्या सांची स्तूपाचे प्रवेशद्वार मनात आणा म्हणजे तोरीची कल्पना येईल. पण दोहोत कोण फरक! सांचीचा दरवाजा म्हणजे सालंकृत शिल्पाचा मुक्तविलास. उलट तोरी म्हणजे साध्या सौंदर्याचा निर्लेप नमुना. तोरीचे सौंदर्य हे साध्या, सलग, नितळ रेषांचे सौंदर्य आहे. एखाद्या आदिवासीने सहज भिंतीवर ओढलेल्या रेषेचे सौंदर्य असते तसे. मेघदूतातील एखाद्या ओळीची ओवीशी तुलना करा म्हणजे सांचीच्या प्रवेशद्वाराची या प्रवेशद्वाराशी तुलना होईल. पण मला सांचीइतके दूर जावे लागतच नाही. समोरच्या मिकोशीचे सालंकृत सौंदर्य आणि तोरीचे हे साधे, सहज सौंदर्य यांचीच तुलना पुरते.

पासीन मला एका केंबळी झोपडीकडे नेऊ लागतो. मी विचारतो, कसली झोपडी ही? पासीन म्हणतो, पाहा म्हणजे समजेल. ही झोपडी अशी भर चौकात का? पासीन उत्तरतो, ते तू त्या झोपडीलाच विचार. झोपडीपाशी गेल्यावर मात्र समजते की ही झोपडी नव्हे, तर रथ – किनोमियाचा रथ. हा रथ इथे असा केंबळ्याने शाकारून का ठेवला आहे? या प्रश्नाचे उत्तर मिळत नाही. तेव्हा मी आपला रथाच्या प्रवेशद्वाराचे कलाकौशल्यच पाहू लागतो. पण त्यातली कारा-गिरीची सांकेतिक उधळण माझे मन पकडू शकत नाही. म्हणून मी रथाच्या बाजूकडे वळतो आणि एकदम ट्रॅन्स्फर सीन झाल्यासारखे वाटते. आता संकेत सुटतात आणि कलेची सळसळ सुरू होते. तेथे झाडावरचे बगळे, चिनी सर्पराक्षस असली सांकेतिक दृश्ये दिसत नाहीत, तर जपानी जीवनातली आणि जीवनात भिनलेल्या लोककथांतली दृश्ये आढळतात. एकमेकांच्या अंगावरच्या उवा मारणारी माकडे, पंख फाकून भांडणाऱ्या कोंबड्या, चौखूर उधळलेले घोडे, मुलांशी वागडणारे कुत्रे, औषध कुटणारा नोकर, पंख्याने वारा घेणारी स्त्री आणि प्रियसहवर्तमान चेरीचा मोहर पाहण्यात दंग झालेला सामुराई – या दृश्यांच्या कोरीव शिल्पाने मी भारला जातो आणि एक प्रकारच्या तंद्रीत ती दृश्ये पाहत रथाला प्रदक्षिणा घालतो.

या तंद्रीच्या आधीन होऊनच मी त्या चौकात हिंडतो. इकडेतिकडे उगाच भटकतो. वाऱ्याची एक सुस्त लहर येऊन कागदाच्या कपट्याशी घोटाळून जाते, तिची गती पाहतो. एक लठ्ठ मांजर घराच्या दाराशी बसून तोंड पुशीत असते,

त्याची हालचाल बघतो. उघड्या घरात अकारण दृष्टी टाकतो. एक फेरीवाला रात्रीचा राहिलेला माल विक्रीत असतो, त्याच्या समोर उभा राहतो. तो माझ्याकडे पाहतो, पण त्याच्या नजरेत साधे कुतूहलदेखील दिसत नाही. मी एका मुलाला उचलून घेतो नि ते रडू लागते तेव्हा त्याला घ्यायला आलेल्या बाईच्या चालण्यात काही जोम दिसत नाही. चौकात दोघेचौघे एक प्रचंड दारूच्या पिंपासारखा ढोल एका बांबूला बांधीत असतात, त्यांच्या हातात काही जोर भासत नाही. साऱ्या चौकावर एक प्रकारची सुस्ती पसरलेली असते. काल येथे नाटकाचे रंग उधळले. आता त्या रंगाची धूळ झाली आहे. दोन दिवसांच्या धबडग्याचा शीण साऱ्या वस्तूंवर, साऱ्या वृत्तींवर, साऱ्या हालचालींवर पसरला आहे. त्यातच, आज हा सण संपणार, खेळ खलास होणार, याची रंजीस जाणीव मिसळलेली असते.

* * *

पण दोन वाजता आम्ही चौकात परत येतो तो तेथे उत्साह नुसता नाचत असतो. बायका, पुरुष, मुले गर्दी करून तयार असतात. त्यातच मुलांची धांदल. धांदल आणि धावपळ ! लाल झोऱ्या इकडेतिकडे धावत आहेत; किमोनोच्या रंगीन बाह्या फडफडत आहेत; पाठीवरची अक्षरे दुपारच्या उन्हात तकतकत आहेत; बिलोरी बोल एकमेकांत मिसळत आहेत; डोळ्यांवरच्या पापण्या उत्सुकतेने उडत आहेत—मुलांच्या उत्साहास अंत उरत नाही. पण अद्याप पुजाऱ्यांचा पत्ता नाही आणि गावच्या म्होरक्याने दिलेल्या जेवणात गुंतलेल्या मानकऱ्यांचा पत्ता नाही.

इतक्यात पुजारी अवतरतात. लगेच झोऱ्या थबकतात, बाह्या स्थिरावतात, बोल थंडावतात, पापण्या टवकारतात. पण पुजारी मंडळी आपल्या डोक्यावरची चहाच्या किटलीवरील टिकोजीसारखी काळी टोपी मागची पुढे आणि पुढची मागे सरकविण्यापलीकडे काहीच करीत नाहीत. मला तो पुजाऱ्यांचा अवतार मजेदार वाटतो. तोंडात पांढऱ्या कागदाचे कपटे, अंगात सफेत सैल चोळणा आणि अजागळासारख्या बाह्यांचा अंगरखा, आणि या पांढऱ्या पोशाखाचे महत्त्व मिरविणारी मुद्रा. जपान्यांच्या मते पांढरा रंग हा पावित्र्याचा रंग; काळीकुट्ट पिशाच्चे त्याला घाबरतात. या पांढऱ्या रंगाचे महत्त्व लोकांच्या मनावर बिंबविण्यासाठी की काय, एक पुजारी उठतो आणि कागदी

चिरफळयांची एक भलीथोरली चवरी ढाळीत पुढे सरसावतो. पण लोक त्याची दखल घेत नाहीत. ते स्वतःतच दंग असतात. बायका किमोनोच्या बाहीआड तोंड लपवून खिदळत असतात. पुरुष एकमेकांशी गंभीर चेहऱ्याने मसलती करतात. आणि मुले कंटाळून जाऊन एकमेकांना ओढतात किंवा ढकलतात. आपल्याकडे कोणीच लक्ष देत नाही असे पाहून तो चवरीढाळ्या पुन्हा आपल्या जागेवर जाऊन बसतो. इतक्यात गावचे मानकरी हलतडुलत, ढेकर देत हजर होतात. त्यांतले कित्येक फडतूस असतील, पण पोशाखाचा रुबाब त्यांच्या चेहऱ्यावर वावरत असतो. हा पोशाख म्हणजे एक काळा किमोनो, त्यावरून बांधलेला तपकिरी रंगाचा परकर आणि या साऱ्यावर मजेत रुळणारा एक काळा कुळकुळीत झगा!

आता मिरवणुकीची रांग लागते. सर्वांच्या पुढे तो ढोल. त्याच्या मागे पुजाऱ्यांचा ताफा. नंतर गावचे मानकरी. नंतर तो चवरीढाळ्या. मग खांद्यावर मिकोशी धारण केलेले पुजारी – आणि त्या साऱ्यांच्या मागे ती अष्टपादादी प्रकरणे. सारे जण 'चलो, हुश्शार!'च्या तयारीत शक्ती ताणतात. पुजारी 'टिकोजी' सरकवतात. चवरीढाळ्या चवरी सरसावतो. मानकरी रुमालाने तोंड पुसतात. मिकोशीधारी मिकोशी या खांद्यावरून त्या खांद्यावर नेतात. पोरे हात-गाड्यांच्या दोरखंडांना हात आवळून पकडतात. आणि काही बाया, मुंबईच्या म्युनिसिपल मास्तरणी राजाबाई टॉवर पाहायला निघालेल्या मुलांना रस्त्यावर राखण्यासाठी जिवाचा आटापिटा करतात तसा, या मुलांना दोरखंडांना जखडून ठेवण्याचा आटापिटा करण्यासाठी त्यांच्या शेजारी पाय गेत्यात रोवून उभ्या राहतात. इतक्यात एक पुजारी हातात झाडाचा टाळा धारण करून पळतपळत येतो, मिरवणुकीच्या अग्रभागी येऊन टाकतो आणि एकदम अंगात आल्या-प्रमाणे स्नायुदार गळ्याने ओरडत आणि हातातला टाळा हवेतच आपटीत चालू लागतो. "हा असे काय करतोय ?" मी विचारतो. पासीन उत्तरतो, "तो पिशाच्चांना शापतो आहे आणि बडवतो आहे!"

त्या पुजाऱ्याच्या अंगात पिशाच्च नाही तरी पिशाच्चाला घातलेल्या शिव्या शिरतात—त्याच्या पायांत भलताच जोर येतो. चालताचालता तो पळू लागतो. तो पळतो म्हणून ढोल पळतो. ढोल पळतो म्हणून चवरी पळते. चवरीबरोबर मिकोशी पळते. आणि या साऱ्यांच्या पावलाबरोबर पाऊल राखण्यासाठी गावचे मानकरीही पोटातले जेवण आणि साके सांभाळीत धडपडू लागतात.

अर्थात पोरांनाही चेव चढतो. ती हातगाडीचे दोरखंड खेचतात, आणि कोलमडून पडतात. काही हसतात, काही दातओठ खातात, आणि एकदोन रडूही लागतात. पण त्यांच्या ‘ मास्तरणी ’ त्यांना सांभाळतात आणि पोरे आपल्या गतीने चालू लागतात. पण त्यांची गंमत पाहत बसायला मला फुरसत नसते. मला किनोमियाची संगत सोडायची नसते. मीही पळू लागतो.

पण पुजाऱ्यांचे पाय चौखूर उधळतात. त्यांच्या तोंडून शिव्याबरोबर फेस येतो. ढोल झिंगून जातो. चवरीला फेफरे येते. मिकोशी वावटळते. मानकऱ्यांची प्रतिष्ठा झुकांड्या खाऊ लागते. साऱ्यांच्या अंगात कसे वादळ संचारते — नि किनोमिया खूष होऊन जातो.

पुजाऱ्यांच्या पावलाला पाऊल भिडविण्याची ताकद माझ्यात नसते. शिवाय सभोवतालचा निसर्ग माझे पाऊल अडखळवीत असतो. यावातानो हे इतर चार खेड्यांसारखेच एक खेडे – प्रवासखात्याच्या मार्गदर्शिकेत त्याचा उल्लेख नसतो. उलट जपानची काही विख्यात सौंदर्यस्थळे मी अगोदरच पाहिलेली होती. आराशियामा येथील ओई नदीवरच्या लाकडी पुलावर उभा राहून पलीकडच्या टेकडीवरील वनश्रीची रंगीन जादू मी अनुभवलेली होती. हॅकोनेच्या एका शिखरावर उभा राहून तळच्या तळ्यातील नौकांचा विहार मी बघितलेला होता. निक्को येथे सुगीच्या दुतर्फा रांगातल्या रस्त्यावर उभा राहून त्या जगप्रसिद्ध वृक्षांची प्राचीन सावली मी घेतलेली होती. ओइसोच्या पुळणीवर लोळतलोळत पॅसिफिकच्या लाटांवर स्वार होऊन हवाईची स्वप्ने मी रंगविलेली होती. त्या मानाने येथला निसर्ग साधा. पण तो माझ्या परिचयाचा असतो. लहानपणी कोकणात जो निसर्ग अंतःकरणात शिरला आणि स्थिरावला त्याच्याशी त्याचे सख्खे नाते असते. रस्त्याकाठच्या पसवलेल्या भाताचा उग्रमधुर गंध आता तसाच नाकात शिरतो. शेतातल्या बिलोरी पाण्याची किणकिण कानांभोवती तशीच रेंगाळते. भाताची रोपे वाऱ्याच्या झोताबरोबर आपल्या लयदार माना तशाच लववीत जातात. आणि या साऱ्याकडे दुतर्फा डोंगरावरचा निसर्ग मुग्ध कौतुकाने तसाच पाहत असतो. पण मी या डोंगराच्या रांगांकडे जरा नजर लावतो आणि आत काही तरी खटकते. ध्यानात येते की – कोकणच्या डोंगरावर, चिडाच्या अष्टवक्र झाडांनी उमटतात तशा चित्राकृती नाहीत. त्या डोंगरावरील वनश्रीला अशी नाजुक नक्षीदार कळा नाही. सुगीच्या झाडाची कलापूर्ण उभार अंजनाच्या झाडांनाही नाही—आणि कोकणचे डोंगर असे स्नेहाळ

वाटत नाहीत. क्षणभर मन खट्टू होते. पण अंतरंगातला अभिमान उफाळतो नि लगेच म्हणतो, पण डोंगरावर एकाकी उभ्या राहणाऱ्या सात्विनाची मिजास येथे कुठे आहे? अभिमानात आव्हान असते, पण मनाची रुखरुख दूर होत नाही.

ती दूर सारण्यासाठीच मी पळू लागतो. पाय पळत असतात आणि दृष्टी समोरच्या देखाव्यावर खिळलेली असते. तो देखावा आजही दृष्टीसमोरून हलत नाही. दोनही बाजूंचे डोंगर येऊन एकमेकांना मिळत आहेत. ते जेथे मिळतात तेथल्या तिकोनाला आडवा बांध टाकून पुरुषभर उंचीचा प्राकार तयार करण्यात आला आहे. प्राकारावर किनोमियाचे मंदिर आपले शोभिवंत शिखर घेऊन उभे आहे. प्राकाराच्या पायऱ्यांवर मंदिराची तोरी आपल्या साध्या, शुद्ध सलग सौंदर्याचे वरदान घेऊन सर्वांच्या स्वागतासाठी सज्ज आहे. प्राकाराच्या मागे शक्ती आणि सौंदर्य यांची एकदम प्रतीती आणून देणारे सुगीचे वृक्ष सहस्रार्जुनाप्रमाणे आपली शृंगारलेली मस्तके आकाशाला भिडवून, आपली सामर्थ्यशाली पावले भूमीवर रोवून, आणि आपले सुंदर सालंकृत बाहू दिमाखाने उभारून दुतर्फा उभे आहेत, आणि त्यांच्या मधून जाणारा अवाढव्य पायऱ्यांचा रस्ता स्वर्गसोपानाप्रमाणे भासत आहे. त्या देखाव्यात स्वर्गाचे सौंदर्य आणि धरेची वास्तवता यांचे मीलन झाल्यासारखे वाटते. मी क्षणभर स्वस्थ उभा राहतो. त्या देखाव्याकडे डोळे भरून पाहतो. सारी इंद्रिये डोळ्यांत जमा झाल्याची एक अपूर्व जाणीव होते आणि मन एक प्रकारच्या पावित्र्याने, परिपूर्तीने, गूढतेने भरून जाते. मला एकदम चार वर्षांपूर्वी पाहिलेल्या दापोलीच्या केशवराजाचे स्मरण होते. किनोमिया आणि केशवराज — एकाने दुसऱ्याचा साक्षात्कार होतो, निसर्गसौंदर्यातील दैविकतेची प्रतीती येते, आणि आत, अंतरंगात परिपूर्तीचा शांत, संतुष्ट प्रवाह वाहू लागतो. कोकण आणि जपान यांच्यामधला भौगोलिक भेद आणि अभिमान आता गळून पडतो आणि निसर्ग व मानव यांना जोडणाऱ्या सनातन संबंधाची निर्भर जाणीव तेवढीच उरते.

आता एका पावन वृत्तीनेच मी प्राकाराच्या पायऱ्या चढून जातो. जातो तो ती धावतपळत आलेली पार्टी आता स्थिरस्थावर झालेली दिसते. प्राकाराच्या मधोमध ढोल आपले बेढब रूप घेऊन पडलेला असतो. आपल्या सौंदर्याने आत्मरत बनलेली मिकोशी एका मंडपाखाली अलिप्त आविर्भावाने उतरलेली

असते. पावित्र्याचा दिमाख मिरवणारी चवरी एका झाडाच्या बुंधाशी अगतिक-पणे आडवी झालेली असते. पुजाऱ्याच्या तोंडातले शाप शांत झालेले असतात. त्याच्या हातातला टाळा जमिनीवर लोळत असतो. काही वेळापूर्वी चौखूर उधळणारे पुजारी मंडपासमोर रांग लावून स्वस्थ बसलेले असतात आणि गावाचे मानकरी आपल्या पोशाखाची प्रतिष्ठा सांभाळीत गंभीर चेहऱ्यांनी इकडे तिकडे फिरत राहतात, नाही तर एकमेकांशी खलबतांच्या गंभीर आविर्भावाने बातचीत करीत असतात. आणि मी – मला यात काहीच स्थान नसल्याने– प्राकाराच्या प्रवेशद्वारापाशी येऊन मिरवणुकीतल्या इतर प्रकारांची प्रतीक्षा करीत राहतो. मधूनमधून तोरीचे सौंदर्य न्याहाळतो आणि तोरीच्या दोन बाजूंस उभारलेल्या उभ्या पताकांवरच्या चित्रलिपीचे गूढ उलगडते का याचा विचार करतो. अखेर पासीनचे साहाय्य घेतो आणि पासीन सांगतो, "या पताका, 'महान देव किनोमिया' आणि 'दक्षिण जपानमधील सर्वश्रेष्ठ मंदिर' यांचा जयजयकार करीत आहेत." मी काहीच बोलत नाही. मनातल्या मनात एवढेच विचारतो की, या दक्षिणेतल्या सर्वश्रेष्ठ मंदिराचा पत्ता टोकिओच्या प्रवासव्यवस्था-विशारदांना नाही हे कसे ?

इतक्यात एक मिरवणूक येते—अष्टपाद विदूषकाची. हा विदूषक एकटा नसतो. त्याला चांगल्या चालत्याबोलत्या, नाचत्या, अगदी उंडारलेल्या विदूषकांची सोबत असते. या विदूषकांच्या सांगात काही कमतरता नसते. आणि कमतरता पडू नये म्हणून हातात साकेच्या बाटल्या असतात. ते त्या एकमेकांच्या तोंडात आणि मधूनमधून अष्टपाद विदूषकाच्या तोंडात ओतीत असतात. काहींच्या तोंडांना मुखवटे असतात आणि ज्यांच्या नसतात त्यांच्याही चेहऱ्यांना साकेच्या कृपेने मुखवट्यांची कळा आलेली असते. साकेचा प्रभाव केवढा असतो याची पूर्वी मला कल्पना नव्हती. साकेशी माझा परिचय फारच माफक होता. तो कोमल होता. मोतिया हास्याच्या शोभेने आणि नाजुक हातांच्या स्पर्शाने तो सुंदर बनलेला होता. त्यात पानापेक्षा अनुपानालाच अधिक महत्त्व होते. एका उपाहारगृहातल्या छोट्याशा खोलीतलेच त्याचे वास्तव्य आणि एका मुलीच्या हातून पेला घेऊन पिणे व लगेच तो भरून तिला देणे – फार तर याची पुनरावृत्ती-करणे — एवढाच त्याचा उपचार मला माहीत होता. साकेचा असा धांगड-धिंगा मी पूर्वी पाहिलेला नव्हता. पण आता तो अगदी नजरेवर आदळतोच ! आणि साकेचा सर्वगामी प्रभाव अंतःकरणात शिरतो. साके तोंडात पडली तर

आत्मा चळतो आणि बाहेर पडली तर शरीर चळते! असाच एक अंतर्बाह्य चळलेला पुरुष साकेची एक भली थोरली बाटली गदेसारखी फिरवीत झपाझप पायऱ्या चढत प्राकारात शिरतो आणि गावच्या मानकऱ्यांच्या तोंडांना ती लावण्याचा प्रयत्न करतो. काही तोंडे फिरतात, काही तोंडे वासतात— आणि काही पलीकडची, नुसतेच प्रेक्षकाचे काम करणारी, किमोनोच्या बाहीआड लपून खुदखुदू लागतात.

इतक्यात एक स्त्रियांची मिरवणूक येते. धुळीच्या वादळानंतर गारगार वारा यावा तशी. ही मिरवणूक नृत्याची पावले टाकीत येते. निमग्न पावले टाकीत येते. विदूषकांच्या मेळ्याकडे दुर्लक्ष करते आणि पुढे सटकून नृत्याच्या पावलांनीच प्राकाराच्या पायऱ्या चढते. वर येते, मधोमध ठेवलेल्या ढोलाभोवती फिरते आणि ढोलासभोवती फेर धरून नाचू लागते. सरळ रेषेचे वर्तुळ बनते, चेहऱ्याकडे चेहरा वळतो, नेत्रांना नेत्र मिळतात, लयीत लय मिसळते — प्रत्येकीचे नृत्य एका विशाल नृत्याच्या वलयात विलीन होते. नृत्य साधेच असते. हात वर जातात, डोक्यावर जुळतात, खाली येतात. पुन्हा जुळतात — एकदा एका बाजूला, एकदा दुसऱ्या बाजूला, पुन्हा वर. प्रत्येक वेळी पावलांच्या आघाताला साथ करीत एखादे कमळ उमलावे, पाकळ्या पसरून विस्तारावे आणि पुन्हा मिटावे, तशा आकृती उमलतात, उघडतात, बदलतात, बदलते रंग धारण करतात. मध्येच एक स्त्री हळूच उडी मारते, जागा बदलते, तिच्या जागी दुसरी येते, एका किमोनोऐवजी दुसरा किमोनो येतो, रंग पालटतो आणि साऱ्या नृत्याचे रंगीन दर्शन बदलून टाकतो! पण या साऱ्यावर एक तंद्री असते. सात्त्विक तंद्री, श्रद्धाशीलतेची तंद्री, कर्तव्यपूर्तीची तंद्री. या तंद्रीतच पावले पडत असतात, हात जुळत असतात, आणि किमोनोचे रंग बदलत असतात.

पाहता पाहता स्त्रियांच्या नृत्यात पुरुष सामील होतात. मोगऱ्याच्या फुलांत झेंडूचे फूल शिरते. पण ती तंद्री अद्याप शिल्लक असते. इतक्यात साकेची जरा फाजील आराधना केलेला एक मानकरी नृत्यात सामील होतो नि ती तंद्री भंगते. नृत्यातल्या एकदोन स्त्रियांना हसू फुटते. त्या ते सावरतात, तरी पण त्यांच्या निमुळत्या डोळ्यांभोवतालच्या वळ्यांत रेंगाळताना ते दिसतेच. इतक्यात आणखी एक साकेभक्त नृत्यात शिरतो. त्याच्या साकेचा अंमल त्याच्या कपड्यांवर चढलेला असतो. त्याचा मानकरी झगा त्याच्या अंगावर उलटा, पुढून

चढलेला असतो. त्याचा शेव त्याच्या नाचत्या पावलाखाली येत असतो आणि त्याच्या नाचत्या पावलाशी घासाघीस करीत असतो. एकदोन स्त्रियांना हे अति वाटते. त्या हळूच बाहेर पडतात. पण अनेकांची तंद्री अद्याप अभंगच असते. त्यांची समाधी कायम असते. त्यांपैकी एक पाठुंगळीला मूल बांधूनच नाचत असते. एका साकेभक्ताला यामुळे एक कल्पना सुचते. तो कठड्याशी मूल घेऊन उभ्या असलेल्या एका स्त्रीकडे जातो. तिच्या हातचे मूल घेतो आणि त्याला घेऊन नृत्यात सामील होतो. पण पोटातली साके आणि हातातले मूल, एकदम सावरणे जरा कठीण असते. ती स्त्री हसण्याचा प्रयत्न करते, पण तिच्या चेहऱ्यावर काळजी दाटते. ती त्याच्याकडे जाते, त्याच्याकडे हास्याचा एक कटाक्ष टाकून त्याच्या हातून मूल अलगद काढून घेते.

इतक्यात मुलांची मिरवणूक येते. त्यांची कोवळी कोवळी तोंडे आता कोमेजलेली असतात. ती तो अष्टपाद अस्वल जेमतेम प्राकारापुढच्या पटांगणात आणतात आणि त्याला तेथे तसाच टाकून प्राकारात येतात. समारंभाचे चालक जणू या मुलांची वाट पाहात असतात. ती आल्याबरोबर पुढाऱ्यांची रांग उठून उभी राहते. झाडाचा टाळा एकाच्या हातात जातो. चवरी दुसऱ्याच्या हातात जाते. मिकोशी खांद्यावर चढते. कागदाचे कपटे तोंडात फिट्ट बसतात. टाळे-वाल्याचे तोंड शिव्या ओकू लागते — मिकोशीची मिरवणूक सुरू होते. प्राकारा-बाहेर जाते आणि थांबते. मिकोशी एका सुगी वृक्षाखाली उतरते. पुजारी आणि मानकरी मिकोशीभोवती फेर धरून बसतात आणि त्यांच्या तोंडून मंत्र, परवचा म्हणण्याच्या थाटात स्रवू लागतात. पण मुले, बायका, इतर पुरुष इकडे फारसे लक्ष देत नाहीत. बायकांचे नृत्य चालू असते. मुले तोंडात आइस्क्रीम भरीत असतात आणि उरलीसुरली साके रिकामी करण्याचा उद्योग पुरुषमंडळी इमाने-इतबारे पार पाडीत असतात.

* * *

मिकोशी पुन्हा प्राकारात येण्याची वाट पाहायला हवी. पण आम्हांला फुरसत नसते. आम्हांला आजच टोकिओला परतायचे असते. प्राकाराच्या मागे आकाशात काळेकुट्ट ढग गोळा होण्यास सुरुवात झालेली असते. मंदिरात परत जाण्यापूर्वीच वादळ चाखण्याचा मनसुबा किनोमियाने केलेला असेल. आम्ही प्राकारातून निघतो. कानात तो मंत्रांचा परवचा घुमत असतो. मनात वादळ

घोंघावत असते. डोळे गावातली दृश्ये पाहत असतात आणि जे पाहिले नाही त्याची कसर पासीन भरून काढीत असतो. तो सांगत असतो की आज यावातानोत कोणाचेही घर बंद नाही. कोणाचाही हात रिकामा नाही. कोणाच्याही घरात शिरावे, वाटेल तितकी मिठाई खावी आणि हवी तितकी साके झोकावी. खात फारसे कोणी नाही — पिणे मात्र अखंड! मग मारामाऱ्या काय, नू दंगे काय! क्वचित खूनसुद्धा! दुसऱ्या दिवशी गाव शुद्धीवर येतो तेव्हा आदल्या दिवसाचा जमाखर्च समजतो!

आम्ही बसस्टँडवर येतो तो पाऊस चांगला सुरू झालेला असतो. झाडाच्या फांद्यांतून वादळ घोंघावत असते. या वादळातून मोटार हाकायची कशी याची काळजी पासीनच्या चेहऱ्यावर पसरलेली असते. पण काही असले तरी प्रथम चहा पाहिजे, म्हणून एका रेस्टोरॉंमध्ये शिरतो. तेथील लोकांच्या चेहऱ्यावर चिंता रेखोट्या ओढीत बसलेली दिसते! काय झाले तरी काय? पासीन चौकशी करतो, तेव्हा समजते की यावातानोचे दोन तरुण कोळी काल मच्छीमारीसाठी गेले होते ते वादळात सापडले आणि बुडून मेले!

मला त्या 'गो'च्या अड्ड्यावरचे तरुण आठवतात — आणि तो रस्त्याकाठी अगतिकपणे पडलेला शर्यतीचा स्तंभ नजरेपुढे येतो!

"कमॉन्—आय् इल शो यू ए फेमस स्पॉट."

—यावातानोला जाताना रस्त्याकाठच्या एका रेस्टोरॉमध्ये आम्ही चहा पीत बसलो होतो तेव्हा पासीन म्हणाला.

मी लगेच उठलो. जे जे पासीन दाखवील ते ते मला पाह्यचेच होते. जपानची रम्य सौंदर्यस्थळे, कलासुंदर घरे, आतिथ्यशील माणसे, जे जे पाह्यला मिळेल ते ते मी पाहण्यास उत्सुक होतो.

आमचे रेस्टोरॉ समुद्रकाठच्या एका टेकडीच्या टोकावर होते. त्याच्या पिछाडीस एक छोटीशी बाग होती. त्या बागेत नेऊन पासीन म्हणाला, "पाहा."

समोरचे दृश्य खरोखरीच विलक्षण होते. एक कभिन्न कराळ कडा—उभाच्या उभा! त्याचे काळेकुट्ट खडकाळ अंग दुपारच्या तिरप्या उन्हात तकाकत होते. त्याच्या कपारींची अणकुचीदार टोके मगरीच्या दाढांसारखी इतक्या दुरूनसुद्धा डोळ्यांना खुपत होती. समुद्रापासून सुमारे तीसचाळीस फुटांवर तो कडा एकदम उचलला होता आणि त्याच्या खाली बेडकाच्या तोंडाच्या आकाराची एक अभद्र घळ निर्माण झाली होती. घळीच्या तळाचा काळा कुळकुळीत कातळ बाहेर येऊन पसरला होता आणि त्याच्यावर दहावीस शिळा – अफाट आकाराच्या – अस्ताव्यस्त पसरल्या होत्या. त्यातली एक – विशेष आक्रस्ताळी – आपल्या खडबडीत अंगाच्या कडा, फरशीच्या पात्यांप्रमाणे, परजून जो येईल त्याला सरळ चिरण्यासाठी सज्ज होती. मला एकदम ती जपानी लोककथा आठवली. सृष्टीच्या प्रारंभी वादळदेव सुसानोवो संतापला आणि त्याने जगावर विनाशाचा वर्षाव केला — त्या वेळी त्याने फेकलेल्या दरडीतलीच ही एक अस्सल आजतागायत हजर होती! मी तिकडे थोडे निश्चल नजरेने पाहण्याचा प्रयत्न केला. समुद्राच्या सुसाट लाटा या शिळांवर फुटत होत्या आणि त्यांचे फेसाळलेले श्रमिष्ट पाणी त्या घळीत, एखादी चवताळलेली नागीण खबदाडीत घुसावी तसे घुसत होते. माझे डोळे फिरताहेतसे वाटले.

मी एकदम नजर फिरविली आणि जरा बाजूला गेलो. मात्र दृष्टी त्या खडकाकडेच वळली. पण आमच्या टेकडीवरचे एक चिडाचे झाड आता मध्ये आले. समुद्रावरच्या पिसाट वाऱ्याने त्याचा वक्र विस्तार चांगलाच झोडपला

होता. त्याच्या फांद्या पिळवटल्या होत्या आणि सळ्यांचे झुपके विस्कटले होते. त्या झाडाला जखिणीचे रूप आले होते. त्या झाडाच्या विपरीत विस्तारातून ती शिळा फारच भयंकर दिसली.

पासीन म्हणाला, "हे ठिकाण आत्महत्येसाठी प्रसिद्ध आहे. समोरच्या कड्यावरून शरीर झोकून दिलं की चूक म्हणून व्हायची नाही. प्रथम ते त्या उचललेल्या भागावर अलगद आदळेल आणि मग त्या शिळेवर अचूक फेकलं जाईल – मग त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडायला किती वेळ!"

त्या नुसत्या कल्पनेने माझे डोके सुन्न झाले. पण पासीन या ठिकाणाला चांगला सरावलेला असावा. शेजारी एक जपानी गृहस्थ उभा होता त्याच्याशी तो मोकळ्या आवाजात बोलू लागला.

जरा वेळाने मला म्हणाला, "हा जपानी गृहस्थ सांगत होता — गतवर्षी एका मातबर घराण्यातील मुलीनं आपल्याला आपल्या एटा प्रियकराशी लग्न करता येत नाही म्हणून येथून उडी घेतली आणि घेतली म्हणजे कशी? प्रियकराला मिठी मारून आपल्या मोटरीत बसली आणि मोटर भरवेगानं सोडली ती कड्यावरून थेट खाली –"

माझ्या डोळ्यांसमोर कड्यावरून कोसळणारी मोटर आली नि ते भोवळले, पण पासीन निर्विकार आवाजात बोलतच होता—"एटा म्हणजे अस्पृश्य– तुमच्या हिंदुस्थानात अस्पृश्य आहेत तसे."

पण माझे तिकडे लक्ष नव्हते. पाय यांत्रिकपणे पासीनच्या मोटरीकडे वळले आणि यांत्रिकपणेच मोटरीत जाऊन बसलो. डोळ्यांसमोर चित्रविचित्र दृश्ये उमटत, नाहीशी होत. ती भयंकर दरड – तिला फेसाळ विळखा घालणारी लाट – मोटर तिच्यावर आदळते – भयंकर आवाज होतो – कानांत शिरतो – इंद्रिये बधिर होतात – सुरू होतात – त्यांच्यावरचा ताबा उडतो – कानांवर शब्दांचा आघात होतो...

पासीन आणि योशिए जपानमधील आत्महत्यांची चर्चा करीत असतात.

जपानमधले आत्महत्यांचे प्रमाण उभ्या जगात अधिक आहे. एका तेरा वर्षांच्या मुलाने डोकेदुखी असह्य झाली म्हणून उंदराचे विष खाल्ले – प्रचलित सरकारबद्दल घृणा असह्य झाली – एका जोडप्याची अखेरची इच्छा : 'आमचा

विवाहविधी व दहनविधी एकदमच उरका'—एका प्रेताच्या खिशात चिठी : 'मृत्यू किती मधुर आहे!'

ती शिळा—त्या अमिट लाटा—ती चक्काचूर झालेली मोटर—मृत्यू मधुर... विवाहमंत्र-!

याताानोला गेलो, तेथल्या जत्रेच्या वातावरणात शिरलो नि शुद्धीवर आलो!

* * *

परत येताना अतामीच्या एका हॉटेलमध्ये आम्ही चहासाठी थांबलो. दीडदोन दिवसांच्या जत्रेच्या धबडग्याने आमचे शरीर आणि मन आंबून निघाले होते. पासीन मोटर हाकता हाकता अगदी दमून गेला होता. चहा पिण्यासाठी आम्ही खाली टेकलो ते टेकलोच. पासीनने तर ततामीवर लोळणच घेतली. अखेरीस थोडी विश्रांती घ्यावी, रात्रीचे भोजन उरकावे आणि निघावे असे ठरले. जपान-मध्ये सारे काही छान आहे, पण रस्ते भयंकर आहेत. म्हणून लोक आगगाडी पसंत करतात. पण टाइमटेबलाच्या पाशातून सुटण्यासाठी आम्ही मोटरने निघालो होतो. जपानच्या चिखलभरल्या खड्डेखाचींच्या रस्त्याने मोटर हाकणे दिवसाही कठीण. रात्री तर मृत्यूशी हस्तांदोलन करूनच निघावे. पण पासीनला आज रात्री टोकियोला पोचायलाच हवे होते.

तास दीड तासाच्या विश्रांतीने पासीनच्या नसा जरा मोकळ्या झाल्या. हिंमत जागी झाली. शिवाय जपानी रस्त्यांच्या चिखलात मोटर थोडी घसरली म्हणजे त्याच्या अंगावर गोड शिरशिरी उठे!—त्याने ॲक्सिलरेटरवर पाय टाकला.

आम्ही निघालो. पण जेवणाची सुस्ती पाश पसरू लागली. स्टेशनसमोरच्या कॉफीगृहात थोडी कॉफी ढोसावी असे ठरले. कॉफीगृहात शिरलो. चांगली तेजदार कॉफी मागविली. ती आणून देणाऱ्या मुलीने आपले मोतिया हास्य केले आणि पासीनच्या कंटाळलेल्या चेहऱ्यावर एक खेळकर छटा उमटली. पासीन त्या मुलीशी जपानीत हास्यविनोद करू लागला. योशिएही त्यात सामील झाली. मला मात्र त्या मुलीच्या बदामी डोळ्यांभोवतालचे हसरे जाळे निरखण्यापलीकडे काहीच करता येण्यासारखे नव्हते. यात किती वेळ गेला समजलेच नाही. एकदम माझे घड्याळाकडे लक्ष गेले. मी चमकलो नि म्हणालो, "चला, उशीर झाला!"

पासीन म्हणाला, "चला" – पण त्यात जोम नव्हता. त्याने आणखी एकेक कप कॉफी मागविली. मुलीने कॉफी आणली आणि पुन्हा ती गोड हसली. पण आता बोलत न बसता लगेच निघून गेली. पासीनच्या चेहऱ्यावर एकदम थकवा पसरलेला दिसला. कॉफीचा एकेक घोट तो घेत होता, पण तोंडावाटे शब्द निघत नव्हता. अखेर कॉफीचा कप अर्धभरला टाकून तो उठला—

पण उठला तसाच बसला. म्हणाला, "नाही बुवा, आपली ताकद नाही. पार दमलोय् मी. आपण हॉटेलात परत जाऊ या. रात्रभर विश्रांती घेऊ नि सकाळी जाऊ."

"होय, पण तुझ्या कामाचं काय?"

"जळू दे ते! दहा यार्ड गाडी हाकण्याची तयारी नाही माझी."

माझे काय, मला बरेच वाटले. जपानी हॉटेलातल्या मऊ गाद्या-गिरद्यांवर लोळत घोळत पापण्यांवर स्वप्नांची फुलपाखरे नाचविण्याच्या कल्पनेने मी खूश होऊन गेलो. योशिएही खूश दिसली.

* * *

दुसऱ्या दिवशी सकाळी आठनऊ वाजता आम्ही निघालो. आमची मोटर मैल दीड मैल आली, तोच तिच्या इंजिनातून कसलासा चमत्कारिक आवाज येऊ लागला.

"काय झालं बुवा या मोटरीला? असा आवाज कधी आला नव्हता." पासीन म्हणाला.

एक दोन मैल आम्ही तसेच आलो. मोटरचा तो आवाज हळूहळू वाढत होता, आणि मग एकदम गपकन् थांबला —कारण मोटरच थांबली. इंजिन बंद पडले होते.

सुदैवाने जवळच एक मोटरचे रिपेअर-शॉप होते. वर्कशॉपच्या मॅनेजरने आमची मोटर ओढून आणवली. लगेच त्याने इंजिनचे झाकण उघडले. डोळे इंजिनवरून फिरविले. इंजिनचे एकदोन भाग काढले, त्यांची चांगली तपासणी केली. इंजिनात चारपाचदा टाकटूक केली – आणि शेवटी म्हटले,

"चांगला तास दीड तास लागेल दुरुस्त व्हायला."

आमचे सर्वांचेच चेहरे पडले. आम्हांला टोकिओला जायची घाई होती. शिवाय पोटात कावळे ओरडू लागले होते. ओडावाऱ्याला न्याहारी करायचा बेत होता. आमच्या चेहऱ्यावरची भूक पाहून की काय मॅनेजर म्हणाला,

" येथून जवळच डोंगरात एक रेस्टोरॉ आहे. आमची मोटर तुम्हांला तेथं पोचवील. तास दीड तासात चहावी पिऊन या – तोपर्यंत तुमची गाडी दुरुस्त करून ठेवतो."

आणि आम्ही त्या रेस्टोरॉंकडे निघालो.

दहा-पाच मिनिटांतच आमचा रस्ता डोंगरावर चढला आणि पासीनची मोटर बिघडली तेच बरे झाले असे वाटू लागले. जपानचा सारा मुलूखच मस्त आहे; पण इतक्या रमणीय भागातून मी पूर्वी कधी गेलो नव्हतो. रस्ता नागमोडी वळणं घेत घेत डोंगराची एकेक उंची काबीज करीत आहे; सुगीचे जंगल, निसर्गाची मिजास आणि मानवाची व्यवस्था यांच्या मिलाफाचे मुक्त नमुने दाखवीत आहे; या जंगलाच्या अवकाशातून कधी स्वच्छंद समुद्राचे तर कधी समृद्ध खोऱ्याचे दर्शन होत आहे – आणि जपानच्या निसर्गाचा सारा रंगदारपणा अंतःकरणाचे कोपरेन् कोपरे खुलवून टाकीत आहे.

इतक्यात एक छोटेसे शिंटो मंदिर दिसले आणि त्याच्या आवारात कसला तरी विधी चालला आहे हे ध्यानात आले. यावातानोला दिसले होते तसे भटजी आणि एकदोन प्रतिष्ठित नागरिक तोंडाने (परवचा म्हटल्याप्रमाणे) काही तरी म्हणत आहेत, आणि हाताने कसले तरी धान्य इतस्ततः उडवीत आहेत असे दिसले. मी नीट ऐकू लागलो – " ओनी वा सोटो फुकुवा उची " हा मंत्र ते पुनःपुन्हा म्हणत आहेत असे लक्षात आले. मी योशिएला विचारले –

" हा कसला मंत्र ? "

" याचा अर्थ ' पिशाच्चांनो, हट जाव; देवतांनो, आत या ' असा आहे. हाताने भात व घेवड्याचे दाणे उडवताना म्हणण्याचा तो मंत्र आहे. "

" पण हे सारं कशासाठी चाललं आहे ? "

" पिशाच्चांना घालविण्याचा विधी आहे तो. वास्तविक तो वर्षातून एकदाच करतात. पण ह्या भागात भुताखेतांचा फार धुमाकूळ चालतो, तेव्हा हा विधी इकडे वारंवार होतो. एखादा भूतबाधेचा विशेष प्रकार झाला तर मुद्दाम करतात."

जपानसारख्या सुधारलेल्या देशातले लोक अशा भोळया समजुतीच्या आधीन असावेत याचे मला नवल वाटले. पण फार नाही. पुष्कळदा हा भूमीचा आणि वातावरणाचा गुण असतो. आमचे मोटमोठे सुशिक्षित कोकणात गेले की त्यांचे असेच होते हे मला माहीत होते.

रेस्टोरॉंचे दर्शन झाल्याबरोबर दृष्टी निवली. जपानी चीड (मात्सु) आणि मोरपंख (सुगी) यांच्या डवरलेल्या राईच्या मधोमध, जपानी वास्तुशिल्पाचे सौंदर्य उधळीत उभी असलेली एक डगडगीत इमारत. जपानी कलेची चोखंदळ नजर तिच्यावर सर्वत्र पसरलेली होती. इमारतीच्या तकतकीत लाकूडसामानाची रेघान् रेघ व्यक्त होत होती, आणि रंध्याचा स्पर्श न झालेल्या खांबात आणि तुळयांत निसर्गाची स्वाभाविक लय व्यक्त होत होती. खोल्यांच्या सरकत्या भिंती-वरील रम्म्याच्या तावदानात किडीने पोखरलेल्या फळींचा स्थलचित्र निर्माण करण्यासाठी उपयोग केलेला पाहिला, तेव्हा तर जपानी कलावंतांच्या निसर्ग-साधनेचा साक्षात्कारच झाल्यासारखा वाटला!

मी विचार करू लागलो – निसर्गाच्या प्रत्येक लोकविलक्षण घटनेत भुतेखेते, पिशाच्चे शोधणाऱ्या जपान्यांच्या भोळया वृत्तीत आणि या कलात्मक निसर्ग-साधनेत काही नजिकचे नाते असेल का?

रेस्टोरॉंच्या मुलींनी न्याहरी आणली आणि पासीन त्यांच्याशी 'अनोने' 'आसोदेस्का' करीत बसला. योशिएही त्यात भाग घेत होती. त्या जपानी संभाषणात सामील होणे मला शक्यच नव्हते, तेव्हा त्या मुली हसल्या म्हणजे हसायचे – आणि त्यांच्या मासोळीसारख्या डोळयांतल्या लकाकीचा कवडसा निरखायचा – एवढेच मला जमण्यासारखे होते. पण बाहेर निसर्ग मस्त पसरला होता, आणि त्याच्याकडे टक लावून बघताना त्या मेळाव्यात असून नसल्यासारखे होण्याची उत्कृष्ट सोय होती.

समुद्रकाटच्या एका टेकडीवरील धारेवर हे रेस्टोरॉं होते. तेथून टेकडी एकदम खाली उतरली होती आणि तिच्या पायथ्याशी धडकणाऱ्या समुद्राचा लयदार आवाज रेस्टोरॉंमध्ये ऐकू येत होता. चीड आणि मोरपंख यांच्या शाखांचा शिवशिवता विस्तार येथून दिसत होता. आपल्या डौलदार शाखांवर नक्षीदार पानांचा मोहर घेऊन सरळ ताठ उभे असलले मोरपंख आणि त्यातच मधून-मधून पसरलेले, वक्र वळणाचे, पिळवटलेल्या फांद्यांचे आणि गोंडेदार विस्ताराचे

चीड पाहून महाकाव्य आणि विडंबनगीत यांचे हे मोठे मजेदार मीलनच झाले आहे असे मला वाटले, आणि एकदम एक लख्याळ विचार मनात आला की, मथुरेच्या शिल्पसंग्रहातील बुद्धाच्या मूर्ती आणि एप्स्टाईन – हेन्री मूर – लिप्चिझ यांच्या शिल्पकृती यांचे संयुक्त प्रदर्शन भरविले तर ते कसे दिसेल ?

एकदम वाटले, या मात्सु सुर्गांच्या बनात हिंडलेच पाहिजे. योशिए – पासीनला ( विशेषतः पासीनला ) रेस्टोरॉमधल्या मुलींच्या कलदार हास्याचे आणि काचेरी आवाजातल्या संभाषणाचेच अधिक आकर्षण दिसले. मी एकटाच बाहेर पडलो. खरोखर ते भटकणे म्हणजे सारी इंद्रिये मोहरून टाकणेच होते. त्या बनातल्या कोवळ्या लुसलुशीत गवताचा पोपटी रंग आणि मधूनमधून त्याच्यावर पडलेल्या चिडाच्या तांबूस करड्या सळ्यांचा थर – पिसांच्या पथारीवरून चालता चालता एकदम सरक – खेळात सामील झाल्यासारखे वाटे. या खेळाच्या नादात मी टेकडीच्या टोकाला केव्हा गेलो ते ध्यानातच आले नाही. तेथून पाहिले तो तो परवा पाहिलेला तो भयंकर कडा समोर उभा ! तो येथून इतका जवळ, अगदी पलीकडेच असेल असे वाटले नव्हते. त्या कड्याच्या अणकुचीदार कपारी, त्याच्या पायथ्याच्या त्या भयंकर शिळा आणि त्याच्या भोवताली फेफरे आल्यागत फेसाळणाऱ्या समुद्राच्या लाटा – सारे काही स्वच्छ दिसत होते. मला ती आत्महत्येची हकीगत आठवली. – मी परत फिरलो.

* * *

तासभराने आम्ही वर्कशॉपकडे परतलो, तेव्हा मॅनेजर अद्याप भकास चेहऱ्याने आणि त्रस्त नजरेने मोटरच्या इंजिनकडे पाहातच होता. आमची चाहूल लागल्यावर त्याने आमच्याकडे फक्त एक धुकट कटाक्ष टाकला. पासीनने विचारले तेव्हा थकलेल्या स्वरात तो एवढेच म्हणाला, "आश्चर्य आहे. काही पत्ता लागत नाही. बिघाड तर काही दिसत नाही."

कपाळावर हात मारून घ्यायचा तेवढेच आमचे शिल्लक राहिले. मोटरीची प्रकृती ताळ्यावर येईपर्यंत येथे नुसते हायहुश्श करीत राहण्याची कल्पना असह्य होती.

पण आशेचा एक किरण फिरकला. मॅनेजर म्हणाला, "माझा मेकॅनिक आला म्हणजे तो काही करतो का पाहू. आज अद्याप तो का आला नाही कळत नाही."

तो एवढे म्हणतो आहे तोच तो मेकॅनिक आला. त्याच्या डोळ्यांत जाग्रण आणि चेहऱ्यावर कसली तरी त्रस्त उत्सुकता. आल्याबरोबर तो म्हणाला,

" काल रात्री देवळापलीकडच्या पुलावर मी एक भूत पाहिलं. "

" काय भूत ! " मॅनेजर ओरडलाच ! अर्थात मला ते काही कळले नव्हते. पण पासीनच्या खुलाशानंतर समजले की काल रात्री त्याने भूत पाहिले होते.

सविस्तर माहिती सांगताना मेकॅनिक म्हणाला, " रात्री एक दीडच्या सुमार असेल. मी त्या पुलावरून चाललो होतो. तो समोरून एक स्त्री आणि एक पुरुष एकमेकांना अगदी बिलगून येत असलेले दिसले. प्रथम त्यांच्या आकृत्या सफेत धुकट दिसल्या. क्षणार्धात त्या स्वच्छ झाल्या. स्त्रीच्या अंगावर एक झोकदार रंगीन किमोनो होता. मी निरखून पाहिलं. किमोनोवर रक्ताचे डाग—आणि तिच्या हातात मोटरचं चाक ! क्षणभर काही दिसेनासे झालं. आणि नंतर पाहतो तो आकृत्या पुन्हा धुकट ! क्षणार्धात त्या बाजूच्या जंगलात शिरल्या – आणि पाहता पाहता नाहीशा झाल्या. "

जरा वेळाने एक शुष्क हास्य करून तो म्हणाला, " दुर्दैव माझं – त्या वेळी मजपाशी कॅमेरा नव्हता, नाही तर फोटो घेतला असता त्यांचा. "

जपान्यांचे फोटोचे वेड मला माहीत होते. चिनी माणसाच्या डोळ्यांना चष्मा लावला नि खांद्याला कॅमेरा अडकविला की जपानी माणूस तयार होतो, ही व्याख्या मी ऐकलेली होती. पण भुताचा फोटो घेण्याइतकी या वेडाने मजल मारली असेल याची मला कल्पना नव्हती !

काही वेळ तो त्या भुताबद्दलच बोलत होता. जरा वेळाने मॅनेजरने त्याला आमची मोटर पाहायला सांगितलं. त्याने लगेच बाह्या सरकविल्या आणि ओव्हर-ऑल चढवून, इंजिनात डोके खुपसले. बराच वेळ त्याचे टाकटूक सुरू होते. इंजिनाचे बरेचसे अवयव बाहेर आले, आत गेले. पण काही बोध होतो असे त्याचा चेहरा सांगेना. अखेरीस म्हणाला,

" काही कळत नाही बुवा ! भुताने झपाटलं बिपाटलं की काय ? "

मॅनेजरचे एकदम डोळे लकाकले. म्हणाला, " असेल ! असेल ! "

" तसे असेल तर ही टाकटूक काय कामाची ? " मेकॅनिक म्हणाला.

# साहित्यिक येती घरा



टोकिओला भरलेली आंतरराष्ट्रीय ‘ पेन परिषद ’ ही एक अलौकिक राष्ट्रीय पर्वणी वाटली – साहित्यिकांना आणि बिगरसाहित्यिकांनाही ! साहजिक आहे. जपानमध्ये लेखक हा राजा आहे. त्याला विशेष मान आहे. खास भाव आहे. उच्च प्रतिष्ठा आहे. समाजातली एक उपटसुंभ अडगळ अशी त्याची संभावना होत नाही. त्याच्या लिखाणाची ‘ लेखणीचे चाळे ’ अशी वासलात लागत नाही. “ तुम्ही

लगेच त्याने ओव्हर-ऑल उतरला. पलीकडे पाटाचे पाणी वाहात होते तेथे गेला, हातपाय धुतले, चेहरा धुतला, चुळा भरून टाकल्या आणि पलीकडच्या छोट्याशा देवळाकडे चालू लागला. तेथल्या डोणीतल्या पाण्याने पुन्हा हातपाय धुतले. शेजारच्या एका झुडपाचा टाहळा तोडून घेतला. देवळासमोर गेला. तोंडाने काही तरी बडबडत टाहळा अतिजोराने हवेत फिरवला. मग त्याने गुडघे टेकले. टाहळ्यासकट हात जोडले आणि डोळे मिटून प्रार्थनेस सुरुवात केली.

पंधरावीस मिनिटे त्याची प्रार्थना सुरू होती. आम्ही इकडे चूपचाप उभे होतो.

प्रार्थना आटोपून तो आला, तेव्हा त्याचा चेहरा विलक्षण शांत दिसला. डोळ्यांतले जाग्रण पार उडाले होते; चेहऱ्यावरची व्याकुळता नष्ट झाली होती; नजरेत निश्चिंती होती. मला वाटले, ते भूत आता शांत झाले असो वा नसो, आमची मोटर हा आता अधिक हुशारीने पाहू शकेल.

परत आल्याबरोबर त्याने ओव्हर-ऑल चढविला आणि इंजिनात डोके खुपसले.

पंधरावीस मिनिटांत इंजिनात एक ठिणगी चमकली, त्याबरोबर त्याने डोके बाहेर काढले. म्हणाला –

" झाली दुरुस्त ! दहा मिनिटांत सुरू करतो. "

लिहिताबिहिता हे ठीक आहे, पण तुम्ही पोटासाठी काय करता ?" असे कोणी त्याला विचारीत नाही. लेखक हा हिरो असतो – 'चाया'तील गेशापासून लिफ्ट चालविणाऱ्या मुलीपर्यंत सर्वांचा. असंख्य वाचक त्याला राष्ट्राची दौलत मानतात. वर्तमानपत्रांची पृष्ठे त्याच्या छायाचित्रांनी रंगून जातात. सुंदर नटीच्या चेहऱ्या-इतकाच सुंदर शैलीकाराचा चेहरा जपानी वाचकाला प्रिय असतो. नटनटींच्या दर्शनासारखीच त्याच्या दर्शनासाठी झुंबड उडते. त्याच्या चरित्राच्या तपशिलात अनेक जीव मश्गूल असतात. त्याच्या जीवनाला रहस्यकथेचे गूढ प्राप्त होते. त्याच्या कृपापत्राला प्रेमपत्राचे आकर्षण चढते आणि त्याच्या शब्दांना सुंदर कटाक्षांची किमया प्राप्त होते. जपानमध्ये लेखणीला अद्याप मोल आहे. जगात इतरत्र लेखकाला कस्पटाप्रमाणे किंवा कारागिराप्रमाणे गणले जात असताना जपानात त्याचे भक्तिभावाने पूजन होत असते. तेव्हा 'पेन परिषद' ही जपानात एक राष्ट्रीय पर्वणी ठरायचीच !

पण पर्वणी म्हणजे कशी ? या परिषदेच्या निमित्ताने स्पेंडर–आंगस विल्सन–ॲलेक वॉव–स्टाईन्बेक–जॉर्ज मिकेश–आंद्रे शाम्सॉ–हेल्मूथ ग्लासेनॉफ्–ॲन्तोनी स्लोमिन्स्की यांच्यासारखे जगप्रसिद्ध लेखक टोकिओला जमा झाले, तेव्हा लोकांची माथीच भरकटली. या शब्दसृष्टीच्या मानकऱ्यांना कोठे ठेवू नि कोठे नाही, कोठे नेऊ नि कोठे नाही, कोठे उडवू नि कोठे नाही असे त्यांना झाले. आकाशवाण्या–प्रकाशवाण्यांच्या वेळापत्रकांचा तोल गेला आणि वृत्तपत्रांचे रकाने बेहोष झाले. शेकड्यांनी खास कार्यक्रम झडले. शेकड्यांनी खास अंक रस्त्यावर आले. शेकड्यांनी मुलाखती रंगल्या – आणि हजारांनी त्या पाहिल्या, ऐकल्या, वाचल्या ! स्वागतसमारंभाचे सोहळे असंख्य झाले. मंत्र्यांनी मेजवान्या दिल्या. वकिलातीत पार्ट्या उडाल्या. व्यापाऱ्यांनी भेटी उधळल्या. उद्यानात उपाहार उफाळले. 'चायां'त सामीसेनचे स्वर झंकारले. रंगमंदिरात गेशांच्या नृत्यांची पावले रुण-झुणली. नाट्यगृहात काबुकीची नांदी वाजली आणि नोहची भरतवाक्ये घुमली. या कार्यक्रमांना डोळे दिपले, कान रमले, अंतःकरणे उचंबळून आली. जपानच्या पेन–केन्द्राने तर कमाल केली. आपले प्रत्येक देवालय म्हणजे सौंदर्यदेवतेचे निवासस्थान, प्रत्येक राजवाडा म्हणजे इतिहासाचा वैभवशाली वारसा, प्रत्येक उद्यान म्हणजे सौंदर्याची आरास आणि प्रत्येक विधी म्हणजे संस्कृतीचे लावण्यलेणे हे दरेक प्रतिनिधीस पटवून देण्याचा त्याने चंगच बांधला. साहित्यसंमेलनाचे

रूपांतर त्याने सांस्कृतिक यात्रेत केले. परिषदेच्या प्रतिनिधींना जपानी संस्कृतीचे अमृत मोठ्या निष्ठेने पाजले. त्यासाठी त्यांना मोठ्या समारंभाने देवस्थानांत नेले, तेथे लावण्यसुंदर गेशांकडून त्यांचे स्वागत करविले, राजवाड्यात हिंडविले, इतिहासप्रसिद्ध उद्यानांतून फेरफटका करवून आणले, चहापान–चंद्रदर्शनासारख्या सांस्कृतिक कार्यक्रमांत रमविले, आणि प्रत्येक प्रतिनिधीच्या अंतःकरणात जपान-विषयीचे प्रेम आणि आकर्षण यांची कायमची प्रस्थापना केली.

जपान पेन-क्लबच्या या सांस्कृतिक दृष्टीत आधुनिक टापटीपही होती. तिच्या जोरावरच क्लबने हे सारे कार्यक्रम मोठ्या कौशल्याने पार पाडले आणि परिषदेच्या मुख्य कार्याशी त्यांची मोठी बेमालूम सांगड घालून दिली. ज्या सांके कायकानमध्ये ही परिषद भरली होती, तिच्या प्रथमदर्शनानेच जपान-क्लबच्या या वैशिष्ट्याची ओळख पटली. सांके कायकान हा कलात्मकता आणि आधुनिकता यांच्या सर्जनशील संगमाचा एक नमुनाच आहे. किंबहुना ही इमारत म्हणजे आधुनिक वास्तुशिल्पाने निर्मिलेली एक मयसभा आहे. ही इमारत म्हणजे काच आणि पोलाद यांचे परस्परविरोधी गुण एकमेकांत वितळवून निर्मिलेली एक जादूमय कृतीच. तिचे पोलाद काचेसारखे कलदार आहे, तर काच पोलादाचा आभास निर्माण करणारी आहे—आणि या दोघांच्या युतीने लोकांची दृष्टी आणि बुद्धी गुंगवून टाकणारे एक आश्चर्य निर्माण झालेले आहे. आपल्या प्रतिनिधींची बुद्धी आणि दृष्टी अशी गुंगवून टाकण्याचा पेन-क्लबचा इरादा होता का नकळे, पण एका पोलिश प्रतिनिधीला तसेच वाटले असेल. पहिल्या दिवशीच तो आला, एका दरवाजातून तडक आत निघाला – आणि पोकळीचा भास निर्माण करणाऱ्या काचेच्या तावदानावर टचकन् आपटला, आणि अर्थात आत जाण्याऐवजी सरळ हॉस्पिटलमध्ये गेला. अशी ही मयसभा – नवलाईची मयसभा, कल्पकतेची मयसभा, शिल्पसौंदर्याची मयसभा! या मयसभेत सांस्कृतिक विलासाचे वातावरण नुसते दरवळलेले होते. त्याचा आस्वाद घेण्यासाठी त्याच्या अंतरंगात डोकावून पाहण्याची गरज नव्हती. लिफ्टमधून वर जाताना बाहेर नुसती ओझरती नजर टाकली, तरी ती सहज एखाद्या शिल्पकृतीवर, नाही तर चित्रकृतीवर, नाहीतर एखाद्या पुस्तकाच्या रांगेवर पडे. सांके कायकानच्या व्हरांड्यातसुद्धा कला आणि संस्कृती यांची चिन्हे विखुरलेली होती.

अशा या मयसभेत जपान पेन-क्लबने मोठे अभिजात साहित्यसंमेलन भरविले. पण 'अभिजात' साहित्यसंमेलन म्हणजे काय? त्याची लक्षणे कोणती?

लिहिताबिहिता हे ठीक आहे, पण तुम्ही पोटासाठी काय करता ?" असे कोणी त्याला विचारीत नाही. लेखक हा हिरो असतो – 'चाया'तील गेशापासून लिफ्ट चालविणाऱ्या मुलीपर्यंत सर्वांचा. असंख्य वाचक त्याला राष्ट्राची दौलत मानतात. वर्तमानपत्रांची पृष्ठे त्याच्या छायाचित्रांनी रंगून जातात. सुंदर नटीच्या चेहऱ्या-इतकाच सुंदर शैलीकाराचा चेहरा जपानी वाचकाला प्रिय असतो. नटनटींच्या दर्शनासारखीच त्याच्या दर्शनासाठी झुंबड उडते. त्याच्या चरित्राच्या तपशिलात अनेक जीव मश्गूल असतात. त्याच्या जीवनाला रहस्यकथेचे गूढ प्राप्त होते. त्याच्या कृपापत्राला प्रेमपत्राचे आकर्षण चढते आणि त्याच्या शब्दांना सुंदर कटाक्षांची किमया प्राप्त होते. जपानमध्ये लेखणीला अद्याप मोल आहे. जगात इतरत्र लेखकाला कसपटाप्रमाणे किंवा बारगिराप्रमाणे गणले जात असताना जपानात त्याचे भक्तिभावाने पूजन होत असते. तेव्हा 'पेन परिषद' ही जपानात एक राष्ट्रीय पर्वणी ठरायचीच !

पण पर्वणी म्हणजे कशी ? या परिषदेच्या निमित्ताने स्पेंडर–आंगस विल्सन–ॲलेक वॉव–स्टाईन्बेक–जॉर्ज मिकेश–आंद्रे शाम्सॉ–हेल्मूथ ग्लासेनॉफ्–ॲन्तोनी स्लोमिन्स्की यांच्यासारखे जगप्रसिद्ध लेखक टोकिओला जमा झाले, तेव्हा लोकांची माथीच भरकटली. या शब्दसृष्टीच्या मानकऱ्यांना कोठे ठेवू नि कोठे नाही, कोठे नेऊ नि कोठे नाही, कोठे उडवू नि कोठे नाही असे त्यांना झाले. आकाशवाण्या–प्रकाशवाण्यांच्या वेळापत्रकांचा तोल गेला आणि वृत्तपत्रांचे रकाने बेहोष झाले. शेकड्यांनी खास कार्यक्रम झडले. शेकड्यांनी खास अंक रस्त्यावर आले. शेकड्यांनी मुलाखती रंगल्या – आणि हजारोंनी त्या पाहिल्या, ऐकल्या, वाचल्या स्वागतसमारंभाचे सोहळे असंख्य झाले. मंत्र्यांनी मेजवान्या दिल्या. वकिलातीत पार्ट्या उडाल्या. व्यापाऱ्यांनी भेटी उधळल्या. उद्यानात उपाहार उफाळले. 'चायां'त सामीसेनचे स्वर झंकारले. रंगमंदिरात गेशांच्या नृत्यांची पावले रुण-झुणली. नाट्यगृहात काबुकीची नांदी वाजली आणि नोहची भरतवाक्यं घुमली. या कार्यक्रमांनी डोळे दिपले, कान रमले, अंतःकरणे उचंबळून आली. जपानच्या पेन–केन्द्राने तर कमाल केली. आपले प्रत्येक देवालय म्हणजे सौंदर्यदेवतेचे निवासस्थान, प्रत्येक राजवाडा म्हणजे इतिहासाचा वैभवशाली वारसा, प्रत्येक उद्यान म्हणजे सौंदर्याची आरास आणि प्रत्येक विधी म्हणजे संस्कृतीचे लावण्यलेणे हे दरेक प्रतिनिधीस पटवून देण्याचा त्याने चंगच बांधला. साहित्यसंमेलनाचे

रूपांतर त्याने सांस्कृतिक यात्रेत केले. परिषदेच्या प्रतिनिधींना जपानी संस्कृतीचे अमृत मोठ्या निष्ठेने पाजले. त्यासाठी त्यांना मोठ्या समारंभाने देवस्थानांत नेले, तेथे लावण्यसुंदर गेशांकडून त्यांचे स्वागत करविले, राजवाड्यात हिंडविले, इतिहासप्रसिद्ध उद्यानांतून फेरफटका करवून आणले, चहापान–चंद्रदर्शनासारख्या सांस्कृतिक कार्यक्रमांत रमविले, आणि प्रत्येक प्रतिनिधीच्या अंतःकरणात जपान-विषयीचे प्रेम आणि आकर्षण यांची कायमची प्रस्थापना केली.

जपान पेन-क्लबच्या या सांस्कृतिक दृष्टीत आधुनिक टापटीपही होती. तिच्या जोरावरच क्लबने हे सारे कार्यक्रम मोठ्या कौशल्याने पार पाडले आणि परिषदेच्या मुख्य कार्याशी त्यांची मोठी बेमालूम सांगड घालून दिली. ज्या सांके कायकानमध्ये ही परिषद भरली होती, तिच्या प्रथमदर्शनानेच जपान-क्लबच्या या वैशिष्ट्याची ओळख पटली. सांके कायकान हा कलात्मकता आणि आधुनिकता यांच्या सर्जनशील संगमाचा एक नमुनाच आहे. किंबहुना ही इमारत म्हणजे आधुनिक वास्तुशिल्पाने निर्मिलेली एक मयसभा आहे. ही इमारत म्हणजे काच आणि पोलाद यांचे परस्परविरोधी गुण एकमेकांत वितळवून निर्मिलेली एक जादूमय कृतीच. तिचे पोलाद काचेसारखे कलदार आहे, तर काच पोलादाचा आभास निर्माण करणारी आहे—आणि या दोघांच्या युतीने लोकांची दृष्टी आणि बुद्धी गुंगवून टाकणारे एक आश्चर्य निर्माण झालेले आहे. आपल्या प्रतिनिधींची बुद्धी आणि दृष्टी अशी गुंगवून टाकण्याचा पेन-क्लबचा इरादा होता का नकळे, पण एका पोलिश प्रतिनिधीला तसेच वाटले असेल. पहिल्या दिवशीच तो आला, एका दरवाजातून तडक आत निघाला – आणि पोकळीचा भास निर्माण करणाऱ्या काचेच्या तावदानावर टचकन् आपटला, आणि अर्थात आत जाण्याऐवजी सरळ हॉस्पिटलमध्ये गेला. अशी ही मयसभा – नवलाईची मयसभा, कल्पकतेची मयसभा, शिल्पसौंदर्याची मयसभा! या मयसभेत सांस्कृतिक विलासाचे वातावरण नुसते दरवळलेले होते. त्याचा आस्वाद घेण्यासाठी त्याच्या अंतरंगात डोकावून पाहण्याची गरज नव्हती. लिफ्टमधून वर जाताना बाहेर नुसती ओझरती नजर टाकली, तरी ती सहज एखाद्या शिल्पकृतीवर, नाही तर चित्रकृतीवर, नाहीतर एखाद्या पुस्तकाच्या रांगेवर पडे. सांके कायकानच्या व्हरांड्यातसुद्धा कला आणि संस्कृती यांची चिन्हे विखुरलेली होती.

अशा या मयसभेत जपान पेन-क्लबने मोठे अभिजात साहित्यसंमेलन भरविले. पण 'अभिजात' साहित्यसंमेलन म्हणजे काय? त्याची लक्षणे कोणती?

महाराष्ट्रीयांच्या ती परिचयाची आहेत. स्वागताध्यक्षाच्या भाषणाची अध्यक्षीय भाषणावर कुरघोडी ( जी अध्यक्षाच्या गंभीर प्रकरणावर आगाऊ उताऱ्यासारखी टरावी ), खडाजंगी वादविवाद, बाहेरगावच्या पाहुण्यांची ( स्वतःच्या भाषणाचा भाग तेवढा वगळून ) संमेलनात सर्रास गैरहजेरी, संमेलनाच्या मंडपाची अगर सभागृहाची अब्रू वाचविण्याचा स्थानिक श्रोत्यांनी घेतलेला पत्कर, आणि दीर्घकाल लक्षात राहील असे एखादे भाषण अगर घटना, हे साहित्यसंमेलनाच्या अभिजात-पणाचे काही विशेष.

कावाबाटांच्या स्वागताध्यक्षीय भाषणाने अभिजातपणाचा पहिला विशेष लगेच प्रत्ययास आणून दिला. वास्तविक कावाबाटा म्हणजे केवढे थोर साहित्यिक. कादंबरीकारांचे कादंबरीकार अशी त्यांची ख्याती. पण स्वागताध्यक्षीय पद त्यांना बाधले हेच खरे. नाहीतर त्या वेळी जपानात गर्जत असलेले तुफान हे जगातल्या या थोर थोर साहित्यिकांच्या स्वागतास आले आहे, अगर हे तुफान म्हणजे जपानच्या प्रकृतीचे प्रतीक आहे, अशी विधाने त्यांनी कशी केली असती ? तीच गोष्ट वादाची. पेन-क्लब म्हणजे जगातल्या अतिशय शिष्ट, संभावित, सोज्वळ साहित्यिकांची संस्था. यांचे संमेलन म्हणजे परस्परपरिचय, परस्परचौकशी, आणि गंभीर प्रश्नांची जांभया देत केलेली चर्चा--अशा संमेलनास वादाची बाधा होण्याचे काहीतरी कारण ? पण संमेलनाचे अभिजात स्वरूप सिद्ध करण्यासाठी तो बाधला आणि अगदी अभिजात पद्धतीने बाधला. म्हणजे तो प्रथम पडद्याआड वाजला, मग त्याचे शैलीदार आवाज बाहेर आले आणि नंतर त्याचे तितकेच शैलीदार पडसादही उमटले. सारे कसे असल्या वादांच्या नियमांना धरून झाले. म्हणजे परिषदेच्या मुख्य विषयाला त्याचा फारसा स्पर्शच झाला नाही. एकदा एका कोरिअन प्रतिनिधीने जपानच्या इतिहासकालीन साम्राज्यवादावर हल्ला केला. ( आणि हेही अगदी प्रथेस धरून झाले – साहित्यसंमेलनात एखाद्या पाहुण्याने यजमानाच्या तोंडावर थुंकलेच पाहिजे. ) खरा वाद माजला तो अवांतर मुद्द्यावर. कारण साहित्यसंमेलनाला साहित्यिक येतात ते साहित्याची नाडी तपासण्यासाठी थोडेच येतात ? ते येतात ते संस्थेच्या असाहित्यिक कारभारातल्या एखाद्या प्रकरणाची शेंडी पकडण्यासाठी. येथे असेच झाले. १९५६च्या हंगेरिअन क्रांतीचे बौद्धिक नेतृत्व केलेले एकदोन साहित्यिक हजर होते. हंगेरीत पेन सेंटरची चाललेली विटंबना

वेशीवर टांगण्याच्या जिद्दीनेच ते आले होते. पण परिषदेत काही कम्युनिस्ट राष्ट्रांचेही प्रतिनिधी होते; आणि जपान पेन क्लबमध्ये ‘ पुरोगामी ’ लेखकांचा बराच भरणा असल्याने त्यांना अगदी घरचा आधार होता. तेव्हा या वादात शीतयुद्धाची दारू अगदी ठासून भरली गेली; आणि तरी स्फोट झालाच नाही. कारण असले स्फोट संभावित साहित्यिकांच्या प्रतिष्ठेला मानवणारे नसतात. पडद्याआड एकमेकांच्या कपड्यांची हवी तितकी व तशी ओढाताण झाली तरी पडद्याबाहेर व्यासपीठावर पोशाख आवरून-सावरूनच बसावे लागते. अर्थात ही ‘ पुरोगामी ’ लेखकांची परिषद असती तर वस्त्रे अगदी भर चवाठ्यावर टरकावली गेली असती. पण ही पडली नुसत्याच शिष्ट लेखकांची परिषद, तेव्हा स्फोट झालाच नाही. तडजोड झाली.

जगाच्या कानाकोपऱ्यातून साहित्यिक पेन-परिषदेसाठी आले. पण परिषद हे नुसते निमित्त होते. ते खरे आले होते ते जपानच्या आतिथ्याचा आणि सौंदर्याचा आस्वाद घेण्यासाठी. त्यांना गिंझातल्या नशापाण्याची चव घ्यायची होती, आसाकुसातल्या उत्तान प्रकरणांचा अनुभव घ्यायचा होता, उष्ण झऱ्याच्या न्हाणीघरात शरीर मोकळे करायचे होते, कार्युकाईत ( फुलांच्या जगात ) फुलपाखरांसारखे उडायचे होते, ‘ चाया ’( चहाघरा )तील चिजांची चव चाखायची होती, ‘ माचीआई ’त ( थोरल्या ‘ चायात ’ ) मजा मारायची होती, निचिगेकीत नग्नतेचे संभावित नमुने पाह्यचे होते, कॉफीगृहातील कुमारिकांशी कुजबूज करायची होती, स्ट्रिप्टीजमधल्या वस्त्रहरणाच्या विलासांनी डोळे विस्फारायचे होते, आणि एकंदरीत ‘ जिवाचा जपान ’ करायचा होता. ज्यांच्या प्रकृतीला हे मानवणारे नव्हते त्यांना कॅमेरे, दुर्बिणी, बाहुल्या, फुलदाण्या, वगैरेंची खरेदी करायची होती, आणि आपल्यापाशी अगदीच धाडस नाही असा आरोप येऊ नये म्हणून पाचिंकोच्या यंत्रावर नशिबाच्या गोट्या उडवायच्या होत्या. आणि अर्थात या साऱ्यावर सभ्यतेचे मुलायम आवरण घालण्यासाठी काबुकीझा, ताकाराझुका, कोकुसाय कायकान् इत्यादींना भेट द्यायची होती, नाहीतर सुमो कुस्त्यांच्या आखाड्यात एक रिकामी खेप घालायची होती. इतके सगळे साधायचे तर परिषदेत वेळ फुकट घालवून कसे चालेल ? तेव्हा परिषदेचे काम सुरू झाले, की ते शहाजोगपणे बाहेर सटकत आणि शहराच्या काही अव्वल भागात मनमुराद हिंडत.

साहजिकच परिषदेच्या मंडपाची इभ्रत सांभाळण्याचे काम स्थानिक मंडळीकडे आले आणि ते त्यांनी सारी शक्ती व बुद्धी वेचून पार पडले. परिषदेचे काम इंग्रजी-फ्रेंच भाषांत चाले. पण या भाषांचे अज्ञान स्थानिक श्रोत्यांची श्रद्धा ढळविण्यास समर्थ ठरले नाही. ते सुरुवातीपासून शेवटपर्यंत सभागृहात निश्चल बसून राहात, आणि संपल्याबरोबर सापडेल त्या साहित्यिकाची सही मिळविण्यासाठी वही पुढे करीत. मात्र त्यांची साहित्यिकांवरची भक्ती भक्कम असल्यामुळे त्यांनी या सही घेण्याच्या विधीची कधी विटंबना केली नाही. म्हणजे प्रभाकर पाध्याला ' अहो ढवळे ' असे संबोधून सही मागितली नाही, किंवा प्रभाकर पाध्याच्याच हातातल्या वर्तमानपत्राचा कोपरा फाडून त्याच्यावर सही करा म्हणून त्याला विनंती केली नाही. या जपानी श्रोत्यांना परिषद संपल्यावरसुद्धा उसंत नव्हती. गिंझाच्या आसपास भटकत असलेल्या साहित्यिकांना पकडून त्यांच्या सह्या त्यांना घ्यावयाच्या असत. ' झेड् ' अॅव्हेन्यूवरच्या एका बाहुल्यांच्या दुकानातल्या एका मुलीने माझ्या कोटावरचा पेनचा बिल्ला पाहून सहीसाठी वही पुढे केली – ती या श्रोत्यांपैकीच एक !

परिषदेचा अविस्मरणीय अनुभव जॉन स्टाईन्बेक यांनी आणून दिला. सुरुवातीच्या उद्घाटनाच्या अधिवेशनात त्यांनी साहित्य-संमेलनाच्या इतिहासातले सर्वांत छोटे भाषण केले आणि सांगितले की, आपण या परिषदेला आलो आहोत ते बोलण्यासाठी नाही तर ऐकण्यासाठी. दुर्दैवाने तेही त्यांना साधले नाही, कारण त्याच दिवशी त्यांना ' एशियन फ्लू 'ने गाठले आणि पुढले आठ दिवस त्यांना इम्पीरिअल हॉटेलच्या खोलीत तळमळत काढावे लागले. पण त्यांचा हॉटेलच्या खोलीत अडकलेला मुक्कामही परिषदेला जाणवला. म्हणजे अभावाने नव्हे, तर तापाच्या आवेगात त्यांना सुचलेल्या सुभाषितांनी. एक दिवस जॉन डॉस पॅसॉस उठले आणि त्यांनी स्टाईन्बेकची ही सुभाषिते वाचून दाखविली. त्यांतली दोन माझ्या अद्याप लक्षात राहिलेली ही : Hospitality is the most charming form of torture, आणि Silence never produces misinformation.

' आतिथ्य म्हणजे अति-आकर्षक अत्याचार ' हे स्टाईन्बेकचे सुभाषित ऐकून जपान-पेनच्या यजमानांना काय वाटले नकळे. पण काहीही वाटले असले तरी त्यांना या आततायीकारक कर्मातून मुक्त होणे शक्यच नव्हते. आतिथ्य हा

जपान्यांचा दुसरा स्वभाव आहे; आणि जपान-पेनच्या कार्यकर्त्यांनी तर त्याचे एक शास्त्रच बनविले होते. या शास्त्राच्या सपाट्यावर सापडल्यानंतर प्रतिनिधींच्या इच्छांचा, गरजांचा आणि मागण्यांचा विचार करण्यापलीकडे दुसरा कसला विचारच त्यांना अशक्य झाला. त्यांची विचारशक्ती प्रतिनिधींच्या साऱ्या संभाव्य अडचणींशी विनिमय करीत राहिली. प्रत्येक बारीकसारीक गोष्टीचा, किचकट कटकटीचा, आयत्या वेळीं उद्भवणाऱ्या अडचणींचा, आगाऊ विचार करूनच जपान-पेनचे स्वयंसेवक ठिकठिकाणी उपस्थित होते. त्यांचा चेहराच सांगे की, काही काळजी करू नका, आम्ही हजर आहोत. विमानतळावर उतरून घ्यायला आल्याशिवाय तुमच्या अंतःकरणातली धाकधूक कमी होत नाही? ठीक आहे, जपान-पेनची लांबरुंद फीत बाहीला लावून आमचा स्वयंसेवक विमानतळावर हजर आहे. कस्टम्सच्या भानगडी तुम्हाला जमत नाहीत?—डोण्ट वरी, कस्टम्सच्या अधिकाऱ्यांचे सहकार्य आम्ही अगोदरच मिळविलेले आहे. सामानाच्या बॅगवर एखादे फर्मास लेबल चिकटविल्याशिवाय तुम्हाला प्रवासाचे सार्थक झाल्यासारखे वाटत नाही?—बट् डोन्च्यू रिमेंबर, आमच्या क्लबच्या शिक्क्याचे एक लाल लेबल आम्ही तुमच्याकडे अगोदरच रवाना केले होते? ते चिकटविण्यास तुम्ही विसरला हा, साहेब, आमचा दोष नाही. हॉटेलमध्ये तुमचे आगमन राक्षसवेळीं होणार आहे म्हणून काळजी वाटते तुम्हांला?—पण घाबरण्याचे काही कारण नाही, आम्ही हॉटेलला पक्क्या सूचना देऊन ठेवलेल्या आहेत, तुम्ही कौंटरवरच्या कारकुनाला तुमचे फक्त नाव सांगा. परिषद हे नुसते निमित्त, जपान पाहणे ही तुमची अंतरीची इच्छा ना?—वा राव, हे काय आम्हांला ठाऊक नाही? अहो, आम्ही ते नीट ओळखून आहोत. जेवढे म्हणून शहाजोग करता येईल तेवढे सारे आम्ही केलेले आहे. काय म्हणता, प्रतिनिधींच्या परिचय-पत्रिकेत तुमची माहिती नाही?—हे कसे काय झाले बुवा! तुम्ही वेळेवर पाठविली होती काय? पण हरकत नाही. तुमची माहिती आम्हांला द्या, आम्ही ती सायक्लोस्टाईल करून लगेच सर्वांना वाटण्याची व्यवस्था करू. अच्छा, म्हणजे तुमचा त्या व्यक्तीबरोबर फोटो यायला हवाय्? —व्हाय् डोन्च्यू टेल अवर फोटोग्राफर? तुम्हांला अनेक बैठकींना हजर राहणे जमणार नाही?—ठीक आहे, प्रत्येक दिवसाच्या चर्चेचा सारांश दुसऱ्या दिवशी सकाळी तुमच्या कप्प्यात आढळेल!...कोणतीही अडचण असो, तिचे शक्य तितके निरसन

करण्याचा प्रयत्न जपान-पेनच्या लोकांनी – चेहऱ्यावरचे निरंतर हास्य किंचित देखील ढळू न देता – केला!

हे सारे त्यांना जमले कसे? मला तरी याचे उत्तर एकच दिसते — तपशिलाकडे लक्ष पुरविण्याची सवय. ही सवय नसली तर अंतराळात भराऱ्या मारणाऱ्या कल्पना सुचतील, पण पृथ्वीवरची व्यवस्था काही नीट राहणार नाही. उदाहरणानेच बोलायचे तर रंगूनला एअर-कंडिशन्ड विमानतळ बांधता येईल, पण तेथल्या संडासात टॉयलेट-पेपर असेलच अशी खात्री बाळगता येणार नाही. जपान-पेनच्या तपशीलविषयक जाणिवेची जाणीव मला जपानला जाण्यापूर्वी दिल्लीलाच आली. एक दिवस पेनकडून एक जोडपाकिट आले; आणि त्यातून बॅगांना लावण्याची लेबले निघाली. प्रत्येक लेबलावर पेन–कॉंग्रेसचा शिक्का होता, आणि माझ्या नावाच्या ‘ पी ’ या आद्याक्षराचा ठळक छाप होता. आम्हांला जपानात गेल्यावर एक कार्यक्रमांची पुस्तिका मिळाली. प्रत्येक कार्यक्रमाचे एकेक पान त्या पुस्तिकेत होते, आणि प्रत्येक पानाचा एक तुकडा कापून घेण्याची व्यवस्था होती. तुम्हाला कार्यक्रमाला जायचे असेल तर तुम्ही त्या कार्यक्रमाच्या पानाचा तुकडा सही करून कचेरीतल्या एका पेटीत टाकायचा, म्हणजे त्या कार्यक्रमाला नेणारी बस ठराविक वेळी तुमच्या हॉटेलसमोर उभी राहील. अखेरचे दोन दिवस परिषदेचे स्थलांतर टोकिओहून कियोटोला झाले. निघण्याच्या आदल्या दिवशी आमच्याकडे एक पत्र आणि एक लेबल आले. पत्रात कोणता प्रतिनिधी कियोटोच्या कोणत्या हॉटेलमध्ये उतरणार याची माहिती होती, आणि सोबतचे लेबल तुमच्या बॅगला लावून तेथेच ठेवा, ती तुम्हाला किओटोला तुमच्या खोलीत आढळेल अशी सूचना होती. माझी व्यवस्था मियाको हॉटेलमध्ये होती, तर काहींची कियोटो हॉटेलमध्ये होती. पाचशे प्रतिनिधींच्या गर्दीत हा मियाकोचा आणि हा कियोटोचा हे कळणार कसे, अशी शंका गाडी कियोटो स्टेशनात शिरताना माझ्या मनात आली. पण जपान-पेनच्या लोकांनी या गोष्टीचा विचार अगोदरच करून ठेवलेला होता. त्यांचे स्वयंसेवक हातात ‘ मियाको ’, ‘ कियोटो ’ असे फलक धरून उभे होते आणि प्रतिनिधी आपापल्या फलकाभोवती गोळा झाले. एका गोष्टीचा विचार करण्यासच पेनचे कार्यकर्ते विसरले. आम्हांला एकेका खोलीत दोघादोघांनी राह्यचे होते, आणि आमच्या जोड्या निवडण्याची संधी आम्हांला न देता पेन-क्लबच्या लोकांनी निवडल्यामुळे

माझ्या एका दोस्ताला त्याच्या सहकाऱ्याच्या घोरण्यामुळे अखंड जागरण करण्याची पाळी आली. दुसऱ्या दिवशी त्याने झोपण्याच्या फंदात न पडता सारी रात्र कियोटोच्या काही वेचक वस्तीत भटकण्यात घालविली! या एवढ्या उणिवेमुळे जपान-पेनच्या इतर व्यवस्थेचा परकेपणाच माझ्या मनावर ठसला. अर्थात जागरणाची पाळी माझ्यावर आली असती तर तो तसा ठसला असता काय शंका आहे. पण सारी व्यवस्था जपान-पेनच्या लोकांनी इतकी हसत, खेळत, फुलत केली की, ही पोलादी व्यवस्था आणि ही फुलोरी वृत्ती यांचा संयोग घडला तरी कसा याचे अद्याप मला नवल वाटत आहे.

कसा का घडेना, त्याचे सुखद संस्कार माझ्या मनावर कायम आहेत, आणि पेन-परिषदेची जेव्हा जेव्हा मला आठवण होते, तेव्हा तेव्हा परिषदेच्या कार्य-क्रमांपेक्षा ही व्यवस्थाच मला अधिक आठवते—आणि मग मला जपानमधला दुसरा एक अनुभव आठवतो. मी जपान सोडले तोच दिवस. माझे विमान रात्री निघायचे होते. संध्याकाळी ४।। वाजता माझ्या चष्म्याच्या काडीचा स्क्रू हरवला. तो रविवारचा दिवस होता. सारी दुकाने बंद होती. अखेर शोधता शोधता एका गल्लीतले एक कोपऱ्यातले दुकान अर्ध-उघडे सापडले. आम्ही दुकानदाराला आमची अडचण सांगितली. पण दुर्दैवाने त्याच्याकडे इतका छोटा स्क्रू नव्हता. मी अगदी निराश झालो—इतक्यात तो म्हणाला, थांबा, काही जमते का पाहतो. असे म्हणून त्याने एक तार घेतली आणि कानशीने घासून आमच्या डोळ्यांदेखत एक स्क्रू बनविला. मला वाटले, आता हा भरपूर पैसे उकळील. पण त्याने आकार केला बरोबर चार आणे—तयार स्क्रूला नेहमी जितका पडला असता तेवढा!

—असे हे हाडीमासी खिळलेले गुण!





# भेट

आज आम्हाला नुसती भटकेगिरी करायची आहे, कोणत्या भागात जाऊ बोला—मी मियाको हॉटेलच्या कौंटरवर विचारले.

—-मग तुम्ही सिंक्योगोकू मार्केटात जा.

—काय आहे त्या मार्केटात असं ?

—तुम्ही जा म्हणजे समजेल. किओटोचं ते एक आश्चर्य आहे.

वात्स्यायन नि मी निघालो. सिंक्योगोकूच्या प्रवेशद्वारातच ध्यानात आले की, आपण एका झकपक बाजारात शिरत आहोत. तेथल्या दुकानांचा भपकाच तसा होता. पण थोडेसे हिंडल्याबरोबर समजले की, भपका हा काही या मार्केटचा विशेष नव्हे. हे मार्केट म्हणजे एक स्वतंत्र जग आहे आणि या जगावर जपान्यांच्या आगतस्वागताच्या आणि कलात्मकतेच्या छटा नाचत आहेत. यातली बरीचशी दुकाने म्हणजे छोटी छोटी प्रदर्शनेच होती. या दुकानांतली एकेक फुलदाणी म्हणजे जपानी कुंभकलेचा नमुना वाटे, आणि एकेक बाहुली म्हणजे हस्तकलेची साक्षात प्रतिमा भासे. येथे काय नव्हते ? कापडापासून क्यामेऱ्यापर्यंत आणि खेळण्यापासून खाद्यपदार्थांपर्यंत हवी ती वस्तू – दुकानातील मुलींच्या हास्याने उजळून मिळण्याची सोय येथे होती. या दुकानातून त्या दुकानात असे भटकायला लावण्याची एक अमूर्त जादूच त्या मार्केटात होती. आणि असे भटकून पाय थकले, तर बीअरच्या पेल्याने ताजेतवाने होण्याची सोय करण्यास जपानी चतुराई विसरली नव्हती. तुम्हाला बीअर पसंत नसेल तर पाचिंको खेळा आणि पाचिंकोच्या जुगारात फसवणूक होत आहेसे वाटले, तर नेमबाजीच्या जुगारात नशीब फळफळते का पाहा. पण असल्या कोणत्याच भानगडीत न पडता त्या मार्केटात नुसते भटकले तरी पुरे होते. त्या मार्केटातला साधा फेरफटका हा एक अनुभव होता आणि मी व वात्स्यायन या अनुभवातच मश्गुल होतो. पाय चालू लागले की चालायचे, आणि पाय दमले की नजर दुकानातल्या प्रसाधनांवर फिरवीत उभे राहायचे, असा आमचा खाक्या होता—

इतक्यात पलीकडच्या नाक्यावरील दृश्याकडे माझे लक्ष गेले आणि नजर चकित झाली.

चकित व्हावी असेच ते दृश्य होते. दोन स्त्रिया. तरुण. सुंदर. त्यांतली विशेष तरुण ती आमच्याकडे धृष्ट नजरेने पाहात आहे आणि तिच्याहून थोडीशी वडील असलेली दुसरी तिला खेचून नेत आहे. अशा भरबाजारात एक स्त्री दुसरीला खेचीत आहे, एवढेच दृश्य चकित करायला पुरेसे आहे. पण त्यातल्या एका स्त्रीची दृष्टी आमच्यावर खिळली आहे आणि दुसरी स्त्री तिला ओढून

नेत आहे —कोणाचीही वृत्ती अगदी अंतरंगापासून ढवळून निघायला मग अवकाश किती ? पण त्याही परिस्थितीत त्या दोन तरुण स्त्रियांकडे, विशेषतः या ओढाताणीच्या पवित्र्यातल्या स्त्रियांकडे, पाहात राहण्याइतकी माझी नजर निर्ढावलेली नव्हती. ती एकदम गोंधळली, आणि शेजारच्या दुकानातल्या बाहुल्यांकडे वळली. वळली पण लगेच मागे फिरली आणि त्या दृश्याकडे धावली. पण आता ते दृश्य होतेच कुठे ? ते केव्हाच अंतर्धान पावले होते. आता ती आमच्याकडे धृष्ट नजरेने पाहणारी तरुणीही नव्हती आणि तिला भरबाजारात खेचणारी तिची मैत्रीणही नव्हती. त्या विघ्नसंतोषी बाईने तिच्या (की आमच्या ?) त्या निरुपद्रवी समाधानात बिब्बा घातला होता !

क्षणभर वाटले, आपल्याला भरबाजारात उभ्या उभ्या एखादे स्वप्न तर पडले नाही ? स्वप्न या भरकेबाज बाजाराला अगदी शोभेसे होते, पण क्षणात ते विरले. डोळ्यावर ते स्वप्न तरळत आहे आणि आत हुरहूर, तगमग किंवा असेच काहीतरी होत आहे—आणि तरीही काही घडलेच नाही अशा आविर्भावात वात्स्यायनाशी गप्पा मारण्याचा मी प्रयत्न करीत आहे- -

इतक्यात आमच्यासमोर त्या दोन स्त्रिया उभ्या ! आणि त्यांतली ती तरुण, सुंदर, आमच्याकडे धृष्ट दृष्टीने पाहणारी – डाव्या हातात मखमली मिजाशीची मनिबॅग आणि उजव्या हातात रंगीबेरंगी ऐटबाज वेष्टनात गुंडाळलेली कसलीशी वस्तू धरून आमच्याकडे – माझ्याकडे – पाहत आहे. तिची दृष्टी संकोचलेली आहे, चेहरा गोंधळलेला आहे, पण त्याच्यावर एक प्रकारची अधुरी उत्सुकता आहे आणि म्हणूनच तो कमालीचा आकर्षक दिसत आहे.

हे काय चालले आहे तरी काय ? अजून ते स्वप्नच सुरू आहे की काय ? पण स्वप्न कसे असेल ? ती तर अगदी खरी दिसत आहे. तिच्या ओठांवर काहीतरी उन्मुक शब्द अडखळत आहे. माझे एकदम वात्स्यायनाकडे लक्ष गेले आणि त्याच्या चेहऱ्यावर कसलीशी अलिप्तताच भासली, याचेही मला आश्चर्य वाटले. तोच तिच्या तोंडून शब्द फुटला – एक अर्धाच, आणि लगेच माझ्या ध्यानात आले की, हिला इंग्रजी नीटसे येत नाही. आता काय करायचे ? पण जे तोंडून व्यक्त होत नव्हते ते हातातून व्यक्त होत होते – होते आहेसे वाटत होते. तिच्या हातातली वस्तू बोलकी बनत होती—

एकदम माझ्या डोक्यात प्रकाश पडला – ही ती हातातील वस्तू आपल्याला देण्याचा प्रयत्न तर करीत नसेल? पण का? – अन् का नकळे, क्षणात वाटले, ही आपल्याला ती भेट देत असेल. आणि मी एकदम म्हटले – तिच्या इंग्रजीच्या ज्ञानाची पुसटशी जाणीवही न होता म्हटले – Is this a present? (आपण ही भेट देत आहात का?) माझ्या तोंडून 'प्रेझेंट' हा शब्द बाहेर पडला मात्र, तिचे डोळे लकाकले आणि ओटांशी अडलेले इंग्रजी फटकन् बाहेर पडले. "Yes – Yes – Present – Kyoto doll" (होय होय, भेट – आमच्या किओटोची बाहुली!)

तिच्या डोळ्यांतल्या मासोळीची उडी, तिच्या कलदार बोलण्याचा बिलोरी आवाज आणि तिच्या हातातल्या वस्तूची रंगीन झळाळी – या साऱ्यांचे मिश्रण माझ्या मनात सळसळले आणि मी पार गोंधळून गेलो. कसले काही आकलनच होईना. हा भरबाजार, त्यात मी कुठचा कोण, ही जपानी बाई मला पाहते, लगेच एक वस्तू विकत घेते आणि ती मला देण्यासाठी माझ्यासमोर येऊन उभी राहते — कशास काही पत्ता! काही संगती? काही अन्वयार्थ? एकदम मी तिच्याकडे पाहिले. तिच्या नजरेवर नजर रोखून पाहिले आणि मला तिच्या तरळत्या नजरेत विलक्षण कळकळ दिसली. लगेच मी ती वस्तू घेण्यासाठी हात पुढे केला. एकदम तिचा चेहरा हास्याने फुलला. आनंदाने उजळला!

त्या वस्तूचा स्पर्श किती गोड लागला! जणू मुलखाचे माधुर्य त्यात ओतलेले होते. माझ्या साऱ्या वृत्ती भरभरून आल्या. मला काय बोलावे, काय करावे हेच सुचेना. सुदैवाने मी क्षणात ताळ्यावर आलो आणि खिशातल्या डायरीत तिचा नावपत्ता लिहून घेण्याचे मला सुचले.

* * *

भेट आली की परतभेट गेलीच पाहिजे ही जपानी पद्धत मला माहीत होती. सुदैवाने मजपाशी एक सुबकशी हस्तिदंती हत्तींची जोडी होती. दुसऱ्या दिवशी हॉटेलच्या पोऱ्याबरोबर ती तिच्याकडे पाठवून दिली. आपली ही परतभेट योग्य आहे की अयोग्य आहे, तिच्या भेटीच्या मानाने ती क्षुल्लक ठरेल की भारी ठरेल, भारी ठरली तर तिला आपल्या डोक्यावर हे भलतेच ऋण लादले गेले असे नाही का वाटणार, वगैरे कसल्याही गोष्टीचा विचार मी केला नाही. कसा करणार? जपानी भेटीचे शास्त्र मला माहीतच नव्हते. परतभेटीने भेट देणाऱ्या

व्यक्तीला अडचणीत पडल्यासारखे वाटता कामा नये, तिचा अपमान झाल्यासारखे वाटता कामा नये, वगैरे मला काही ठाऊक नव्हते. आपल्याकडची सर्वोत्कृष्ट वस्तू तिला द्यायची, आणि तिच्या भेटीत ज्या उदार, आतिथ्यशील, संस्कारित अंतःकरणाचे दर्शन झाले त्याचा होईल तितका सन्मान करायचा एवढीच माझी बुद्धी होती. माझ्याजवळच्या वस्तूत ही हत्तींची जोडी सर्वोत्कृष्ट होती, म्हणून ती मी पाठविली. अशी वस्तू आपल्यापाशी निघाली याचाच मला आनंद झाला, आणि त्या आनंदाच्या भरात मी ती जोडी पाठवून दिल्याचेही विसरून गेलो.

पण दुसऱ्या दिवशी सकाळीच माझ्या खोलीतला टेलिफोन वाजला. फोनवर स्त्रीचा आवाज. माझ्या स्मृतीने एकदम गिरकी खाल्ली! हा तिचाच आवाज. पण त्या आवाजातून माझ्या नावाच्या आद्याक्षरापलीकडे कसला बोध झाला नाही. टेलिफोनवर संभाषण करण्याइतके – आपल्या तुटपुंज्या इंग्रजीला चेहऱ्यावरच्या, नजरेतल्या भावांची जोड दिल्याशिवाय आपल्या मनातला आशय व्यक्त करण्याइतके – त्या भाषेचे ज्ञान तिजपाशी नव्हते. तो फोन वाजला तसाच तुटला – फक्त तुटताना अडखळला!

जरा वेळाने फोन पुन्हा वाजला. आता हॉटेलच्या कौंटरवरचा कारकून बोलत होता, " मिस कियो साकुराय् आपल्या भेटीबद्दल आपले आभार मानीत आहेत आणि आपण टोकिओला परत केव्हा जाणार, म्हणून विचारीत आहेत. " मी केव्हा जाणार, कोणत्या गाडीने जाणार वगैरे सांगितले. मिनिटभरात टेलिफोन पुन्हा वाजला. तो कारकून सांगत होता – " मिस् साकुराय् आपल्याला निरोप द्यायला स्टेशनवर येतील. "

याच कारकुनाने आमच्यापाशी सिंक्योगोकू मार्केटची शिफारस केली होती. त्याच मार्केटमध्ये साकुराय् मला भेटली – नुसती एकदाच भेटली असे नव्हे आता ती मला पुन्हा भेटणार – स्टेशनवर मला निरोप द्यायला येणार! खरेच सिंक्योगोकू मार्केट हे एक आश्चर्य आहे. कारकून म्हणाला ते अगदी बरोबर. माझ्या आयुष्यातला एक आश्चर्यकारक अनुभव मला याच मार्केटात आला.

पण मी टोकिओला जाणार हे हिला कसे समजले? अच्छा! म्हणजे मी पेन-परिषदेसाठी आलेला प्रतिनिधी एवढे तिला ठाऊक आहे, आणि पेन-परिषदेच्या प्रतिनिधींची हालचाल तिला पक्की माहीत आहे. साहित्यिकांबद्दल प्रेम आणि

आदर यांनी भारावून गेलेल्या असंख्य जपानी मुलामुलींपैकीच ती एक आहे. परवा सिंक्योगोकूमध्ये तिने आम्हाला पाहिले आणि या भावनांची कदर करण्यासाठीच तिने ती बाहुली मला भेट दिली. तिच्या मैत्रिणीला तिचा हा सारा भाबडेपणा वाटला असावा आणि म्हणून ती तिला परावृत्त करीत असावी.

काही का असेना, साहित्यिकांबद्दलचा आदर व्यक्त करण्यासाठी तिने मला निवडले होते; आणि मला निरोप देण्यासाठी ती मुद्दाम किओटो स्टेशनवर येणार होती. मला फार फार बरे वाटले. धन्य वाटले. स्टेशनवर मी तिची अधीरतेने वाट पाहू लागलो. पण गाडीला आठदहा मिनिटे उरली तरी तिचा पत्ता नाही. आत निराशा दाटली. अस्वस्थता संचरली. आता गाडी सुटायला फक्त चारपाच मिनिटे आहेत. आता कसली येते ती? माझी अधीर अस्वस्थ नजर फलाटाच्या टोकापर्यंत फिरून आली. आता कसली येते? तरीपण नजर स्टेशनवर फिरत होतीच. पुरता निराश होऊन मी माझ्या जागेवर येऊन बसणार, इतक्यात ती दिसली. धावत धावत येत होती. धांदलीने येत होती. तेवढ्यातल्या तेवढ्यात ती धांदल मला मजेदार वाटली. इतक्यात ती आली. हसली आणि नजर माझ्या नजरेवर रोखून तिने आणखी एक वस्तू माझ्यापुढे धरली. मी थक्क झालो, मला काही कळेनाच. ही आणखी भेट कशाला? तसे मी तिला म्हटले. पण माझे म्हणणे तिला कळलेच नाही. ती आपली आग्रह करीत आणि ती वस्तू माझ्या हातात कोंबण्याचा प्रयत्न करीत राहिली.

अखेर मी ती घेतली, कृतज्ञ हातात धरली आणि कृतज्ञ नजरेने तिच्याकडे पाहत राहिलो. बोलणे शक्यच नव्हते. मन मात्र आदर, आपुलकी, कृतज्ञता यांनी भरून गेले. त्यातच विषादाची एक छटा उमटली. ही किओटोची कुठली कोण – मुद्दाम मला भेट देते, मला निरोप द्यायला येते; आणि येते ती अशी की, क्षणात हा संबंध संपणार! आता पुन्हा कधी ती मला भेटणार नाही. भेटण्याचा संभव नाही. तिच्या भेटीच्या रूपाने तिची स्मृती शिल्लक राहील. पण कोरडी स्मृती! अंतःकरणात एक सूक्ष्म वेदना उठली – पण कृतज्ञतेच्या भावनेत भिनून गेली.

इतक्यात गाडी हलली. मी घाईघाईने चढलो आणि तिचा निरोप घेऊ लागलो. भारतीय पद्धतीने तिला नमस्कार केला. आणि ती – गाडीच्या बरोबर पावले टाकीत चालू लागली,– आणि वाढत्या वेगाने पावले टाकता टाकता 'सायोनारा' 'सायोनारा' असे पाच वेळा म्हणाली. हळूहळू तिची मूर्ती मागे मागे जाऊ

लागली, दिसेनाशी झाली आणि तिच्या कलदार आवाजाला कारुण्याची झार आणणारा तो 'सायोनारा' तेवढाच माझ्या कानात झंकारत राहिला.

* * *

योशिएला ही हकीगत मी सांगितली – उत्साहाने सांगितली आणि तिने माझ्या साऱ्या उत्साहावर आणि अभिमानावर घडाभर थंड पाणी ओतले. ती म्हणाली—

—त्यात इतकं हुरळून जाण्यासारखं काय आहे? भेटी देणं आणि भेटी घेणं याचं आम्हा जपानी लोकांना वेडच आहे. त्यासाठी कसलंही निमित्त पुरतं. आज काय कोणाचा वाढदिवस आहे, मग दे त्याला चित्राची एक फ्रेम; आज काय ऑगस्टमधलं चंद्रदर्शन आहे, मग दे काव्याचं अगर चित्रांचं पुस्तक बक्षीस. बाहुल्यांचा सण आला की प्रत्येक मुलीला बाहुली मिळते आणि चेरीच्या मोहराच्या दिवसांत चेरीच्या फुलांची नक्षी काढलेले रुमाल सारखे फडफडतात. आम्ही जपानी लोक भेट देण्यासाठी निमित्तच शोधीत असतो.

—पण – मी काही तरी बोलण्याचा प्रयत्न केला.

—पणबिण काही नको.

—अग पण ती मला स्टेशनवर निरोप द्यायला का आली?

—हात्तिच्या! त्याचं कारण उघड आहे. तिनं तुम्हांला एवढीशी बाहुली दिली, आणि तुम्ही परतभेट काय पाठविली तर भारी किंमतीचे हस्तिदंती हत्ती. तेव्हा त्याची परतफेड करणे भागच होतं. आम्ही जपानी लोक असलं ऋण डोक्यावर घेऊन राहणारे नाहीत.

असेल, तसे असेल! पण खरेच, तसे असेल? माझे अंतःकरण विषादाने भरून गेले. आपले काही तरी हरवले, काही तरी हरपले असे वाटले. सारा उत्साह, सारा अभिमान गळून पडला. जड पावलाने हॉटेलात परतलो.

पण खोलीत आलो, टेबलावरच्या त्या बाहुलीकडे पाहिले नि म्हटले, नाही. योशिए म्हणते ते इतर जपान्यांच्या बाबतीत खरे असेल, पण साकुरायुच्या बाबतीत ते बिलकुल खरे नाही. असणे शक्य नाही. तिची भेट म्हणजे नुसता उपचार नाही. ती भेट अशीतशी नाहीच मुळी. निर्मळ स्नेहाचा धागा तिच्या भोवती गुंडाळलेला आहे.

आणि आज ती बाहुली मी माझ्या कपाटात पाहतो, तेव्हा त्या बाहुलीच्या मागे साकुरायूची मूर्ती – काळयाभोर केसांची, इवलाल्या मासोळींसारख्या डोळयांची, प्राजक्ताच्या फुलासारखे हसणारी मूर्ती उमलते, आणि मग—

—स्वतःला इंग्रजी येत नसतानासुद्धा पुतण्याकडून लिहवून घेऊन नियमित पत्रे पाठविणाऱ्या,

—ॲपेण्डिसायटिसच्या आजारात मी दिलेल्या हत्तींच्या जोडीवर नजर खिळवून पोटातल्या वेदना विसरू पाहणाऱ्या,

—पत्रातून चेरीच्या कळ्या पाठविणाऱ्या,

—वर्षदिनाची पत्रिका पाठविताना कोमल कलादृष्टी व्यक्त करणाऱ्या,

—स्वतःचा फोटो पाठवितानाचा संकोच शालीनतेने आकर्षक करणाऱ्या,

—आणि जपानचे सांस्कृतिक सौंदर्य मला कळवण्याकरिता (पुतण्याच्या साहाय्याने का होईना पण) शब्दाचे सारे सामर्थ्य गोळा करणाऱ्या—

त्या राजस स्त्रीच्या स्नेहाचा सुगंध माझी स्मृती दरवळून टाकतो.

योमुरा सिक्युरिटीजकडून आलेले चंद्रोत्सवाचे निमंत्रण मी पाहतो आणि माझे मन हरकून जाते. जपानी चंद्रोत्सव म्हणजे शरदृतूतील चंद्रदर्शनाचा समारंभ. जपानी रसिकतेच्या मुग्ध स्वप्नाळूपणाचे आणि भावगर्भ काव्यात्मकतेचे प्रतीक, असे या उत्सवाचे वर्णन मी वाचलेले असते. ते आता प्रत्यक्षच अनुभवायला मिळणार म्हणून खूप होऊन जातो. चांदण्याचे हिम कणकणाने पसरत पृथ्वीवर येत आहे, आजूबाजूची झाडे–फुलझाडे त्याच्या पिठुर मायेने रोमांचित झालेली आहेत, चांदण्याने फुललेल्या अंगणात एक शोभिवंत चौरंग मांडलेला आहे, त्याच्यावर लाकडाच्या एका स्वच्छ नितळ पात्रात पंधरा 'ओडाङ्गो' (भाताचे लाडू) कोमल कौशल्याने रचून ठेवलेले आहेत, शेजारीच एका नक्षीदार फुलदाणीत सुसुकी गवताच्या नुकत्याच प्रसवलेल्या रोपाची पुष्परचना शोभते आहे, रंगीन खाद्यपदार्थांच्या बशीवर चंद्राचे किरण पसरले आहेत, चौरंगाच्या एका बाजूला किमोनो कन्या सामीसेनच्या सुरावर नाचत आहेत, त्यांच्या किमोनोंच्या रंगीन बाह्या आणि त्यांच्या हातातले रंगदार पंखे यांच्या विभ्रमांची युती मजेदार वाटत आहे, चौरंगाच्या दुसऱ्या बाजूला झाबुतान( गिरद्या )वर बसलेले युकाताधारी पुरुष शुभ्र चांदण्याने फुललेल्या नजरेने एकमेकांशी गप्पा मारीत आहेत, मधूनच त्यांच्या गप्पांना काव्य-गायनाची स्फूर्ती चढत आहे, – माझ्या नजरेसमोरच्या निमंत्रणावर ही दृश्ये उमटू लागतात. पण ही कोमल काव्यमय दृश्ये 'पेन' परिषदेच्या असंख्य प्रतिनिधींच्या उभार उत्साहात कशी काय उमटणार? मात्र, चंद्रोत्सवाच्या उत्साहाने मन पुरते भारलेले असते. असल्या शंकांना अवसर देण्यास ते बिलकूल तयार नसते.

मनाचा हा उद्योग सुरू असतानाच अंतःकरणात काही तरी शाश्वत, सनातन असे जागृत होत आहे असे वाटते. कसल्या तरी निरंतर अनुभवाचा धागा आताच्या अपेक्षेशी जोडला जात आहे, आणि त्याला तरल स्पंदन प्राप्त होत आहे, असे वाटू लागते. पण तो अनुभव साकारत नाही. त्याला गंध-रूप-लक्षण प्राप्त होत नाही. स्वप्नाच्या तरल स्मृतीप्रमाणे होते. क्षणात तो सापडतोसा वाटतो, क्षणात निसटतो. निसटतो म्हणूनच त्याला पकडण्याचा प्रयत्न सुरू होतो. निकराने सुरू होतो. मग तो अबोध अनुभव कोठल्या तरी एका शब्दात जमा होत आहे असे वाटते. शब्द अगदी जिभेच्या टोकावर येतो, पण उमटत नाही. जादूचे फुलपाखरू मुठीत सापडले म्हणून मूठ उघडावी तर काही नाही!

अशी मूठ चारदा, पाचदा, अनेकदा उघडतो – आणि मग एकदम अवचित आटवते – अरे! हा शब्द म्हणजे ‘ कोजागिरी ’!

माझा मीच चकित होतो. ‘ कोजागिरी ’ हा शब्द आटवू नये ना? ज्या कोजागिरीच्या कार्यक्रमांनी मन आणि देह अनेकदा न्हाऊन निघाला, त्याचे स्मरण होऊ नये? इतके आपले व्यक्तित्व आपल्या संस्कृतीला पारखे व्हावे? आधुनिक जीवनाने आपल्या व्यक्तित्वाचे धागे इतके कुरतडावे? पण मग जपानमध्ये सांस्कृतिक सणांना – अभिजात सांस्कृतिक सणांना – इतके महत्त्व कसे? त्याने तर आधुनिक जीवन पूर्ण आत्मसात केले आहे! मग त्याच्या जीवनात प्राचीन संस्कृती इतकी भिनलेली कशी? आणि माझा भारतीय आत्मा जागृत करण्याची शक्ती तिच्यात आली कोठून? जी शक्ती मला पाश्चात्यांच्या सणात – त्यांच्या खिसमसमध्ये, ईस्टरमध्ये अगर ऑल सोल्समध्ये कधी आढळली नाही, ऑल सोल्सच्या रात्री चर्चच्या आवारात मेणबत्त्यांची आरास पाहूनही अगर मिलानच्या ड्युओमोमध्ये लाल फुलांची पूजा पाहूनही जो माझा भारतीय आत्मा जागृत झाला नाही तो जागृत करण्याची शक्ती जपानच्या चंद्रोत्सवात कशी आली? मन आश्चर्याने भारून जाते. लगेच जपानविषयीची आपुलकी त्यात मिसळते. काही काळ आत, अंतरंगात कसले तरी अबोध समाधान पसरत आहे असे वाटते...नि मग जरा वेळाने जाणवते की, भारतीय संस्कृती आणि जपानी संस्कृती यांच्यात कसले तरी जिव्हाळ्याचे नाते आहे, कसल्या तरी नाजुक धाग्याने दोघांचे सांस्कृतिक जीवन एकत्र बांधलेले आहे. हे कसले नाते आहे हे ध्यानात यायला फार वेळ लागत नाही. लक्षात येते की, मानव आणि निसर्ग यांच्यामधील सुमंगल संबंधांच्याच अधिष्ठानावर या दोनही संस्कृती उभारलेल्या आहेत.

दिवसभर पावसाची पिरपिर चालू होती. आज कसले चंद्रदर्शन नि कसला चंद्रोत्सव, या विचाराने मन सारखे रंजीस येत होते. आता पावसाची झड थांबली आहे. तासभरात पावसाचा थेंब उतरलेला नाही. पण खोलीच्या खिडकीतून आकाश काळवंडलेले दिसत आहे. वाटते, जावे का, जाण्यात काही अर्थ आहे का? तरी पण जाण्याची तयारी करतोच. एक मन दुसऱ्या मनाची समजूत घालते – चंद्र दिसला नाही तरी समारंभ असेलच. चंद्राच्या किरणात न्हाऊन निघता आले नाही, तरी समारंभाच्या प्रकाशझोताने रंगून

निवता येईलच. कपडे करून लिफ्टपर्यंत येतो, तो समोर स्वच्छ नितळ आकाशात चंद्राचा गोल जपानी कंदिलाप्रमाणे टांगलेला! नजर तिकडेच लागते – वेध घेत राहते. इतक्यात जाणिवेचा झटका बसतो की, चंद्र चांगला कासराभर वर आला आहे, आपल्याला उशीर झाला आहे. मी घड्याळाकडे एक अधीर नजर टाकतो नि जाऊन लिफ्टचे बटन खसकन् दाबतो!...

उद्यानाच्या प्रवेशद्वारात योमुरा सिक्युरिटीजचे डायरेक्टर आमचे सपत्निक स्वागत करतात. त्या दोघांनीही किमोनो घातलेला असतो, आणि त्यांच्या भोवताली असणाऱ्या कंपनीच्या इतर अधिकाऱ्यांचा पाश्चात्त्य पोशाख त्यांच्या अस्सल जपानी पोशाखाशी विसंगत दिसतो. उद्यानाच्या आवारात आमचे पुन्हा स्वागत करणारे कंपनीचे लोकही पाश्चात्त्य पोशाखातच असतात. मला त्यांचे अस्तित्व अनावश्यक वाटते. किंबहुना खुपतेच. खरे म्हणजे, यांनी यांच्याऐवजी किमोनो घातलेल्या मुली ठेवायला हव्या होत्या. त्यांच्या दाणेदार हास्याने आमचे सुंदर स्वागत झाले असते. या मुलींच्या विचारात चंद्रोत्सवाच्या समारंभाचा विचार मिसळतो नि माझी नजर अंगणात मुसुकीशोभित चौरंगाच्या आसपास नृत्य करणाऱ्या किमोनो-कन्यांना शोधू लागते. पण त्या कोठेच दिसत नाहीत. उलट जरा दूरवर, बागेतल्या तळ्याच्या पलीकडे गर्दी दिसते आणि तिचा गलका कानांवर येतो. ही गर्दी, गलका, बाजार, नजरेत शिरतो आणि मनात फुललेल्या सुरंगीच्या कळ्या कोमेजून जातात. चंद्रदर्शनाच्या शांत, तुष्ट, कलात्म विधीच्या अपेक्षेने माळलेल्या माळा विसकटून जातात. तो बाजार नजरेला अगदी नको असतो, आणि तरी नजर तिकडेच धावते, स्वतःला फसवते, काही तरी शोधू लागते.

तळ्याच्या अलीकडच्या रस्त्याने आम्ही जात असतो. थोडेसे गेल्यावर एका स्टॉलकडे जाण्याची सूचना मिळते. आम्ही तिकडे जातो. स्टॉलभोवती बरीच गर्दी असते. एकदोघे जरा बाजूला होतात. एक जण कच्ची सिमिटाच्या रंगाची बशी घेऊन तिच्यावर ब्रशाचे फटकारे ओढण्यात दंग झालेला दिसतो. हा काय प्रकार बुवा, असे म्हणून मी त्या गर्दीत शिरतो. पाहतो – एका टेबलावर निरनिराळ्या आकारांच्या आणि घडणीच्या बश्या, फुलदाण्या ठेवलेल्या असतात. मधोमध रंगाचे साहित्यही असते. मी चौकशी करतो नि समजते की, हे रंग, हे ब्रश, या बश्या, या फुलदाण्या म्हणजे साहित्यिकाच्या अंगात दबून बसलेल्या चित्रकाराला आव्हान होत.

शब्दांच्या साहाय्याने चित्रे रेखाटण्याच्या तुझ्या कौशल्याचा तुला खूप अभिमान आहे नव्हे का? पाहू द्या तुझी चित्रदृष्टी खरोखरच किती अस्सल आहे ती. घे त्यातली एक बशी. बशी नको असेल तर फुलदाणी घे आणि काढ त्यावर एखादी आकृती. शोभू दे त्यावर तुझी नाजूक नखरेल सही. मग दे ती इकडे. आम्ही ती रातोरात भट्टीत घालू, चांगली तावून सुलाखून काढू आणि मग ती आपल्या पक्क्या रंगांची आणि झकपक पॉलिशची शोभा मिरवीत तुझ्या हॉटेलात हजर होईल आणि तुझ्या सेवेला रुजू होईल. कल्पना सुंदर! पण 'पेन'च्या प्रतिनिधीत स्वतःच्या अंगी अभिजात चित्रकला अगदी उसळ्या घेत आहे अशी खात्री असणारे फार! त्यामुळे त्या टेबलाभोवती या प्रकटू पाहणाऱ्या चित्रकारांची थाप गर्दी लागून राहिलेली. आता, चित्रकला अगदी अष्टांगांनी प्रसन्न झाली, म्हणून ती असल्या चरबट चव्हाट्यावर कशी चमकणार? अर्थात मला स्वतःला याची विवंचना नसते. ब्रशाची नाजूक करामत आपल्याला जमणार नाही हे मला माहीत असते. म्हणून मी, इतर साहित्यिक आपल्या हातातल्या बश्यांची कशी शोभा करतात हे पाहत उभा राहतो, नि उत्तम करमणूक होते! एक साहित्यिक बिगारीतल्या पोरांच्या मक्तेगिरीवर आक्रमण करतो आणि 'उमाळ्यावरी येतेसे सूर्यबिंब विशाल' बशीवर उठवून खाली सही ठोकतो. दुसरा खिशातून एक नटीचे चित्र काढतो आणि तिची छबी बशीवर उमटविण्याचा प्रयत्न करतो. पण या साऱ्यांचे परिमार्जन एक गोरी साहित्यिका करते. कुसुंबी, काळा आणि गडद हिरवा, या तीन रंगांच्या दहा-पाच फटकाऱ्यांत ती मला यामागीचीच्या 'रूरल लिरिक पोएम्' या काव्यात्म चित्राचे स्मरण करून देते. आमचे हिंदी उपन्यासकार वात्स्यायनसुद्धा एक सुंदर चित्र तन्मयतेने रंगविताना दिसतात. (बिचाऱ्यांच्या वाट्याला अखेरीला निराशाच येते. नंतर तीन दिवस सकाळ-संध्याकाळ ते हॉटेलच्या कौंटरवर आपली बशी आली का असे उत्सुकतेने विचारीत आणि 'वुई आर सॉरी सर' असा ठराविक जबाब त्यांना मिळे.) मला हे साहित्यिकांचे चित्ररेखाटन पाहत राहण्यातच मजा वाटते; पण आजकाल गमतीचा निर्भेळ आस्वाद कोणाला सहनच होत नाही. स्टॉलवरच्या एका माणसाचे माझ्या रिकामटेकड्या उद्योगाकडे लक्ष जाते नि तो एक बशी व ब्रश माझ्या हातात कोंबतो. माझा नाइलाज होतो. मी आतल्या आत चरफडतो. पण लवकरच

चरफडीचे रूपांतर काळजीत होते आणि हे नसते लचांड निभावणार कसे अशी विवंचना लागते. मग लगेच एक कल्पना सुचते. आपल्याला चित्रकर्म जमत नसेल, पण लहानपणी आठल्ये गुरुजींच्या कृपेने घटवलेली आपली मोडी सही तर आपल्यापाशी आहे! तिचे चार–दोन फराटे या बशीवर ओढले तर या जपान्यांना ती त्यांच्या चित्रलिपीप्रमाणेच मोहक वाटेल! ते मला चित्रकार म्हणणार नाहीत, पण कॅलिग्राफिस्ट तर म्हणतील? कॅलिग्राफी (अक्षर-लेखन) हा आजकाल चित्रकलेचा एक शहाजोग प्रकार गणला जातोच. हा विचार मनात येतो आणि माझ्या बशी-ब्रश धरण्याच्या क्रियेत एक ऐट येते. मी ब्रश रंगात बुडवितो नि बशीवर मोडी सही उठविण्याच्या उद्योगास लागतो. पण लेखणीचे मस्त वळण विसविशीत ब्रशात कसे येणार? सही मध्येच फसफसते! हातातली बशी तशीच आपटून फोडावी असे वाटते. पण तेवढे धैर्य होत नाही. काय करावे म्हणून मन घोटाळत आहे तोच स्टॉलवरचा मनुष्य माझ्या हातातली बशी ओढून घेतो नि माझे नाव विचारतो. मला त्याचा राग येतो नि सूड म्हणून मी त्याला भलतेच नाव नि भलताच पत्ता देतो. वाटते, भली जिरेल! (पण पुढे वात्स्यायनाची बशी मध्येच गळपटल्याचे समजले तेऱ्हा त्याच्याऐवजी आपली जिरली याची जाणीव झाली, पण अर्थात मी कोणाला तसे सांगितले नाही.) इतक्यात टेबलावर ब्रशाशेजारीच बोरूंची रास पडलेली दिसते – आणि एकदम खंत वाटते. खरेच, ब्रशाऐवजी बोरू घेतला असता तर सही कशी मस्त जमली असती!

त्या स्टॉलभोवतालच्या गराड्यातून बाहेर पडतो नि वाटते, हा काय चंद्रोत्सव? हे चंद्रोत्सवाचे विडंबन! पण लगेच ध्यानात येते की, नाही, यात एक रीत आहे. तिचा कलेशी संबंध आहे. या उत्सवाच्या मूळ हेतूची त्यात कदर आहे. आता आमचे साहित्यिकच त्याचे विडंबन करतात त्याला लोक काय करणार? आणि योमुराच्या लोकांनी या कलात्मक कार्यक्रमाऐवजी आम्हाला सर्कशीतल्या-प्रमाणे पेटत्या कड्यातून उडी मारायला सांगितले असते तर आम्ही काय करणार होतो?

दहापाच पावले जातो तो आणखी एक स्टॉल दिसतो. त्याचे दर्शन थोडेसे चमत्कारिकच दिसते. एका चौकोनी टेबलावर बांबू उभारून त्यांना दोऱ्या बांधलेल्या आणि या दोऱ्यांना चारपाच इंच रुंदीच्या आणि दीडदोन फूट लांबीच्या

कागदाच्या चिरफळ्या टांगलेल्या. खाली टेबलावर शाईची दौत आणि बोरूंची रास. यातली एक चिरफळी घ्यायची आणि तिच्यावर आपले एक आवडते वचन लिहायचे – आणि अर्थात खाली सही करायची. का नकळे, माझ्या डोक्यात एक मिस्किल कल्पना येते. मी एक चिरफळी घेतो, तिच्यावर मर्ढेकरांची 'पिपात मेले ओल्या उंदीर' ही ओळ अतिशय काळजीपूर्वक लिहितो आणि खाली लफ्फेदार सही करतो. सही करतो नि मनाला एक प्रकारची उपरती होते. आपण हे का केले? जेथे एखादे सुंदर सुभाषित लिहायचे तेथे हे अभद्र वचन का लिहिले? हा नुसता मिस्किल व्रात्यपणा! जरा वेळाने ध्यानात येते की, हा नुसता निरागस मिस्किलपणा नाही. त्यात एक चीड आहे – मघाशी माझी कॅलिग्राफी फसली त्याची चीड. मग मन पश्चात्ताप पावते आणि ती चिरफळी फाडून तिचे राई-राईएवढे तुकडे करते. अर्थात जे मनात होते ते हातांनी वठत नाही. तेवढे धैर्य होत नाही. पण एक सत्कृत्य आपण मनोमन केले एवढ्यानेच मन थोडे शांत होते. निर्मळ बनते.

जरा पुढे जातो तो आणखी एक घोळका दिसतो. हे काय आणखी, असे म्हणून मी त्यात शिरतो, तो एक मनुष्य लिफाफ्याची रांग लावून बसला आहे आणि त्याच्या हातावर एक छोटासा रंगीन पक्षी उडत, बागडत, चिवचिवत असलेला दिसतो आहे. मी विचारतो, हे काय? शेजारचा इसम सांगतो, हा पक्षी तुमचे साहित्यिक-भविष्य सांगेल – समोरच्या लिफाफ्यांपैकी हवा तो तू मनात धर, पक्षी तो नेमका हुडकून काढील आणि चोचीत धरून तुझ्या हातात देईल; त्या लिफाफ्यात तुझे भविष्य असेल. हा खेळ मला फार पसंत पडतो. पण आपले भविष्य कळण्याअगोदर इतरांच्या ललाटी काय आहे ते कळावेसे वाटते. म्हणून मी तसाच उभा राहतो. तो एक साहित्यिक स्वतःच्या लिफाफ्याची मागणी करतो. पण पक्षी कोणताच लिफाफा उचलीत नाही, फक्त चोचीने एक-दोन इकडचे तिकडे करतो. तेव्हा तो साहित्यिक कबूल करतो की, आपण थोडी लबाडी केली होती, एकदम दोन लिफाफे मनात धरले होते. मग तो एक लिफाफा निश्चित करतो, पक्षी तो उचलतो आणि त्याचे भविष्य बाहेर पडते की – तुम्ही छानछोकीच्या आणि शिंदळकीच्या गोष्टी लिहाल! त्याबरोबर हशा पिकतो, आणि त्याच्या शेजारचा मित्र, त्याच्या पाठीवर थाप मारून लेका, तुला खूप पैसा मिळणार' असे त्याचे अभिनंदन करतो. नंतर दुसरा

एक साहित्यिक आपले नशीब उघडतो. त्याला सांगितलेले असते की, तुम्ही प्रेमपत्रे लिहाल ! लोक एकदम ' वाह्वा ! वाह्वा ! ' असे ओरडतात, कारण त्याचे वय असते सत्तरीच्या पलीकडे ! मग मला वाटते आपणही आपले भविष्य पाहावे. मी माझा लिफाफा योजतो आणि पक्षी नेमका तो उचलून आणून देतो. पण लिफाफा उघडण्यास हात कचरतो. तुम्ही ' हजार पाकक्रिया 'सारखा ग्रंथ लिहाल असे त्या लिफाफ्यात आले तर काय करायचे ? अखेरीला धीर करून लिफाफा उघडतो. आणि त्यात निघते : ' तुम्ही परोक्षेचे पेपर लिहाल. ' मग ध्यानात येते की, हे भविष्य वगैरे कुछ नाही, नुसती गंमत आहे. यात कौतुक करायचे ते त्या पक्ष्याचे. तो तुमची नजर अचूक हेरतो आणि लिफाफा काढून देतो.

* * *

या घोळक्यात एक मध्यमवयस्क स्त्री असते. माझे भविष्य बाहेर पडते तेव्हा ती हसते नि माझ्याकडे पाहते. लगेच माझ्याकडे येते नि माझे नावगाव विचारते. मी भारतीय आहे हे समजल्यावर तिला थोडा आनंद होतो. तिने नेहरूंचे आत्मचरित्र वाचलेले असते. ती माझ्या लेखनाबद्दल चौकशी करते. तिच्या आवाजात आपुलकी असते. नजरेत सलगी दिसते. ती विचारते, तुम्ही चहापानाचा विधी केलात ? मी म्हणतो, नाही. ती म्हणते, मग चला आणि आम्ही चालू लागतो. चालताना ती स्वतःबद्दल बोलते. ती एक भाषांतरकर्त्री असते. तिने इंग्रजीतून पुष्कळ कथा-कादंबऱ्या जपानीत आणलेल्या असतात. एच्. इ. बेट्स्चे ' डॅफोडिल स्काय ' तिने नुकतेच भाषांतरलेले असते. बेट्स् तिचा आवडता लेखक. मी म्हणतो, छान ! बेट्स् माझाही आवडता लेखक आहे. त्याची प्रतीकात्मक शैली मला फार आवडते. त्याची रसदार निसर्गवर्णने मला अतिशय आवडतात. ती म्हणते, ही वर्णने जपानच्या कोवळ्या नक्षीदार निसर्गाला छान लागू पडतात, म्हणून बेट्स् जपानीत आणताना फार मजा येते. यावर मी बेट्स्च्या ' स्टेशन ' या कथेबद्दल बोलतो — आणि मी बोलत असता ती हळूच माझा हात आपल्या हातात घेते.

आम्ही चहापानाच्या घरात येतो. घर चांगले उंची असते. जपानी कारागिरीच्या आणि सौंदर्यदृष्टीच्या खुणा सर्वत्र दिसतात. तोकोनोमातले चंद्रोदयाचे चित्र बहारदार असते. फुलदाणीतली लिलीची शुभ्र फुले नाजूक छटांनी

शोभतात. छतावरची नक्षी फारच जिवंत दिसते. त्याला टांगलेले दोन कागदी कंदील म्हणजे दोन नक्षत्रगोलच येथे आणून लावले आहेत असे वाटते. खालची ततामी तकतक तकाकते. मधल्या चौरंगावरचे लाखेचे पॉलिश सोनेरी झळाळीने लकाकते. पण हे चहागृह नव्हे. चहापानाच्या विधीचे अस्सल ठिकाण नव्हे. चहाच्या जपानी विधीबद्दल मी थोडेसे वाचलेले असते. त्याचे मला आकर्षण असते. म्हणूनच आदल्या रात्री मी एका चहापानाच्या समारंभाला मुद्दाम गेलो होतो. गेलो नि फजित पावून परत आलो. तो चहापानविधी नव्हता, चहापान-विधीची चेष्टा होती. तीन-चार समानधर्मीयांनी अलिप्त वृत्तीने साजरा करण्याच्या समारंभास तीन-चारशे लोक हजर होते. अर्थात कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नाही अशी स्थिती झाली. ( माझा पायपोस काही काल अक्षरशः हरवला ! ) आणि मग धांदल, गडबड आणि गोंधळ यांची यथेच्छ खैरात झाली. गैरलागू नाट्यप्रयोग, गैरलागू भाषणे आणि गैरलागू उपचार यांनी बेजार होऊन परत आलो. मघाशी या बाईने चहा-पानाच्या विधीचा उल्लेख केला तेव्हा याची भरपाई होईल अशी आशा मनात दाटली. पण हे चहागृहच नसते, निदान कल्पनेतल्या चहापानाच्या पर्णकुटीशी याचा काही संबंध नसतो. येथील चहा-पानाची उपकरणे अगदी अभिजात असतात. चहादेखील हिरव्या पेजेसारखा विधियुक्त असतो. तो देताना सुंदर, शालीन अगत्य व्यक्त होते; पण चहापानाच्या पर्णकुटीतल्या त्या शांतीचा प्रत्यय येत नाही, ती शांतितुष्टी निर्माण होत नाही. जगाच्या जंजाळापासून क्षणभर मुक्त झाल्याचा साक्षात्कार होत नाही. अंतः-करणात अर्थगर्भ आत्मचिंतनाचा आशय निर्माण होत नाही. कारण आत्म-चिंतनात रमून जाण्याचे हे ठिकाणच नव्हे – आणि असते तरी काय उपयोग ? मिसेस नाकामुराला ( माझ्या नूतन मैत्रिणीला ) आत्मचिंतन वगैरे गोष्टी साफ पसंत नाहीत हे स्पष्ट असते. ती सारखी बोलत असते. आपण भाषांतरलेल्या पुस्तकांबद्दल बोलते, भाषांतराच्या अडचणींबद्दल बोलते, आणि स्वतःबद्दलही बोलते. अर्थात स्वतःबद्दल कोरून, मापून बोलते. स्वतःच्या प्रोफेसर नवऱ्या-बद्दल बोलते, त्याच्या विद्वत्तेची स्तुती करते, आणि आपण त्याच्यापासून घटस्फोट घेतला असल्याचेही सांगून टाकते. मी एकदम कान टवकारतो. आता एखाद्या मानवी समस्येची ओळख होणार अशी आशा वाटते. आणि मी, तू घटस्फोट का घेतलास असे विचारतो. त्याचे मात्र ती धड उत्तर देत नाही. स्वभाव, स्वातंत्र्य, लेखनावर जगण्याची हौस, वगैरे गोष्टींचे बयाण लावते,

पण निश्चित काही सांगत नाही. मी मात्र हा प्रश्न आडूनतिडून अनेक प्रकारांनी विचारतो. विचारताना चेहरा करुण करतो. आवाजात सहानुभूती ओततो. स्त्री एकटी राहू शकत नाही, तिच्या विकासाला पुरुषाच्या सहवासाची आवश्यकता असते, एकलकोंड्या जीवनामुळे तिच्या ठिकाणचा प्रतिभेचा झरा आटण्याचा संभव असतो, असे मी भावनानिर्भर आवाजाने सांगतो. माझ्या सांगण्याचा विलक्षण परिणाम होतो. तिचा चेहरा लालीलाल होतो. डोळे पाणावतात. ओठ स्फुरण पावतात. ती एकदम पर्स उघडते, रुमाल काढते. मला वाटते, तो डोळे पुसण्याकरिता. पण ती तो माझ्यापुढे धरते आणि म्हणते, मी हा आपल्याला भेट देऊ ? मी चकित होतो. आपल्या बोलण्याचा असा काही परिणाम होईल अशी कल्पना नसते. तिला बोलके करावे नि तिच्या रहस्याला वाचा फोडावी एवढीच माझी इच्छा असते. मला काय बोलावे कळतच नाही. एका अनोळखी स्त्रीकडून ही असली हातरुमालासारखी भेट घेण्याची कल्पना मला कशीशीच वाटते. पण तिच्या हातातला तो सुंदर रुमाल आणि तिचा तो आर्त आकृष्ट चेहरा पाहिल्यावर मला नाही म्हणण्याचे धैर्य होत नाही. मी नुसता पाहत उभा राहतो. ती ' घ्या ना ' म्हणते आणि रुमाल हातात कोंबते. मी तो अगदी हलक्या हाताने, त्याला फारसा दाट स्पर्श होणार नाही अशा रीतीने घेतो आणि अलगद खिशात ठेवून देतो – आणि अभावितपणे हात कपड्याला पुसतो ! मग एकदम वाटते, अरे, तिच्या ध्यानात तर आले नाही ? पण ती भारावलेल्या नजरेने दूर कोठे तरी पाहत असते. थोड्याच वेळात भानावर येते नि म्हणते, " अच्छा ! तुम्ही टोकिओला आलात म्हणजे मी तुम्हाला फोन करीन. " एवढे म्हणते नि निघून जाते. मी तसाच उभा राहतो. काय करावे क्षणभर समजतच नाही. नुसता समोरच्या तळ्याकडे पाहतो. इतक्यात 'पेन-परिषदे'चा एक ऑस्ट्रेलियन शिलेदार एका मायको ( उमेदवार गेशा ) मुलीला हातावर झुलवीत झुलवीत येतो नि म्हणतो, " तुला गाठलंन् वाटतं तिनं. आता भरली कंबक्ती तुझी. आता सोडणार नाही ती तुला. सारखी कोणाचा तरी पाठलाग करीत असते. मला पण पकडलंन् होतं. पण मी निसटलो – नि मला ही मधाची कुपी गवसली. " असं म्हणतो नि आपल्या मुलीच्या गालावर टिचकी मारतो. तीही नजर उडवून हसते आणि त्याच्याबरोबर चवड्यावर उडती पावले टाकीत निघून जाते. मला चमत्कारिक वाटते. मी तसाच तेथे उभा राहतो. चालण्याची उमळच पायात उरत नाही. निर्बोध नजरेने तळ्याच्या पाण्याकडे पाहत राहतो. माझा मलूल हात

अभावितपणे खिशात जातो नि त्या रुमालाला स्पर्श झाल्याबरोबर सटकन् बाहेर येतो. जरा वेळ तसाच लोंबत राहतो. मग पुन्हा खिशात जातो. आतल्या आत रुमालाची चुरगळी करतो आणि ती बाहेर काढून तळ्यात फेकून देतो, नि मन एकदम अपराधी बनते. आतल्या आत खाऊ लागते. का केले मी असे? का फेकला गेला तो रुमाल? एका मायकोशी उंडारलेला प्रणय राजरोस करीत हिंडणारा सांगतो म्हणून? ती बाई तरुण असती, तयार असती तर ही मायको भेटेपर्यंत थांबला असता का तो? असल्या या इसमाकडून नीतिपाठ घ्यावा मी? एका स्त्रीच्या चारित्र्यावर दुसऱ्याने उडविलेल्या शितोड्याने मी माझे मन मलीन करून घ्यावे? शाबास माझी! मी स्वतःची निर्भर्त्सना करू लागतो. स्वतःशीच कुद्ध लागतो. आपले व्यक्तित्व घरंगळते आहे असे वाटू लागते –

इतक्यात उमाशंकर जोशी कोठूनसे येतात आणि 'काय पाध्येमहाराज' अशी हाक मारतात नि माझी सुटका करतात. 'काय ड्रिंक वगैरे काही नको काय?' असे विचारतात व मी त्यांच्याबरोबर चालू लागतो. उजवीकडे रस्त्याच्या कडेला कॉफीचे, फळांचे, रसपानाचे स्टॉल्स असतात. तेथल्या मुली हास्याची फुले उधळून कॉफी, रस वगैरे देत असतात. मी रस पितो, पण तो देणाऱ्या मुलीच्या हास्यात हास्य मिसळू शकत नाही. उमाशंकरजींना त्या हास्याचे काही नसतेच. मग आम्ही दोघे चालू लागतो. त्या तळ्यात पाणी आणणाऱ्या ओढ्यावर एक छोटासा लाकडी पूल असतो तेथपर्यंत येतो, आणि त्या पुलाच्या कठड्यावरच बसतो. आणि दृष्टी समोरचे दृश्य रेखू लागते—

समोर एक विश्वच पसरले आहे. तळ्याच्या विस्तारावर छायाप्रकाशाचा खेळ सुरू आहे. तळ्याच्या काठी असलेल्या झाडांच्या विस्तारातून येणाऱ्या चंद्रकिरणांनी पाण्यावर प्रकाशाची फुले फुलली आहेत आणि पाण्याच्या तरंगावर ती वायलप्रमाणे लहरत आहेत. उघड्या विस्ताराच्या तरंगांवर चंद्राच्या प्रकाशामुळे जरतारी शोभा पसरली आहे, आणि मध्येच चंद्राचे प्रतिबिंब वाऱ्याच्या लहरींबरोबर अलगद हलत आहे. तळ्याच्या पलीकडच्या काठाकडे एक लहानशी होडी वल्हवली जात आहे आणि चंदेरी प्रकाशात हा एक भव्य पक्षीच आपले विशाल पंख पसरून जात आहे असे वाटत आहे – आणि त्याच्या झपाट्यामुळे तळ्यावरचे खरेखुरे हंसपक्षी भयचकित होऊन पंख फडफडवीत पळत आहेत! पलीकडच्या काठावर लोकांनी दोन-तीन जाळ

पेटवले आहेत. समोर असे हे प्रकाशाचे प्रकार प्रकटले आहेत, पण आमच्या भोवती मात्र झाडांच्या छायांचा अंधारच दाटला आहे. हवेतल्या ओलाव्यामुळे तोदेखील ओला वाटतो. अगदी अंगाला चिकटतो. त्यामुळे विलक्षण निर्भर वाटते. विश्रब्ध वाटते. उमाशंकर काही बोलले म्हणजे शांतता भंगते. पण मी फारसे काही बोलत नाही. म्हणून संभाषण वाढत नाही. आम्ही नुसते समोरच्या दृश्याकडे टक लावून पाहत बसतो. समोरून लोक जात-येत असतात. ते नजरेत व्यत्यय आणतात नि दृष्टी भानावर येते. मग उजवीकडच्या जंजाळाची जाणीव होते – आणि मग जाणवते की, आपण इकडे आलो ते असे स्तब्ध–निःस्तब्ध बसून राहण्यासाठी नाही. आपणही या जंजाळात शिरले पाहिजे, पाहिले पाहिजे. पण उठण्याची ऊर्मीच होत नाही.

इतक्यात तो ऑस्ट्रेलियन आपल्या मायकोला हातावर खेळवीत समोरून जातो नि माझी तंद्री भंगते. मी आतल्या आत बेचैन होतो. आता हा आला. जरा वेळाने ती भाषांतरकर्त्री आली तर! तिला भेटण्याचे आता मला धैर्य होणार नाही. समोरचे शांत विश्व एकदम अस्वस्थ बनते. त्यात तिच्या त्या रुमालाची चुरगळी मला दिसते – आणि मन पुनः अपराधी बनते. या अपराधाने रांधलेल्या मनाने मी तिला पुन्हा भेटू शकत नाही. तिला टाळलेच पाहिजे, आणि टाळायचे असेल तर पलीकडच्या गर्दीत शिरले पाहिजे. गर्दीत कोणीच भेटत नसते. भेटले तरी ओळखत नसते. गर्दी ही आजच्या जगाची एक अजब किमया आहे. गर्दीत पाहता येते, पण न्याहाळता येत नाही. जाणवते, पण बोध होत नाही. भावते, पण खोल स्पर्शत नाही. अशा या गर्दीतच आता शिरले पाहिजे. मी उमाशंकरांना काही तरी सबब सांगतो नि उठून चालायला लागतो. चालायला म्हणजे काय, जवळ जवळ पळायलाच! एकदा गर्दीत मिसळतो आणि मग सुटलो असे वाटते.

* * *

या गर्दीला मुळी एक आत्मा नाहीच. पाच-दहा आत्मे आहेत, आणि ते पाच-दहा प्रकारांनी व्यक्त होण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्यातला एक आत्मा हिगाशियामा टेकडीची काळवंडलेली आकाशरेषा न्याहाळीत आहे. दुसरा गप्पा-ष्टकांत गर्क झाला आहे. तिसरा बिअरचे पेले भरून देणाऱ्या मायकोंच्या दृष्टी-बरोबर खेळत आहे. काही वेळापूर्वी या गर्दीचा रसिक आत्मा रंगमंदिरात होता.

'आकेबोनो' नृत्याच्या थाटाने बेहोष झाला होता. त्या नृत्याच्या सौंदर्याची पखरण करणाऱ्या नर्तिकांच्या पदक्षेपाबरोबर तो नाचत होता. त्यांच्या हातातील पंख्यांच्या तरल हालचालींबरोबर त्याच्या डोळ्यांच्या पापण्या फडफडत होत्या. रंगदार किमोनोच्या बाह्यांबरोबर तो हिंदळत होता. आणि त्यांच्या वाद्यांच्या करुण स्वरांबरोबर तो कंठ पावत होता. पण लवकरच तेथल्या गर्दीने तो गुदमरला. तहानेने त्याचा जीव व्याकुळ झाला. मायकोच्या हातातील पेयांची सोनेरी सळसळ त्याच्या नजरेपुढे नाचू लागली. त्याची एकेक कला विलग होऊ लागली – आणि त्याने हळूच काढता पाय घेतला. लवकरच रंगमंदिर रिकामे झाले. गर्दी सोनेरी पेयाकडे वळली.

तरी पण आमच्या रसिक आत्म्याची नृत्यलालसा मधूनच जागृत होते आणि त्याची दृष्टी पुनः रंगमंदिराकडे वळते. पण आता तेथे किमोनोच्या चित्ररम्य बाह्या फडफडत नसतात. ऐटदार हातांतले पंखे हालत डोलत नसतात. बदामी डोळ्यांच्या नितळ पापण्या उडतपडत नसतात आणि सामीसेनचे सूर मूक बनलेले असतात. एखादी किमोनो-कन्या त्या रंगमंदिराच्या रेखदार-लयदार खांबाच्या आधाराने उभी असते, पण तिच्या डोक्यावर आता केशकलापाचा मुकुट नसतो. तिच्या पावलांत चैतन्याचे स्फुरण नसते. नेत्रांत अर्थांचे संकेत नसतात. आता तिची वृत्ती मुग्ध असते. नजर निश्चल असते. आणि चेहऱ्यावर एक प्रकारचा संकोच असतो. पण आमच्या आत्म्याची रसिकता आता रंगदार बनलेली असते. सोनेरी पेयाची सळसळ त्याच्या अंगात शिरलेली असते. हा मुग्ध, लाजवट कारभार त्याला पसंत पडत नाही. त्याला मायकांचे आणि गेशांचे वार्तालाप आणि नेत्रसंकेत हवे असतात. त्याही त्याचे स्वागत करण्यास सज्ज असतात. आपले सोनेरी (दातांचे) हास्य खुलवितात आणि आमचा आत्मा या सोनेरी हास्याशी हातातल्या पेयाच्या सोनेरी धारेची सांगड घालण्यात रमून जातो.

तरी रसिकतेची, अव्वल अभिजात रसिकतेची आराधना अद्याप सुरू आहे... समोर पाहा. तळ्याचा पृष्ठभाग उजळला आहे. काठावरून तळ्यात डोकावणाऱ्या रंगमंदिराचे दिवे प्रकाशू लागले आहेत. पाणरेषेवरून टांगलेल्या कंदिलातील मेणबत्त्या आपले रंगीन किरण फाकू लागल्या आहेत. कंदिलांच्या प्रतिबिंबाची रांगच रांग पाण्यात उमटली आहे आणि तळ्याच्या तरंगांबरोबर हालतडोलत

आहे. मागची मंदिराच्या देवदारी पडद्यावरची चिडाची हिरवी आकृती जिवंत झाली आहे. आपली नजर क्षणात या आकृतीकडे धावते. क्षणात पाण्यातल्या प्रतिबिंबांचा वेध घेते. आकृतीकडून प्रतिबिंबाकडे आणि प्रतिबिंबाकडून आकृती-कडे, अशी तिची एकसारखी धावपळ होते – आणि मग प्रतिबिंबांचे हालते संस्कार आकृतीवर होतात, आणि ते चिडाचे झाडच हालते आहे असे वाटते. आपल्या नजरेवरचा भ्रम असा रंगलेला असतानाच नर्तिका येतात आणि त्यांचे नृत्य सुरू होते. आता या नर्तिकांचे रूप पालटलेले असते. त्यांच्या नृत्याचे रूपही पालटलेले असते. हिरव्या-निळ्या किमोनोंची जागा लाल-शेंदरी किमोनोंनी घेतलेली असते. त्यांच्या नाजुक मस्तकांवरचे केशकलापांचे रचनाबद्ध मुकुट उतरविले असतात. त्याऐवजी सुंदर स्वाभाविक केस रुळत, भुरभुरत असतात. त्यांची पावलेही आता साचेबंद नसतात. त्यात एक स्वैर स्वच्छंद गती असते. एक मोकळी मिजास असते. हावभावात अंतःस्फूर्ती असते. हातातले पंखेदेखील रूढ संकेतांनी बांधलेले नसतात. त्यात नवा अर्थ असतो, अन्वय असतो. सामीसेनच्या करुण स्वरांची जागा आता कोटोच्या चैतन्यमय स्वरांनी घेतलेली असते. असे हे मुक्त, स्वतंत्र, जिवंत नृत्य. त्याच्या गतीने वातावरणाला एक नवीनच जाग येते. नवीनच शक्ती संचरते, आणि त्याच्या रंगीन आकृतींनी तळ्याच्या पृष्ठभागावर एक जादूची दुनियाच निर्माण होते. वाटते, या कोणी पाताळींच्या जलकन्याच चंद्रदर्शनासाठी येथे आल्या आहेत – आणि चंद्रोत्सवाच्या नृत्याची पावले टाकीत आहेत.

असे हे रसरंग नृत्य. चैतन्यशाली नृत्य! पण आमच्या रसिक आत्म्याला ते आता रिझवू शकत नाही. त्याचे चित्त पकडू शकत नाही. ते सोनेरी हास्य आणि ती सोनेरी धार यांनी त्याचा पुरा कबजा घेतला आहे. ते हास्य त्याच्या नजरेवर डवरले आहे आणि ती धार त्याच्या धमन्यांत नाचत आहे. एका मामुली जादुगाराच्या कारागिरीने नजरबंद झालेली त्याची दृष्टी नृत्यांगनांच्या तरल पदक्षेपांचा वेध घेऊ शकत नाही. जुगुप्सूच्या उड्यात अडकलेली त्याची बुद्धी त्यांच्या हातातल्या पंख्याबरोबर डोलू शकत नाही. गर्दीतील गप्पांच्या अधीन झालेली त्याची वृत्ती नृत्यातील आकृतीशी समरस होऊ शकत नाही. खरे म्हणजे किओटोच्या डोंगराळ भागातील ग्रामकन्यांचा रंगदार आणि ढंगदार पोशाख करून पाहुण्यांना टेम्पुरा खाऊ घालणाऱ्या गेशांचीच त्याला भुरळ पडली आहे.

( आणि त्यांच्या एकेक हास्यकटाक्षासाठी एकेक टेम्पुरा पोटात ढकलून अजीर्णाला आमंत्रण देण्याची त्याची तयारी आहे. ) आणि अगदी पोटातली गोष्ट म्हणजे सोनेरी धारेच्या त्या प्रमत्त पेयाच्या पेल्यानेच त्याला पुरते पकडले आहे.

आता हा आत्मा म्हणजे आपला पूर्वीचा रसिक आत्मा उरलेला नाही. ‘ आकेबोनो ’ नृत्यातल्या हिगाशियामा टेकडीच्या पायथ्याशी असलेल्या मंदिराचे अगदी उषःकालीच दर्शन घेऊ पाहणाऱ्या अभिसारिकांच्या लयबद्ध पदक्षेपांचे आकर्षण त्याला उरलेले नाही. अंधकाराने भरलेल्या गुहेत लपून बसलेल्या सूर्यदेवते( आमातेरासू ओ-कामी )ला बाहेर आणून विश्वावर सूर्यकिरणांचा वर्षाव करू पाहणाऱ्या नृत्याच्या आवेगाची त्याला पर्वा नाही. त्याचा आता पुरा कायापालट झाला आहे. त्याच्या वेशभूषेची चिन्हे बदलली आहेत. आता हा आत्मा म्हणजे ग्रीक वाङ्मयाचा एका डोळ्यात हसू आणि दुसऱ्या डोळ्यात रडू आणणाऱ्या डायोनिससचा आत्मा ! सुरईतील द्रव्याने जीवनाचा बगीचा बहरून टाकण्याची मनीषा बाळगणाऱ्या उमरखय्यामचा आत्मा ! शुक्राचार्यांच्या संजीवनीविद्येची क्षणार्धात राळ करून टाकणाऱ्या शक्तीचा आत्मा ! किंवा महाभारताच्या संहाराचे सर्वभक्षक उपसंहारात रूपांतर करणाऱ्या प्रेरणेचा आत्मा ! आणि खुद्द जपानमध्ये, ‘ साकेमारी ’च्या रमण्यात, स्त्री-पुरुषांमधील नाजूक भेदावर आधारलेल्या संस्कृतीचाही गदारोळ करू पाहणाऱ्या त्या अग्निगर्भ पेयाचा आत्मा ! इहलोकातील मामुली संकेतांच्या आणि भेदाभेदांच्या पलीकडे आता हा आत्मा गेला आहे. आपल्या आवडत्या पेयातला भेदाभेदही तो ओळखीत नाही. बिअर, साके, शांपेन, ‘ व्हिसुकी ’ असल्या भेदांची क्षुद्र माया तो जाणीत नाही. त्याच्या मुळाशीच असलेल्या ब्रह्माचीच फक्त त्याला आस आहे. परतत्त्वाचाच स्पर्श त्याला झाला आहे ! आता तळ्याच्या पृष्ठ-भागावर प्रतिबिंबांची माया निर्माण करणाऱ्या समोरच्या नृत्याची त्याला काय पर्वा असणार ? त्या नृत्यात निमग्न असलेल्या नर्तिकांच्या पोशाखात एक नवीन थाट असेल; त्यांच्या केशकलापात नवीन स्वैरता असेल; त्यांच्या नेत्रांवर नवीन संकेत असतील; पदक्षेपात नवीन तरलता असेल; अगर स्वरात नवीन गोडवा असेल — पण ऐहिकाच्या पलीकडे दृष्टी लावून बसलेल्या आत्म्याला या साऱ्याची कसली क्षिती !

समोरच्या नृत्याची माया आता तो स्वतःच आत्मसात करू लागतो. नर्तिकांच्या तरल पावलांचे अनुकरण स्वतःच्या अस्थिर पावलांनी करू लागतो.

कोटीच्या स्वरात आपला घोगरा स्वर मिसळतो. पंखाच्या हालचालीचे संकेत आपल्या खिशातल्या (मळक्या) हातरुमालाच्या कशाबशा केलेल्या फडफडीत पाहू लागतो. त्याचे सारे जग त्याच्या या असल्या उद्योगात येऊन सामावते!

असे पाचदहा मिनिटे चालते. काही पाहुण्यांना समोरच्या नृत्याची कदर असते. त्यांचा जीव अस्वस्थ होतो. ते व्याकुळ नजरेने समोर पाहू लागतात. समोरच्या नर्तिकांत कसली तरी चलबिचल सुरू आहे असे त्यांना वाटते. ते जरा न्याहाळून पाहून लागतात – तो रंगमंदिरातले दिवे जातात. तेथे अर्थसूचक अंधार पसरतो. अंधारातल्या अस्पष्ट आकृत्या एकेक नाहीशा होतात. तळ्याच्या पृष्ठभागावरचे जलकन्यांचे नृत्य केव्हाच निमालेले असते. आता तेथे चंद्राचे प्रतिबिंब थरकापत असलेले दिसते. पण आमचा मश्गुल आत्मा! – हे बदल त्याच्या मनाला स्पर्श करीत नाहीत. तो यांच्या पलीकडे गेलेला असतो. अंधार-उजेडाचे सर्वसाधारण जग त्याच्या खिजगणतीत नसते. ते अंधारलेले रंगमंदिर त्याला प्रकाशलेले वाटते, आणि आपल्याच पावलांनी तेथे नृत्याचा थयथयाट सुरू आहे अशी त्याची खात्री असते. तळ्याच्या पृष्ठभागावर त्याला चंद्राचे एक बिंब दिसत नाही, अनेक दिसतात. ती थरकापत नसतात, प्रतिभेने स्फुरलेली दिसतात. आजच्या चंद्रोत्सवाचा त्याला अगदी साक्षात्कार घडलेला असतो!

* * *

आता आपले येथे काही काम नाही. आपण आता परतायला हवे. मी निघतो. मघाच्याच रस्त्याने निघतो. मघाच्या त्या पुलावर येतो. त्यावर टेकतो नि समोरच्या विश्वाकडे नजर टाकतो. पण आता काही भासत नाही. काही जाणवत नाही. पंख वल्हवणारा पक्षी अदृष्ट झाला आहे. प्रकाशाची फुले कोमेजली आहेत. चंद्रप्रकाशाची जरतारी शोभा काळी पडली आहे. झाडांच्या छायांचा अंधार अस्वस्थ बनला आहे.

मी उठतो नि चालायला लागतो. एक प्रकारच्या तंद्रीतच चालतो. समोरून कोणी येते-जाते याचे भान उरत नाही. कोणा येण्याजाणाऱ्यालाही माझे अस्तित्व जाणवत नाही.

# कात्सुरा बंगला



कात्सुरा व्हिला म्हणजे तोशिहिटोच्या जीवनाशी दैवाने जो मजेदार खेळ केला त्याचे एक फल आहे.

खेळ मजेदार पण विपरीत. त्याला असे गोड फळ आले हे आपले साऱ्यांचे भाग्य! तोशिहिटो हा सम्राट ओगिमाची याचा नातू. याला दत्तक घ्यावे अशी त्या वेळचा कर्तुमकर्तुम सेनानी हिदेयोशी याची लहर लागली. खुद्द सम्राट आणि त्याचे दाही दिशांचे सरदार-दरकदार हिदेयोशीच्या पायावर लोळण घेत होते. पण आपण हलक्या कुळात जन्मलेलो ही जाणीव त्याला जाळीत होती. आपले नाही

चालता चालता मी आडवाटेला लागतो. तळ्यापासून दूर, झाडाझुडपांनी भरलेल्या भागात येतो. सगळीकडे चांदणे टिपूर पडलेले असते. झाडे, झुडपे, वेली, रस्ता, जमीन – सारी चांदण्याने फुललेली असतात. पृथ्वी, आप, वायू, आकाश – पंचमहाभूतेच चंद्रप्रकाशात न्हाऊन निघत असतात. चंद्रप्रकाशाच्या अभिषेकात पावन होत असतात. सारे विश्व कसे साक्षात्कार झाल्यासारखे चूर बनलेले असते.

मीच एकटा चालत आहे. पण माझ्या व्यक्तित्वाचा कण न् कण चांदण्याने भारलेला आहे. माझ्या आत, अंतःकरणात, शांतीचा, प्रसन्नतेचा अपूर्व अनुभव येत आहे. मी त्यात गढून गेलो आहे, आणि बाहेर पावले टाकण्याच्या माझ्या क्रियेत एक प्रकारच्या लयतत्त्वाचा प्रत्यय येत आहे.

इतक्यात माझे लक्ष डावीकडे दूर जाते. एक डेरेदार वृक्ष. त्याच्या तळाशी एक बाक, आणि एक जोडपे. निश्चल बसलेले. निश्चल नजरेने आकाशातल्या चंद्राकडे पाहत असलेले. दोघांच्याही अंगात किमोनो आहे. त्याच्यावर छाया-प्रकाशाची फुले फुललेली आहेत. आणि सभोवताली नीरव, निःस्तब्ध शांती आहे!

मी जरा न्याहाळून पाहतो. निरखून पाहतो नि माझ्या ध्यानात येते की, मघा प्रवेशद्वारापाशी माझे, सर्वांचे, ज्या जोडप्याने स्वागत केले होते तेच हे जोडपे– योमुरा सिक्युरिटीज्चे डायरेक्टर आणि त्यांची पत्नी!

तरी आपल्या वंशाचे रक्त उजळावे म्हणून त्याने बादशहाचा वंशज दत्तक घ्यायचे ठरविले आणि तोशिहिटोला मांडीवर बसविले. तोशिहिटोला बालवयापासून वाङ्मयाचा नाद. वृत्ती जात्याच रसिक. पण दैवाने त्याला हिदेयोशीच्या रणांगणातून जाणाऱ्या मार्गावर खेचले. त्याने मुकाट्याने म्यानातून तलवार काढली आणि रिकाम्या म्यानात रसिकता भरून ठेवली. पण दैवाची लीला अशी मिस्किल! लवकरच हिदेयोशीच्या पोटी औरस पुत्र जन्माला आला. झाले. नैसर्गिक ओढीने कृत्रिम ओढीवर मात केली. हिदेयोशीने तोशिहिटोला एक निष्प्रभ किताब अर्पण केला आणि त्याला राजवाड्यात परत पाठवून दिले.

दैवाचा हा चमत्कारिक खेळ तोशिहिटोच्या पथ्यावरच पडला. त्याने आपली बंदिस्त रसिकता बाहेर काढली आणि न पेलणारी तलवार म्यानात कायमची अडकवून टाकली. त्याने युसाईचे शिष्यत्व पत्करले. युसाई हा त्या वेळचा विख्यात वाङ्मयसेवक. कोकिंश्यूवरच्या टीकेमुळे विद्वज्जगात मान्यता पावलेला. शिवाय त्याच्या संग्रही कोकिंश्यू[1] आणि गेंजी मोनोगाटारी[2] या दोन महान ग्रंथांची हस्तलिखिते. कालिदासाच्या मेघदूताचे हस्तलिखित संग्रही असण्यासारखेच हे भाग्य. तोशिहिटोने युसाईचे शिष्यत्व स्वीकारले आणि त्याच्यापाशी कोकिंश्यू आणि गेंजी मोनोगाटारीचा अभ्यास केला. गुरूच्या मृत्यूनंतर या महान हस्तलिखितांचा ताबा शिष्याकडे आला. या दोन ग्रंथांनी त्याची अभिरुची बनविली. या दोन ग्रंथांनी त्याची कलादृष्टी घडविली.

कात्सुरा बंगला आणि कात्सुरा बाग ही या कलादृष्टीचीच उदाहरणे. मानवी संस्कृतीच्या इतिहासातल्या अर्थपूर्ण खुणा म्हणून विख्यात झालेली उदाहरणे. फ्रँक लॉइड राइटसारख्या वास्तुशास्त्रज्ञाला वेड लावणारी उदाहरणे. हा बंगला आणि ही बाग एन्श्यू कोबोरीने बांधली अशी आख्यायिका आहे. एन्श्यू कोबोरी हे त्या काळचे एक प्रस्थ होते. गाढा विद्वान, कर्तबगार प्रशासक, आणि प्रतिभाशाली वास्तुशास्त्रज्ञ म्हणून त्याची कीर्ती होती. चहापानविधीचा पंडित म्हणूनही त्याला फार मान होता. त्याने बांधलेली चहागृहे आज जपानात राष्ट्रीय

---

(१) ९०५ साली राजाज्ञेने तयार करण्यात आलेला प्राचीन व अर्वाचीन कवितांचा संग्रह.

(२) गेंजीची कथा. लेडी मुरासाकी हिने अकराव्या शतकाच्या पहिल्या दशकात लिहिलेली कादंबरी. जगातली पहिली कादंबरी.

स्मारके म्हणून गणली जातात. अमर्याद पैसा, अमर्याद वेळ आणि अमर्याद स्वातंत्र्य दिले तरच तो वास्तुरचनेचा विचार करण्यास तयार असे. कलावंताच्या ध्यानी, मनी आणि स्वप्नीच काय ती वावरणारी ही अमोल स्वातंत्र्ये तोशिहिटोने त्याला बहाल केली असे ही आख्यायिका सांगते. पण यात काही अर्थ नाही. तोशिहिटोला कोबोरीची गरज नव्हती. कात्सुरा बंगल्याची आणि बागेची रूपरेखा त्याच्या मनात तयारच होती. गेंजी मोनोगाटारीत अशा अनेक बंगल्यांची वर्णने आहेत. ती त्याच्या अंतरंगात मुरलेली होती. आणि तीच या बंगल्याच्या रूपाने साकार झाली. म्हणजे दहाव्या–अकराव्या शतकातील वास्तुशास्त्राचा आत्मा या बंगल्यात आहे आणि तो राईट–कॉर्बुशिएसारख्या आधुनिक वास्तुशास्त्रज्ञांना वेड लावणारा आहे. हीच या बंगल्याची किमया आहे. खरे म्हणजे ती अस्सल जपानी वास्तुशास्त्राची किमया आहे. चिनी वास्तुशास्त्राचे संस्कार प्यालेल्या वास्तुशास्त्राची नव्हे. ज्या वास्तुशास्त्राचे शुद्ध सुंदर रूप तिसऱ्या शतकात बांधलेल्या इसे मंदिरात दिसते त्या वास्तुशास्त्राची. हे जपानी वास्तुशास्त्र जन्मतःच आधुनिक आहे आणि त्याची आधुनिकता सनातन आहे. ही सनातन आधुनिकताच वाङ्मयाच्या द्वारे कात्सुरा बंगल्यात उतरली.

वाङ्मयीन अभिरुचीतून हा बंगला जन्मला आणि वाङ्मयीन रसात तो अनेकवार न्हाऊन निघाला. वाङ्मयाचे अनेक वारे त्याच्या दालनातून वाहिले. अनेक वाङ्मयीन स्मृती त्याच्या वातावरणात दरवळल्या. अनेक वाङ्मयसेवकांच्या पदस्पर्शाने त्याची ततामी पवित्र झाली. वाङ्मयसेवकांनी सांगितलेली अनेक रहस्ये त्याच्या कडीकपाटात दडून बसली आणि तेथून अलगद निसटली. लेडी मुरासाकी, शे शेनागन[३] आणि ओ–नो–कोमाची[४] यांच्या जीवनातल्या अनेक रहस्यांचा

(३) १००२ च्या सुमारास लिहिलेल्या माकुरा नो सोशि या डायरीवजा खमंग खुमासदार पुस्तकाची लेखिका.

(४) प्राचीन जपानची एक सुंदर पण निर्घृण स्त्री. तिच्यावर आपक्त झालेल्या एका सरदाराला तिने फर्माविले की त्याने आपल्या रथातून लागोपाठ शंभर रात्री तिच्याकडे खेपा घातल्या तर ती त्याला भेटेल. दुर्दैवाने शंभरावी खेप पुरी होण्याच्या ऐन अगोदर तो मेला. ही प्रमत्त स्त्री म्हातारी होऊन पैशाच्या व रूपाच्या दृष्टीने अतिशय हलाखीच्या स्थितीत मेली. तिच्या जीवनावरचे एक नोह नाटक प्रसिद्ध आहे.

भेद येथे झाला. गेंजी, नारिहिरा[५] वगैरेंच्या प्रणयकथांचे गहिरे आणि कोमल रंग येथल्या लाकूडकामाच्या रेषांत अनेकवार खुलले. तीनचार कवींनी एकत्र बसून बांधलेल्या कवितांच्या साखळ्या (रेंगा)[६] येथे अनेकवार सांधल्या आणि अनेकदा तुटल्या. येथल्या फुसुमावरील कानो तान्यूच्या[७] चित्रांना चर्चेचे धुमारे अनेकदा फुटले आणि कित्येकदा तुटून पडले. वाङ्मयाच्या अनेक वेली येथे वळचणीवरून आढयाला पोचल्या. जपानी वाङ्मयाच्या इतिहासातले हे एक विरामस्थान आहे.

या बंगल्याच्या निर्मात्यांची अभिरुची त्याच्या भागाभागात दिसते. तोशिहिटोच्या 'ओल्ड शोइन'मध्ये[८] ती दिसते, तशीच ती, नंतर बावीस वर्षांनी बांधलेल्या, तोशिताडाच्या 'न्यू गोटेन'मध्ये[९] दिसते. बंगल्याच्या भिंतीत ती दिसते तशीच छपरातही ती दिसते. बंगल्याच्या निरनिराळ्या भागांच्या प्रमाणात ती दिसते. फुसुमावरच्या मेपलपर्णांच्या साध्या नक्षीत ती दिसते. तोकोनोमाच्या भिंतीवरील निसर्गदृश्यात दिसते. व्हरांड्यातील फळ्यांच्या पोतात आणि रेषांत दिसते. सज्जाच्या बांबूकामात दिसते. पागरेषेच्या सलग पट्टीत दिसते. छपराच्या किंचित वाकलेल्या कडेत ती दिसते. एकंदर बंगल्याच्याच साध्या, सुबक, तरल दर्शनात ती दिसते. ते सारेच दर्शन सुरुचिर सावेरणाने संस्कारलेले आहे.

---

(५) 'इसे–कथा' या काव्यकथांचा लेखक आरिवारा–नो–नारिहिरा (८२३–८८०). मधूनमधून गद्याने जोडलेला काव्यसंग्रह असे या पुस्तकाचे स्वरूप आहे. त्यात लेखकाच्या प्रणयकथांचाच भरणा आहे.

(६) रेंगा : तीन किंवा अधिक कवींनी बसून केलेला काव्यरचनेचा प्रयोग. एकाने ७,५,७ अशा मात्रांची तीन ओळींची कविता रचायची; दुसऱ्याने ७,७ मात्रांची दोन ओळींची, आणि तिसऱ्याने पुन: पहिल्याच्याप्रमाणे. पहिली आणि दुसरी, व दुसरी आणि तिसरी मिळून एक सलग अर्थाची कविता बनली पाहिजे हा मुख्य नियम. इतर अनेक पोटनियम आहेत. अशा प्रकारे एका कवितेतून दुसरी निर्माण होते, म्हणून कवितेची साखळी असे या प्रयोगाला म्हणता येईल.

(७) एकरंगी चिनी पद्धतीच्या चित्रकलेचा वस्ताद (१६०२–१६७४). तोकुगावा राजवटीच्या सुरुवातीच्या कालातला दरबारी चित्रकार.

(८–९) तोशिहिटोने १६३६ मध्ये बांधलेल्या आग्नेयेकडच्या भागाला 'जुने शोइन' म्हणतात आणि १६५८ मध्ये तोशिताडाने बांधलेल्या दक्षिणेकडेच्या भागाला 'नवे गोटेन' म्हणतात.

ज्या मोमोयामा[१०] युगात वास्तुशिल्पावर ऐश्वर्यशाली अलंकारांची उधळपट्टी होत असे, त्याच कालात हे साध्या सुरुचिर दृष्टीचे प्रतीक निर्माण झाले. तोशिहिटोच्या नशिबाशी दैवाने जो खेळ केला, त्याचीच जणू परतफेड झाली! ऐश्वर्याचे प्रदर्शन करण्यात हिदेयोशी अग्रेसर होता. त्याच्या दत्तकपुत्रानेच ही साधी सुबक वास्तू निर्माण केली. प्रथम दत्तक घेऊन मागाहून बेफिकीरपणे फेकून दिल्याचा हा जणू त्याने सूडच घेतला. पण एका सुसंस्कृत, अभिरुचिसंपन्न अंतःकरणाचा तो सूड! विनाशाऐवजी विकास हा त्याचा प्रकृतिधर्म ठरला! आज निशी हाँगांजी मंदिरात असलेल्या हिदेयोशीच्या दरबारी दिवाणखान्यावर कोरीव शिल्प आणि रसरंग आरास यांचा वीट आणणारा वर्षाव झाला होता. तोशिहिटोने विनम्र साधेपणा हाच परवल मानला. हिदेयोशीचा दिवाणखाना भव्य विशाल आहे; कात्सुराचा दिवाणखाना नम्र आटोपशीर आहे. त्या दरबारी दिवाणखान्याच्या फुसुमावर सुवर्णरसात डुंबलेला कानो तान्यूचा कुंचला मनसोक्त नाचला आहे, तर त्याच कानो तान्यूची अतिशय संयमशील कला कात्सुराच्या फुसुमावर रेखलेली आहे. हिदेयोशीच्या दिवाणखान्यातला रम्मा कोरीव शिल्पाच्या तावदानांनी मढविलेला आहे, तर कात्सुराचा रम्मा साध्या सफेत गिलाव्याचा आहे. त्या दरबारी वास्तूची तक्तपोशी अनेकरंगी रेखाकृतींनी चितारलेली आहे, तर कात्सुराच्या तक्तपोशीत हिनोकी लाकडाच्या फळ्यांचे नैसर्गिक रेपासौंदर्यच काय ते व्यक्त होते. हिदेयोशीने सत्ता आणि संपत्ती यांचे उन्मत्त प्रदर्शन मांडले, तर तोशिहिटोच्या संस्कारसंपन्न अभिरुचीचे निर्मळ दर्शन कात्सुराच्या साधेपणात झाले.

पण साधेपणा म्हणजे भिकारपणा नव्हे. साधेपणा म्हणजे कंजुषपणा नव्हे. अगर चुकारपणाही नव्हे. साधे दर्शन आणि समृद्ध अंतरंग असा हा प्रकार आहे. कात्सुराचे सामान साधे दिसेल, पण त्याचे मोल भारी आहे. ते दिसायला सामान्य दिसेल, पण आहे खरोखर दुर्मिळ, दुष्प्राप्य, मोठ्या सायास-प्रयासाने

(१०) मोमोयामा युगाचा काल १५६८–१६१५ मानला जातो, पण त्याचा प्रभाव नंतरही राहिला. त्याचे अतिशय झगझगीत रूप, कात्सुराच्याच सुमारास बांधलेल्या निक्को येथील तोशोगू मंदिरात आढळते.

मिळविलेले. त्यावर अमाप रसिकता खर्च झालेली आहे, आणि त्यासाठी उभा जपान पालथा घातलेला आहे. लाकूड दूरच्या जंगलातून कसोशीने निवडून आणलेले आहे. बांबू चिबारीच्या एका प्रसिद्ध बेटातून आणले आहेत, आणि शाकार छपरावर चढण्यापूर्वी हिनोकीच्या कित्येक सालींचे मुस्कट फुकट गेलेले आहे. एखाद्या ग्रंथाच्या साध्या प्रासादिक शैलीमागे अनेक ग्रंथांचे अनेक दिवसांचे अध्ययन असते तसेच हे आहे. तोशिहिटोच्या कित्येक दिवसांच्या वाङ्मयीन अभ्यासाचा तो आविष्कार आहे.

बंगल्याच्या भिंतीत, छपरात अगर सज्जात जी दृष्टी आहे तीच बागेच्या तळ्यात, टेकड्यांत अगर झाडांत आहे. कारण तिच्यावरही तोशिहिटोच्या वाङ्मयीन अभिरुचीचे तसेच संस्कार झालेले, आहेत आणि त्याचे वाङ्मयीन आणि सांस्कृतिक जीवन तिच्याशी तसेच निगडित आहे. ही बाग म्हणजे तळे, टेकड्या, दरडी, दगड, झाडे, झुडपे, आणि शेवाळ यांचा एक रेखीव पट आहे. खोल दृष्टीने बनविलेला पट. तळे कात्सुरा नदीचे पाणी आणून बनविलेले आहे. त्याला अधूनमधून ओढ्याचे अगर कोंडीचे रूप दिलेले आहे. ओढ्यावर ठिकठिकाणी फरशांचे पूल आहेत. त्यांच्या काठी इकडेतिकडे ओबडधोबड दगड टाकलेले आहेत. एकदोन ठिकाणी रेताड किनारा आहे. तळ्याचे पाणी अधून-मधून उभारलेल्या टेकड्यांच्या आणि उंचवट्यांच्या दरम्यान पसरलेले आहे. टेकड्यांच्या कधी माथ्यावर, कधी बाजूंवर, तर कधी पायथ्याशी चित्रविचित्र आकारांची आणि विस्तारांची चीड–चेरी–सुगी–हिनोकीची झाडे आहेत. तळ्याकाठच्या जमिनीवर आणि बंगल्याकडच्या पटांगणावर हिरवेचार शेवाळ पसरलेले आहे आणि त्यावर तऱ्हेतऱ्हेच्या आकाराचे दगड अंतरा-अंतरावर टाकून पाऊलवाटा बनविलेल्या आहेत. हे सारे यदृच्छेने झाले असे वाटते, पण सारे विचारपूर्वक बनविलेले आहे. एकेका झाडाचा वेडावाकडा विस्तार, दगडाचा विक्षिप्त आकार, वाटेचे विचित्र वळण, ओढ्याचा तऱ्हेवाईक ओघ – सारे काही मुद्दाम घडविलेले आहे. दगड दूरदूरच्या खाणीतून आणलेले आहेत. झाडे कसोशीने वाढविलेली आहेत. शेवाळाची जात मोठी दुर्मिळ आहे, आणि वाटेची वळणे वळताना पावलांना वारंवार विस्मयाची ठेच लागावी अशी व्यवस्था केलेली आहे. वरवर नजर फिरवली की वाटते, हे सारे नैसर्गिक आहे, निसर्गाचीच ती किमया आहे किंवा सृष्टीच्या प्रारंभकाली इझानागी

आणि इझानामी[११] यांनी त्या साऱ्या वस्तू जशा निर्माण केल्या आणि इकडे तिकडे भिरकावल्या तशाच त्या पडल्या आहेत. बागेतल्या दिव्यांचा आणि डोणींचा ढंग असा आहे की, त्या कोणी एखाद्या लहरी शक्तीने बनविल्या आणि येथे आणून टाकल्या असे वाटावे. प्रत्येक दिव्याचा आणि डोणीचा आकार वेगळा आहे, कळा वेगळी आहे. त्यांच्या दगडाची खाण वेगळी आहे. अनादिकाळी जणू त्यांची उत्पत्ती झाली, इतके त्यांचे दर्शन जुने आहे, जुनाट आहे. काहींना तडे गेले आहेत. काहींच्या कपच्या उडाल्या आहेत. पण तडे मुद्दाम गेले आहेत, आणि कपच्या मुद्दाम उडविलेल्या आहेत. निसर्गाने हे सारे आपल्या लहरीने केले असा भास निर्माण करण्याचा आग्रह या साऱ्या खटाटोपाच्या मुळाशी आहे. कारण निसर्ग येथे प्रमुख आहे. त्याच्या लहरीला महत्त्व आहे. त्याची कदर आहे. निसर्ग हा कोणी शत्रू नाही. तो मित्र आहे, सखा आहे. त्याला जिंकायचे नाही, तर त्याच्याशी सहकार्य करायचे, सहजीवनाचे संबंध जोडायचे, अशी जपानी दृष्टी आहे. त्या दृष्टीतून या बागेची निर्मिती झालेली आहे. बाग अर्थात कृत्रिम, मानवाने बनवलेली, पण ती निसर्गाचा स्वाभाविक भाग वाटली पाहिजे. सारी खटपट मानवाचीच. म्हणजे तोच पाणी साठवतो, टेकड्या रचतो, झाडे लावतो, पाऊलवाटा बांधतो, पण जोवर या साऱ्यांवर निसर्गाचे संस्कार झाले नाहीत, निसर्गाने त्यांना आत्मसात केले नाही; म्हणजे शेवाळ वाढले नाही, झाडावर बांडगुळे धरली नाहीत, पाण्यात लव्हाळे वाढले नाहीत आणि दिव्याच्या तोंडांच्या कपच्या उडाल्या नाहीत, तोवर बाग तयार झाली असे जपान्यांना वाटतच नाही.

जपानी वास्तुशास्त्रात निसर्गाकडे पाहण्याची ही दृष्टी अंतर्भूत असते म्हणूनच त्याच्या योजनेत निसर्ग हा घराचा भाग असतो आणि घर निसर्गाचा भाग असते. जपानी घर भोवतालच्या निसर्गावर ताठ मान काढून दिमाखाने उभे राहत नाही. आजूबाजूच्या झाडीत लोपून जाण्यात ते धन्यता मानते आणि जपानी मानवसुद्धा एखाद्या उंच व्यक्तीने निंच वस्तूकडे अधिक्षेपाने पाहावे तसे

---

(११) प्रारंभी फक्त चिखलाचा समुद्र होता, त्यातून इतर देवतांबरोबर इझानागी आणि इझानामी या देवताही निर्माण झाल्या, त्यांनी जपानचा भूदेश निर्माण केला, अशी जपानी लोकांची समजूत आहे.

निसर्गाकडे पाहात नाही. खाली ततामीवर बसून समान पातळीवरून निसर्गाकडे दृष्टिक्षेप करण्यात तो सार्थक मानतो. तसेच जपानी घर निसर्ग आणि मानव यांच्यामध्ये पडदा उभारीत नाही. उलट, त्याच्या सरकत्या भिंती बाजूला होतात, घर सताड उघडे होते आणि भोवतालचा निसर्ग हा घराचाच एक भाग बनून जातो. मग निसर्गाचा हिरवा रंग मानवाच्या डोळ्यांत आणि मनात शिरतो. निसर्गाचे वारे घरातून वाहू लागतात, आणि घरातली मने बाहेरच्या झाडांबरोबर हासू-डोलू लागतात. जपानी वास्तुशास्त्रात निसर्ग आणि मानव, घर आणि बाग अशी एकमेकांत रमतात, एकमेकांत मिळून जातात.

कात्सुरा बंगला आणि कात्सुरा बाग अशीच एकमेकांत मिळून गेली आहेत. त्यांच्यात कसलाही केव्हाही दुरावा राहू नये म्हणून सज्जाने त्यांना जोडले आहे. कायमचे जोडले आहे. सज्जा बंगल्याचाच भाग आहे, पण काबुकी रंगपटाचा एक तुकडा प्रेक्षकात घुसतो तसा तो बागेत घुसला आहे. थंडी, वारा, पाऊस यांचा मारा सोशीत आहे. सूर्याची ऊब उपभोगीत आहे. तो बागेशी हसतो, खेळतो, बोलतो, तसाच बंगल्यातल्या मानवाशीही हसतो, खेळतो, बोलतो. त्याला बोलावतो. मग मानव येतो, सज्जावर बसतो आणि बागेकडे नजर टाकतो. समांतर पातळीवरून नजर टाकतो, आणि मग त्याला बागेचे निखळ नैसर्गिक दर्शन होते. निसर्ग त्याला अधिक नैसर्गिक वाटतो. त्याच्या नैसर्गिक रूपात तो रमून जातो. त्याची एक प्रकारची तंद्री लागते. त्या तंद्रीत त्याला हाक ऐकू येते. निसर्गाची हाक. अंतःकरणाला भिडणारी हाक. ती त्याला ओढते. खेचते. तो सज्जावरून उडी मारतो आणि बागेकडे धावतो.

तोशिहिटोला, तोशिताडाला, आणि त्यांच्यामागून अनेकांना, निसर्गाची अशीच हाक ऐकू आली. तिने त्यांना असेच ओढले. अनेकदा ओढले. तुम्हा-आम्हालाही ओढील. निदान मला ओढले —

“तू इम्पीरिअलमध्येच उतरायला हवं – इम्पीरिअलची ऐट काही निराळीच आहे,” पासीनने आग्रहाने म्हटले.

पण पासीनच्या दुसऱ्या एका आश्वासनाप्रमाणेच या आश्वासनाचा, त्या रात्रीपुरता, पुरा फज्जा उडाला!

हे दुसरे आश्वासन टोकिओच्या हवेबद्दल होते. आम्ही सप्टेंबरच्या दुसऱ्या आठवड्यात टोकिओला पोचणार होतो. पण टोकिओला उन्हाळ्याची एक प्रखर लाट येऊन गेल्याचे नुकतेच वाचले होते, म्हणून आम्ही पोचू तेव्हा टोकिओची हवा कशी असेल याची फिकीर करू लागलो. तेव्हा पासीन म्हणाला होता,

“डोण्ट्व्यू वरी. सप्टेंबरच्या बरोबर चार तारखेला टोकिओची हवा बदलत असते. या तारखेला काही तरी होतं – तुफान तरी येतं अगर पाऊस तरी कोसळतो, पण हवा निश्चित बदलते. सप्टेंबरच्या चार तारखेला टोकिओत शरद ऋतूचे वारे वाहू लागतात. तू काही काळजी करू नकोस. टोकिओत आपल्याला झकास हवा मिळेल.”

पण आम्ही हॅनेडा विमानतळावर उतरलो, तेव्हा शरदाचा सोडाच, पण कसलाच वारा वाहत नव्हता. वाऱ्याची एक झुळूक नव्हती. सगळीकडे कोंदटल्या-सारखे झाले होते. रात्री नऊ वाजता आम्ही इम्पीरिअलमध्ये आलो, तेव्हा हवेत गुदमरलेल्या उन्हाळ्याच्या वाफा चांगल्या दाटल्या आहेत असेच जाणवले.

आठनऊ तासांच्या वैमानिक प्रवासाने आणि कस्टम्स वगैरेंच्या कटकटीमुळे जीव अगदी त्रासला होता. केव्हा एकदा खोलीत जाऊन पडेन असे झाले होते. हॉटेलात नाव नोंदविण्याचे वगैरे औपचारिक विधी कसेतरी उरकले आणि एक प्रकारच्या भ्रांत अवस्थेत खोलीत शिरलो. शिरल्याबरोबर ध्यानात आले की, खोलीतली हवा अधिकच कुंद आहे. पंख्याच्या आशेने वर पाहिले तर छत उघडे, ओके आणि इतके ठेंगणे की, ते अंगावरच उतरते आहे असे वाटले. अशा छताला पंखा लावला तर त्याचे पाते गळ्यावरून अलगद फिरायचे!

सुदैवाने टेबलावर एक बैटा पंखा होता. तो सुरू केला आणि खुर्चीवर कोट टाय् फेकून देऊन पलंगावर आडवा झालो. पण लगेच पंख्याची घरघर कानात शिरू लागली आणि आज रात्री झोपेचे खोबरे, हा विचार मनाला डसला.

दहावीस मिनिटे तसाच पडून राहिलो. पण भूक कोकलत होती. म्हणून उठलो, चेहऱ्यावर गार पाण्याचे हबके मारले आणि भोजनगृहाकडे निघालो. भोजन-

गृहाचा दरवाजा खसकन उघडला आणि आत पाऊल टाकणार तोच एका वेटरने अडविले आणि ( अर्थात अगत्याच्या स्वरात ) म्हटले,

" साहेब, इथं कोट-टाय् चढवून यायला हवं – "

मला संताप आला – इम्पीरिअलचा आणि मला त्यात आणून टाकणाऱ्या पासीनचा. म्हणे 'इम्पीरिअल'! उंच छताची भव्य इमारत बांधता येत नाही आणि हा कोट-नेकटायूचा थाट पाहून घ्या. इकडे घामाघुमीने जीव जातोय आणि म्हणे कपडे करकचून या!

पण एकीकडे जिवाचा असा संताप होत असतानाच मनाच्या एका कोपऱ्यात या हॉटेलात अशी ही रुबाबदार शिस्त आहे म्हणून बरेही वाटत होते. तरीपण पुन्हा खोलीत जाऊन कोट-टाय् चढविण्याची माझी तयारी नव्हती. त्यात हा उकाडा! म्हणून मी त्या वेटरला म्हटले,

" या कोट-टायूच्या भानगडीखेरीज दोन घास गिळण्याची काही सोय नाही का तुझ्या या हॉटेलात ? "

" साहेब, मग तुम्ही ग्रिल्मध्ये जा. "

" कुठाय् तुझं ग्रिल् हे ? "

" तुम्ही असे सरळ जा, मग उजवीकडे वळा आणि मग आर्केडमधून खाली उतरा की तुम्ही ग्रिल्मध्येच शिराल. "

मी समोर गेलो. उजवीकडे वळलो. एका कॉरिडॉरमध्ये शिरलो. कॉरिडॉर निरुंद होता. त्याचेही छत डोक्याला भिडू पाहात होते. त्यातच उजेडाचा जवळजवळ अभाव, म्हणून कॉरिडॉर अधिकच चिंचोळा भासत होता. चार चार पावलांवर दुतर्फा रांग लावून बसलेल्या दुकानांच्या जाहिराती. खिडक्यांत मालांचे नमुने नटवूनथटवून ठेवलेले होते, पण त्यांच्या भोवती दिव्यांची आरास नव्हती. एखाद्या दिव्याच्या मिणमिणत्या प्रकाशात त्यांचे अर्धेमुर्धे दर्शन होईल तेवढेच. त्यामुळे ते जादुगाराच्या टेबलावरील वस्तूंप्रमाणे रहस्यमय वाटत होते.

पण त्यांच्या रहस्याचा भेद करू पाहण्याच्या मनःस्थितीत मी नव्हतो. मी तसाच त्या नमुन्यांवर निसटती निस्तेज नजर टाकीत, त्या पावलागणिक अधिक अधिक अज्ञात भासणाऱ्या कॉरिडॉरमधून जात होतो. किती वेळ चाललो, आता मला काही आठवत नाही. एकच गोष्ट आठवते, मी कॉरिडॉरमधून ग्रिल्मध्ये उतरलो तेव्हा आपण पाताळात उतरतो आहोत असे वाटले होते.

आणखी एक गोष्ट आठवते. त्या रात्री मला धडशी झोप लागली नाही. तो घरघरणारा पंखा, छातीवर उडी घेऊ पाहणारे छत आणि गुदमरविणारी हवा यांनी माझ्याविरुद्ध कट केला होता!

* * *

दुसऱ्या दिवशी मी शक्य तितक्या लवकर शहरात फेरफटका करण्यासाठी निघालो. खोलीचा दरवाजा उघडला नि दृष्टी थबकलीच – खोलीतला उजेड बाहेर कॉरिडॉरमधला अंधार कापीत पसरावा हा उलटा न्याय मनाला खटकला.

दोनही बाजूंनी हारीने उभ्या असलेल्या खोल्यांच्या मधून जाणाऱ्या कॉरिडॉर-मध्ये पहिला संस्कार अंधाराचाच झाला. भिंतीला मधूनमधून छोटे छोटे दिवे होते आणि दुरून एका बाजूने बागेतला हिरवा प्रकाश आत येत होता. पण यामुळे काळाकुट्ट अंधार शेवाळला, एवढेच. दिव्यांच्या प्रकाशाची मंद पिवळसर वर्तुळे लालट-काळट खडबडीत भिंतीवर मऊ मखमली माया पसरीत होती, आणि दुरून येणाऱ्या प्रकाशाच्या रेखा तिच्यावर नाजूक पिसासारख्या पसरल्या होत्या; आणि त्या कॉरिडॉरमधल्या अंधारावर – अर्धअंधारावर – छाया-प्रकाशाच्या मृदुमजेदार आकृती अधांतरी नाचत असलेल्या दिसल्या. त्याचा कसला तरी नाजुक नाजुक स्पर्श आपल्या वृत्तींना होत आहे असे वाटले.

एक प्रकारच्या लहरणाऱ्या वृत्तीनेच मी बाहेर आलो. समोर रस्त्यापलीकडे एक पार्क दिसला. प्रथम या पार्कमध्येच जावे असा विचार केला आणि रस्ता ओलांडण्यासाठी रस्त्याच्या कडेला उभा राहिलो. पण रस्त्यावरच्या वाहनांची जीवघेऊ गर्दी मला पलीकडे जाऊ देण्याचे लक्षण दिसेना. मध्येच कंटाळून मागे पाहिले आणि हॉटेलच्या दर्शनी भागाकडे प्रथमच लक्ष गेले. लक्ष गेले आणि दृष्टी खिळली. मला वास्तुशास्त्रातले फारसे काही कळत नसतानासुद्धा या इमारतीत काही तरी अपूर्व आहे याची तत्काल जाणीव झाली. पार्कमध्ये जाण्याचा विचार विसरलो आणि मी त्या इमारतीकडेच पाहत राहिलो.

ते दर्शनच विलक्षण होते. सभोवतालच्या इमारतींच्यापेक्षा पार निराळे. वेगळ्याच शैलीचे आणि वेगळ्या प्रकृतीचे. आजूबाजूच्या इमारती उंच उभार; ही दुमजली असूनही बैठी. त्या नितळ झकपक, ही मळकट खडबडीत. त्या आधुनिक, ही प्राचीन नव्हे, पौर्वात्य नव्हे – काही वेगळीच. कोणाच्या तरी प्रतिभा-शाली लहरीची निर्मिती. तिच्यात एक विलक्षण एकात्मता वाटली. रचनेत काही

एक व्यक्तित्व जाणवले. नजर बांधून ठेवण्याची शक्ती आढळली. नुसती नजर बांधून ठेवण्याची नव्हे, तर पाहणाराच्या मुखतेला वाचा फोडण्याची. मी शेजारीच उभ्या असलेल्या एका गृहस्थाला म्हटले,

"काय मजेदार आहे ही इमारत!"

"फ्रँक लॉइड राइटने बांधलेली इमारत – मजेदार असायचीच," तो गृहस्थ आपले अमेरिकन उच्चार उधळीत म्हणाला.

"राइटने बांधलेली?"

"होय. आणि त्यांना तिचा विलक्षण अभिमान आहे. या इमारतीच्या रूपाने आपण जपानी वास्तुकलेचा मोठा गौरव केला आहे असं त्यांचं म्हणणं आहे."

"मला त्यातलं फारसं काही कळत नाही. पण समोरची टेरेसवरची चिडाची खुजी झाडं तेवढीच जपानी लक्षणं मला या इमारतीत दिसताहेत. कदाचित हे पुढलं कमळाचं तळं –"

"जरा सराईत दृष्टीने पाहिलं तर आणखी काही दिसतील. राइटने या इमारतीला कोणता दगड वापरला आहे तो पाहा. अशा मातब्बर इमारतींना हा दगड वापरलेला सहसा आढळणार नाही. 'ओया' नावाचा, लाव्हा रसाने बनवलेला हा दगड आहे."

माझ्या नजरेसमोर कोकणचा जांभा दगड आला. तोही असाच लाव्हा रसाने बनलेला. त्याचा रंगही असाच लालट-काळसर. फरक एवढाच की, या ओया दगडाला जांभ्याच्यासारखे पांढरे डोळे नाहीत.

आता सकाळच्या तिरप्या उन्हात हा दगड थोडा तकाकत होता, आणि आपला छिद्रमय पोत व्यक्त करीत होता.

"राइटने हा दगड लाकडासारखा वापरला आहे. जपानी वास्तुशिल्पज्ञ लाकूड कापून त्याच्या अंतरंगातील रेषासौंदर्याचं दर्शन घडवितात, तसं यानं या ओया दगडाच्या कणकणीत पोताचं दर्शन घडविलं आहे. ते समोरच्या प्रवेश-द्वाराचे स्तंभ पाहा. वरचा मजला शिरावर तोलून धरणारी ती स्तंभांची रांग पाहा. वरच्या खिडक्यांच्या चौकटी पकडणारे ते खांब पाहा. त्यांना करड्या-सारख्या पट्टीने दिलेला आडवा छेद पाहा. म्हणजे राइटने दगड लाकडासारखा कसा वापरला आहे याची तुम्हाला कल्पना येईल. दगडाचा उपयोग अस

कातीव कापीव लाकडाप्रमाणे केल्यामुळे ही इमारत खडबडीत दगडाची असून-सुद्धा नाजूक वाटते. राइटने या इमारतीवर जी थोडीशी नक्षी काढली आहे ती देखील लाकडावरच्या नक्षीसारखी आहे. ती छपराखालची टेरेसच्या कडेसारखी पुढे आलेली पागरेषा पाहा – एखादी अलंकारिक रेषा सहज ठेवून दिल्याप्रमाणे वाटते. ”

“ खरंच, हे छप्पर किती छान आहे! ”

“ जपानी घरावरच्या साध्या छपरासारखं हे छप्पर, पण त्याच्यामुळे या इमारतीला खूप मजा आली आहे. राइटने या सबंध इमारतीवर एक सलग छप्पर टाकलेलं नाही. दोन बाजूंना दोन स्वतंत्र बंगल्यासारखे भाग उभारून त्यांच्यावर एकाच छापाची दोन छपरं टाकली आहेत आणि त्यांना मधल्या टेरेसने आणि टेरेसमागच्या मजल्याने जोडून दिलं आहे. ही दोन छपरं, एखाद्या भव्य धिप्पाड सेनानीच्या कोटाच्या खांद्यांना अलंकारिक किनखापी झिरमिळ्यांचा बुट्टा शोभतो तशी या इमारतीच्या दोन बाजूंवर शोभताहेत. या इमारतीची अशी तीन भागांत विभागणी केल्यामुळेच ती बोजड वाटत नाही. पण ती अतिशय मजबूत आहे आणि टोकिओची एक अजरामर – अक्षरशः अजरामर – इमारत अशी तिची ख्याती आहे. तुम्हाला माहीत असेलच की १९२३ च्या भयंकर भूकंपातून आणि गेल्या महायुद्धातल्या वैमानिक माऱ्यातून ही इमारत सहीसलामत सुटली आहे. ”

“ विमानमाऱ्यातून सुटली हा काही तिच्या मजबूतपणाचा पुरावा नाही. तो नशिबाचा भाग! ”

“ पण १९२३ च्या भूकंपातून ती बचावली हा नशिबाचा भाग नव्हे. राइटने लवचिक पायाचं आणि खांबांवर वरचे दगड मधोमध तोलण्याचं तंत्र मोठ्या खुबीनं वापरलं म्हणून ती तगली. शिवाय या ओया दगडालाही त्याचं श्रेय दिलं पाहिजे. ”

“ ओया दगडाला? ”

“ हो – कारण या दगडात अंग चोरण्याचा मोठा अमोल गुण आहे. हा मऊ दगड एकमेकांवर आदळला म्हणजे एकमेकांत भिनतो व एकमेकांना पकडतो. हा गुण काळ्या दगडात नाही. काळ्या दगडाचं भांडण हे वैऱ्यांच्या

भांडणासारखं असतं, तर या मऊ दगडांचं भांडण प्रेमिकांच्या भांडणासारखं असतं – त्याचा शेवट मीलनात होतो."

दगडात रसिकता पाहण्याच्या त्याच्या बुद्धीचे कौतुक करावे की राइटच्या शिल्पकलेचे करावे हेच क्षणभर मला समजले नाही !

"आजकाल राइटच्या या इमारतीची चेष्टा करण्याची फॅशन झाली आहे. ही इमारत जुनी आहे, तिचं तंत्र जुनंपुराणं आहे, तिच्यात जागेची उधळपट्टी आहे, वगैरे टीका काही लोक करीत असतात आणि तुलनेसाठी बाजूच्या या 'अनेक्स'कडे बोट दाखवीत असतात. पण निसर्गानेच या आक्षेपकांची अशी काही फजिती केली म्हणता––"

"फजिती ?"

"हो – अगदी सोळा आणे. गेल्या वर्षी वीस वर्षांत झालं नव्हतं असं विलक्षण तुफान झालं. चोवीस तासांत सोळा इंच पाऊस पडला. या ॲनेक्समध्ये पाणी भरलं. त्याची विद्युत्यंत्रे बंद पडली. दिवे गेले. लिफ्टस् थांबली. पण राइटच्या इमारतीला काडीमात्र इजा पोचली नाही."

मी म्हटले, निसर्ग किती मिष्किल आहे !

"पण या इमारतीची खरी गंमत आहे ती तिच्या दर्शनातही नाही आणि तिच्या तांत्रिक पक्केपणातही नाही. ती तिच्या आतल्या वातावरणात आहे. त्या वातावरणात तिचा आत्मा आहे."

पण या इमारतीवरचे एवढे भाष्य मला पुरे होते. अधिक भाष्याने मला अजीर्ण झाले असते. शिवाय आत्म्याची प्रतीती अनुभवाने घ्यायची असते. म्हणून मी त्याला म्हटले,

"मी या हॉटेलातच राहत आहे, तेव्हा त्या वातावरणाचा अनुभव मी घेणारच आहे."

असे म्हणून मी त्या गृहस्थाचे आभार मानले आणि टोकिओच्या रस्त्यात हिंडण्यासाठी निघून गेलो.

* * *

दोन तासांनी चांगला हैराण होऊन परत आलो. टोकिओच्या रस्त्यावरची धूळ, धांदल, ओरड यांनी जीव वैतागला होता. मोटारींची बेफाट धावपळ,

स्कूटर्सचा पिसाट झपाटा, सायकलींचा जीवघेऊ खेळ, गर्दीची वेडी ओढाताण, आणि या साऱ्याला खिजगणतीतही न घेणाऱ्या गेश्यांची टपक्टपक्, यांनी प्राण कासावीस झाले होते. खोलीत जाऊन ऐसपैस पसरावे म्हणून हॉटेलकडे परतलो.

हॉटेलचा भलाभक्कम दरवाजा कसातरी लोटला आणि चावी घेऊन खोलीकडे निघालो. ओट्यावरच्या लाउंजवर आल्यावर वाटले, येथेच पडावे; आणि तेथल्याच एका खुर्चीवर टेकलो. पाचदहा मिनिटांत आपल्याला आराम वाटत आहे, आणि शरीरावरचा ताण ओसरत आहे असे वाटू लागले.

दहावीस मिनिटांत अगदी ताजातवाना झालो. शरीरात एक प्रकारचा मोकळेपणा आला. वृत्ती हलकीफुलकी झालीसे वाटले. नकळतच आजूबाजूचे निरीक्षण करू लागलो. लाउंजमधल्या खुर्च्यांवर लवंडलेल्या व्यक्तींकडे पाहू लागलो. त्यातल्या काही स्वतःशीच मग्न होत्या. काही गप्पा मारीत होत्या. काही माझ्यासारखेच इतरांच्या हालचालींचे निरीक्षण करीत होत्या. पण प्रत्येकीच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा निश्चिंत आराम, मोकळेपणा दिसत होता. प्रत्येकीच्या वागण्याबोलण्यात, बसण्यात, नुसते पाहण्यातसुद्धा एक प्रकारचा सहजपणा, एक प्रकारची नैसर्गिकता, निरामयता, मुक्ती जाणवत होती.

मानवातल्या या दुर्मिळ विशेषाचा असा अनुभव मला पूर्वी कधीच कोणत्या हॉटेलच्या लाउंजमध्ये आला नव्हता.

मी विचार करू लागलो, या लाउंजची ही जादू आली कोठून ?

इतक्यात माझे लक्ष उजवीकडच्या कोपऱ्यात गेले. तेथे बागेतून येणाऱ्या हिरव्या प्रकाशाच्या छटा लाउंजमधल्या प्रकाशात, ढगात धुके विरावे तशा विरत होत्या.

माझ्या प्रश्नाचे उत्तर मिळाले. या लाउंजमधली ही आरामाची जादू त्यातल्या प्रकाशात आहे या मंद मंद प्रकाशात, तुमच्या आत्म्याला भिडण्याची, तुमच्या मनावर हळुवार फुंकर घालण्याची, तुमच्या शरीराला रेशमी स्पर्श करण्याची शक्ती आहे.

इम्पीरिअल हॉटेलमध्ये तुम्ही प्रवेश करता तो एका धुळकट, भडक, उजाड जगातून श्रांत, शांत, विश्रब्ध जगात. प्रकाशाची जादू वापरून राइटनी हे जग निर्माण केले आहे. त्यासाठी त्यांनी येथल्या प्रकाशाला मोठे मऊ मुलायम कंगोरे पाडले आहेत. इम्पीरिअलमध्ये तुमचे पहिले पाऊल पडते ते एका लांब

रुंद पडवीत – आणि ते पडल्याबरोबर प्रकाशाच्या परिवर्तनाचा पहिला प्रत्यय तुम्हाला येतो. डोळ्यांत सुया टोचणारा प्रकाश आता बाहेर राहतो आणि आतला प्रकाश डोळ्यांवर रेशमी पिसांचा फुलोरा फिरवू लागतो. मग तीनचार पायऱ्या चढून तुम्ही एका ओट्यावर जाता आणि तेथे प्रकाशाचे आणखी एक असे परिवर्तन होते की, तुमचे पाऊल थबकतेच. स्वच्छ सफेद कागदाच्या तावदानांनी बनविलेल्या दारा-खिडक्यांच्या जपानी गृहात नांदणाऱ्या सौम्य कोमल प्रकाशाचा एक मुलायम प्रकारच आता तुमच्या नजरेशी खेळू लागतो.

अवकाशावर ओटीपडवीचे उंचसखल प्रयोग करूनच राइटनी प्रकाशाची ही सूक्ष्म गंमत निर्माण केली आहे. आपल्या कोकणात ओटी-पडवीचा हा प्रयोग प्रत्येक घरात आढळतो – फक्त प्रकाशाच्या परिवर्तनाची आणि वितरणाची सूक्ष्म दृष्टी तेवढीच त्यात नसते.

या ओट्यावरच्या खुर्चीवर तुम्ही लवंडला म्हणजे चांदण्या रात्री विरळ धुके हवेत विरावे तसा हा प्रकाश तुमच्या वृत्तीत विरू लागतो आणि तुमच्या शरीराचा आणि मनाचा सारा थकवा दहापंधरा मिनिटांत उडून जातो.

थकवा उडून जातो. तुम्ही ताजेतवाने होता. आणि तरी तुम्ही शांत मुग्धच राहता. सारे लोक असेच राहतात. म्हणून या लाउंजमध्ये गप्पांचा गलका होत नाही. लोक येथे बोलत नाहीतच, नुसते कुजबुजतात. गोष्टी करीत नाहीत, हितगुज करतात. वादविवादात सापडत नाहीत, सुखसंवादात निमग्न होतात. जीवनाचे प्रश्न सोडविण्याचा खटाटोप करीत नाहीत, जीवनाचा आस्वाद लुटण्याचे बेत करतात! येथे असेच काही वातावरण तयार होते की, नेहमी आरडाओरडा करणारे जपानीसुद्धा येथे हळू आवाजात बोलतात.

राइटनी या लाउंजची, साऱ्या हॉटेलचीच, अशी काही रचना केली आहे की, असे विश्रब्ध वातावरण तयार व्हावे. कारण राइटनी ओळखले की हॉटेल म्हणजे काही चव्हाटा नाही, चावडी नाही, किंवा चहाकॉफीचे दुकानही नाही. हॉटेल म्हणजे मन आणि शरीर यांचा थकवा दूर करण्याची जागा. हॉटेल म्हणजे आराम. हॉटेल म्हणजे गुजगोष्टींचे ठिकाण. येथे मन, शरीर, वृत्ती, मुक्त स्वतंत्र व्हायला हवी. राइटनी प्रकाशाची किमया केली आणि हे श्रांत, शांत, विश्रब्ध ठिकाण निर्माण केले.

* * *

लाउंजमधली ही शांतप्रसन्न वृत्ती तुम्ही त्या कॉरिडॉरमधून खोलीकडे जाऊ लागला म्हणजे तरंगू लागतो.

खोलीतून बाहेर जाताना तुम्ही किरमिजी अंधाराकडून उजेडाकडे जाता. आता तुम्ही उजेडाकडून छायाप्रकाशाच्या आकृतींनी हेलावणाऱ्या आणि हेलावत हेलावत तरल बनलेल्या अस्फुट अंधाराकडे जात असता. जाताजाता त्या अर्ध-अंधारावर तरंगणाऱ्या छायाप्रकाशाच्या आकृतींबरोबर तरंगू लागता. त्यावर डोलत डोलतच तुम्ही खोलीचे दार उघडता. खोलीतल्या प्रकाशाची तिरीप तुमच्या नजरेवर आदळते नि तुम्ही भानावर येता. पण तुम्हाला हे भान, ही जगाची जाणीव, ही बाहेरची ओढणी आता नको असते. म्हणून तुम्ही लगेच खिडकीवरचा पडदा सरकवता, प्रकाश परतवून लावता, जगात ओढणाऱ्या अवकाशाची जाणीवच बुझवून टाकता, आणि अंधाराच्या आवरणात शिरून कसल्या तरी गूढ गूढ रहस्याच्या स्वाधीन होता. मग तुमचे रूपांतर एखाद्या कवीत होते, नाही तर योग्यात तरी होते.

इम्पीरिअलमध्ये राहणाऱ्या पाहुण्यांमध्ये असे परिवर्तन घडविण्याचे राइटच्या मनात होते की नाही मला माहीत नाही. पण मी मात्र जेव्हा जेव्हा बाहेरून खोलीत आलो तेव्हा तेव्हा बाहेरचे जंजाळ पार दूर राहिले आहे, आणि आपला एका शांत, निरामय जगात प्रवेश झाला आहे असा प्रत्यय मला आला. असा प्रत्यय जपानी चहागृहात येतो. असा प्रत्यय यावा, जगाच्या जंजाळाचा विसर पडून माणसाचे मन घटका दोन घटका तरी शांतीच्या, समाधानाच्या, तृप्तीच्या आणि चिंतनाच्या स्वाधीन व्हावे, म्हणून जपानी साधकांनी चहागृहाची योजना केली आहे. हे चहागृह जगाच्या रहदारीपासून अगदी दूर दूर अशा एखाद्या शांत-निवांत ठिकाणी असते. कोठल्या तरी अगदी अलिप्त बागेत त्याची योजना असते. त्याच्याकडे जाताजाताच तुमची वृत्ती बदलू लागते. त्याच्याकडे जाणारा रस्ताच तुमच्यात बदल घडवू लागतो. तो एखाद्या शांत निभ्रान्त बागेतून जातो. तळ्यातून जातो. पाणी ओलांडतो. वेलीवनश्रीच्या पलीकडे नेतो, आणि शांतीची साधना व आत्म्याची आराधना यांना योग्य अशा एखाद्या झोपडीत नेऊन तुम्हांला सोडतो. चहाच्या निमित्ताने तुम्ही या झोपडीत येता, पण तेथे तुम्ही खरोखरच चहा पीत नाही, चहाच्या रूपाने शांती आणि साधना यांचाच आस्वाद घेता.

इम्पीरिअलचा जपानी आत्मा तो हाच असेल. अर्थात राइट तुम्हाला जगाच्या रहदारीपासून दूर नेत नाहीत. बागा आणि तळी ओलांडायला लावीत नाहीत. एखाद्या छोट्या संकुचित झोपडीत बंद करीत नाहीत. पण ते तुम्हाला जगाच्या गोंधळ-गडबडीपासून खास दूर करतात. एक प्रकारच्या अलिप्त, निवांत वातावरणात नक्की आणून सोडतात. कवी किंवा योगी यांना मानवेल अशा ठिकाणी अवश्य नेतात. आता तुम्हाला प्रतिभेचा साक्षात्कार अगर आत्म्याचे दर्शन होईल की नाही हे ते सांगू शकणार नाहीत. पण तुम्हाला शांती लाभेल, विश्रांती लाभेल, एवढी ग्वाही ते नक्की देतात.

किमान पक्षी तुम्हाला रात्री चांगली आरामशीर झोप लागेल. निदान मला तशी लागली. त्या पहिल्या रात्रीच्या त्रस्त अनुभवानंतर निद्रानाशाने मला मुळीच सतावले नाही -- अगदी नाही, पासीनचे टोकिओच्या हवेबद्दलचे भविष्य साफ चुकले तरी नाही.



# कि
# ओ
# टो

कि ओटोला मी आगगाडीने गेलो. पण किओटोचा हा प्रवास, सुरुवातीला तरी, मी रस्त्यानेच करणार आहे – जपानच्या प्रसिद्ध तोकायडो रस्त्याने. याचे कारण दुसरेतिसरे काही नाही. हा रस्ता मला फार आवडतो. जपानच्या माझ्या कितीतरी आठवणी या रस्त्याशी निगडित आहेत. या रस्त्याची कितीतरी दृश्ये माझ्या नजरेसमोर नाचत आहेत.

'योशिडाज् फॉली' (योशिडाचा मूर्खपणा) म्हणून टीकाकारांनी प्रथम ताडलेला पण जकातीचे भरपूर उत्पन्न देऊन या टीकाकारांची तोंडे बंद करणारा या रस्त्याचा एक तुकडा, जपानच्या भयंकर रस्त्यांना असलेला एकच एक

अपवाद म्हणून, माझ्या चांगला लक्षात राहिला आहे. योकोहामातल्या एका बळगावरच्या, अंगाऱ्याधुपाऱ्याने पूजलेल्या, बाहुल्याने मला जपानच्या नवसाळ प्रकृतीची ओळख प्रथम याच रस्त्यावर करून दिली. केटेल उपाहारगृहासमोरच्या एका विनोदी पुतळयाने, या उपाहारगृहाचा जर्मन मालक प्रथम पहिल्या महायुद्धात कसा पकडला गेला आणि नंतर एका जपानी रमणीने त्याला कसे घट्ट पकडून ठेवले, याची हकीगत या रस्त्यावरच सांगितली, आणि हर्न, मॉर्गन प्रभृतींच्या तत्सम कथांची आठवण करून दिली. ओडोवाराच्या रस्त्यात मधोमध वाढलेल्या एका चिडाच्या झाडाने, अतामीच्या त्या चिडाप्रमाणे आपणही साहित्यिकांचे लक्ष वेधून घेतले आहे, असे या रस्त्यावरच सांगितले. या रस्त्यानेच, डोंगरावर चढून, जपानच्या पासिफिक किनाऱ्याचे खडकाळ कातळ खालच्या खिदळणाऱ्या लाटांकडे ओढाळ नजरेने कसे पाहतात ते दाखविले, आणि खोऱ्यात उतरून, जपानी शेतकरी अवखळ नदीच्या काठी कशी संथ शेती करतो आणि दिसण्यात गरीब पण कारागिरीत मातबर झोपड्या कशा बांधतो, याचे दर्शन घडविले; आणि मग, हाकोनेच्या डोंगराळ भागात शिरून, जपानचे उन्हाळी झरे उसळले म्हणजे सारे वातावरण गंधकाच्या दर्पाने कसे भरून टाकतात हे पटवून दिले.

पण या रस्त्यावरच्या माझ्या लोभाची ही नुसती मामुली कारणे आहेत. अधिक जबरदस्त कारणांचा जपानच्या इतिहासाशी आणि कलानिर्मितीशी संबंध आहे. इतिहास तोकुगावा शोगनांचा आहे आणि कलानिर्मिती हिरोशिगेची आहे. तोकुगावांनी जपानवर सत्ता हस्तगत करून राजधानी एडोला ( म्हणजे सध्याच्या टोकिओला ) आणली, तेव्हा बंड करायला टपलेल्या सरदारांना त्यांनी असे फर्माविले की, तुम्ही एडोला येऊन राहिले पाहिजे आणि एडो सोडून जायचे असेल तेव्हा आपली बायकापोरे ओलीस ठेवली पाहिजेत. या हुकुमाचे ताबेदार या रस्त्यावरून गड सासवड करीत, तेव्हा त्यांच्या तप्त मस्तकांना छाया पुरविण्यासाठी तोकुगावांनी या रस्त्याच्या कडेने जी झाडे लावली ती अद्याप उभी आहेत आणि आपल्या पिळवटलेल्या पेडांनी आणि वटलेल्या गाठींनी शोगनांच्या मनस्वी कारभाराचे वर्णन करीत आहेत. तोकुगावाच्या एका जासुदाबरोबर किओटोला गेलेल्या हिरोशिगेला या रस्त्याने इतके भारले की, त्याच्या अनेक दृश्यांना त्याने रंगरेखेत जखडून टाकले. या रस्त्याने मी जेव्हा जेव्हा गेलो तेव्हा तेव्हा तोकुगावाचा

तो इतिहास या झाडांतून सळसळला आणि हिरोशिगेच्या कलेची रंगत ठिक-ठिकाणच्या दृश्यांत उमटली.

टोकिओहून किओटोला जाणे म्हणजे थोडेसे इतिहासातच प्रवेश करणे आहे. किंवा नव्या जगातून जुन्या जगात पाऊल टाकण्यासारखे आहे. हे नुसते नद्याखोरी ओलांडणारे भौगोलिक स्थलांतर नव्हे, तर ते अधिक खोल आशयाचे सांस्कृतिक स्थलांतर आहे. तुम्ही किओटोत शिरता म्हणजे एका निराळ्याच जगात शिरता. या जगाचे रीतनियम निराळे, ठोकताळे निराळे आणि मोजपट्ट्याही निराळ्या. पाश्चात्य जगाच्या नव्या नवलाईपासून परंपरागत जपानीपणाच्या जुन्या अभिमाना-पर्यंतची ही मजल आहे. राजकारणाच्या धुरळ्याकडून चहापानाच्या निःशब्द चिंतनाकडे, निऑन लाईट्सच्या झगझगाटाकडून धूसर सावल्यांच्या मंद विलासाकडे, कालव्यातल्या केरकचऱ्याकडून नदीच्या पात्रात वाळत घातलेल्या चित्रसुंदर कापडांकडे, कारखान्यांच्या चिमण्यांकडून पागोड्यांच्या कळसांकडे, डोक्यात सणक उठविणाऱ्या राहत्या पिंजऱ्याकडून नजरेला वेड लावणाऱ्या वास्तूकडे, पुलाखाली बूट साफ करताना अचकटविचकट बोलणाऱ्या गटार-भटाऱ्यांकडून डोक्यावर मोळी आणि अंगावर चित्रमय पोशाख धारण करून हसऱ्या निरागस नजरेने नुसते पाहात राहणाऱ्या रानवट पोरींकडे – ही या स्थलांतरांची काही निवडक लक्षणे आहेत.

गिंझा हे टोकिओचे प्रतीक मानले तर जिऑन हे किओटोचे प्रतीक मानावे लागेल. रस्त्यातल्या कर्कश गलक्याने टोकिओचे कान किटतात, तर देवळातल्या मंत्रजागराने किओटोचे कान ताजेतवाने होतात. सुमोच्या अगर बेसबॉलच्या सामन्यांनी टोकिओचा जीव उडतो, तर महोत्सवातल्या मिरवणुकींनी किओटोचे चित्त बेभान बनते. टोकिओतला गृहस्थ टी. व्ही.च्या पडद्यावर नजर रोखून बसतो, तर किओटोचा पुरुष डोंगरमाथ्यावरचे विरळ धुके नवनवी वस्त्रे विणते ती पाहत बसतो. टोकिओच्या रंगपटावर जिवंत व्यक्तींची वस्त्रे टरकावून त्यांना बाहुल्या बनविण्याचा उद्योग चालतो तर मातीच्या बाहुल्यांना जिवंत माणसाची कळा आणण्यात किओटोला सार्थक वाटते. अणुस्फोटाच्या विखारी राखेने प्राणास मुकलेल्या एका कोळ्यावर एका दमात सातशे कविता लिहून टोकिओ अमेरिकेचे उपकार फेडते, तर आपली खानदानी दौलत वैमानिक माऱ्यापासून वाचविल्याबद्दल किओटो अमेरिकेच्या लँग्डन वॉर्नरचे स्मारक उभारते. टोकिओची ढूम अद्ययावत आहे, तर किओटोच्या चालीत सनातनी लकब आहे.

अर्थात टोकिओची बाधा किओटोला झालेली आहेच. तेथेही पाचिंकोच्या गोष्यांचा आवाज कान किटवितो. तेथेही निऑन लाईटसूच्या सांगाड्यांनी इमारतींचा चेहरा बिघडतो आणि सिनेमाच्या जाहिरातींनी म्होरा लडबडतो. तेथेही दुकानांच्या खिडक्यांत कृत्रिम केसांचे मुकुट दिसतात (आणि हृदयात कळ उठते) आणि जेवणाच्या जाहिरातीचे प्लॅस्टिक पदार्थ दिसतात (आणि तोंडात चोथा जमा होतो.) पण किओटोच्या आधुनिक बाजारातही परंपरेची एक ऐट आहे. तेथे मिठाईची शोभा दिसते ती अभिजात. कुंभकलेचे नमुने येतात ते न्यारे. बाहुल्यांची माया खुलते ती सुरंगी. पुष्परचनेची शोभा फाकते ती तजेली. आणि हस्ताक्षरांचे नमुने आढळतात ते तर हस्तकलेचे कलावंतच! किओटोच्या बाजाराची खरी गंमत आहे ती हमरस्त्यावर नाही, तर गल्ल्यांत. तेथे शिरा आणि पाहा – जपानी खरेदी-विक्रीची सारी रंगत तेथे आढळेल. एखाद्या गल्लीत नुसती पेयगृहेच आढळतील – पण एकेक पेयगृह कसे, तर चहागृहासारखे; फक्त दोनतीन गिऱ्हाइकांना अवकाश; त्यांनी परस्परांशी सलगीने संबंध जोडायचे आणि व्हिस्की, नव्हे साके, प्यायची. एखाद्या गल्लीतल्या दुकानात नुसते कागदाचे नमुने आढळतील – पण हे कागद वर्तमानपत्रातल्या बातम्या छापण्यासाठी नाहीत, तर हस्ताक्षरकलेच्या स्वैर संचारासाठी. एखाद्या गल्लीत नुसती कापडाची टाणे असतील – पण या कापडांवरचे कामोगावाच्या पात्रात खुलविलेले रंग एकेका रमणीच्या अंतरंगात स्वप्नांची नवी सृष्टी फुलवतील.

तरीपण किओटोचा खरा आत्मा दुसरीकडेच दंग आहे. दुसऱ्याच स्वप्नांनी त्याची दृष्टी भारली आहे. दुसऱ्याच गोष्टींनी त्याचे चित्त चोरले आहे. खरे म्हणजे तो आपल्या सांस्कृतिक कलास्वादात दंग आहे. चहापानविधीचा आद्य पंडित सेन–रिक्यू याच्या निःस्पृह कथा ऐकण्यात तो रमला आहे. सांजुसांगेण्डो देवा-लयातल्या धनुर्विद्येच्या एकलव्यतेत तो चूर आहे. या वर्षीचे मियाको–ओडोरी (चेरी–नृत्य) कसे रंगेल याची त्याला चिंता आहे. जिऑन–मात्सुरीच्या (जिऑन–महोत्सवाच्या) मिरवणुकीत रथाच्या वरच्या मजल्यावरून संगीताचे कोणते सूर सोडायचे यांचे बेत तो आखीत आहे. जपानच्या अभिजात पुष्परचनेवरचे (काटक्या, गवत, शेवाळ, दगड आणि लोखंडाचे तुकडे यांनी उभारलेल्या) नवपुष्परचनेचे आक्रमण कसे परतवून लावायचे याच्या फिकिरीत तो आहे. नोह नाटकाचे मशालीचे प्रयोग हेइआन मंदिरात यंदा कसे रंगतील

याची त्याला काळजी आहे. त्याची नजर मारुयामा पार्कमधील चेरींच्या मोहरावर आहे, आराशीयामा पार्कमधील नौकाविहारावर आहे, हिगाशीयामा डोंगरावर उसळलेल्या मेपलपर्णांच्या वार्षिक रंगोत्सवावर आहे.

संध्याकाळ झाली, उजेड सरला, रात्रीच्या छाया पसरल्या की, किओटोच्या आत्म्याची पावले जिऑनच्या दिशेने पडू लागतात. किओटोच्या संस्कारमय जीवनाचा तेथला तो गोड झंकार ऐकायला त्याचे कान आतुर झालेले असतात. जिऑनमध्ये आता अस्फुट अंधारच आहे. कामस्त्र्यांच्या कुंपणामागील घरे बंदच आहेत. त्यांच्या फटीतून येणारा उजेड मंद आहे. त्याने अंधार शहारला आहे. सारे कसे स्तब्ध आहे. एखाद्या घरातून संगीताचा अस्पष्ट स्वर येतो, पण त्याने स्तब्धता थरारलीच आहे. वातावरण मोहरले आहे. किओटोच्या आत्म्याचे अंतःकरण कसल्यातरी अबोध अपेक्षेने आतुर बनते. दृष्टी अंतराळात पाहते, त्याचे पाऊल अधांतरी पडते. वृत्ती कशाने तरी – ज्याचा अर्थ कळत नाही, बोध होत नाही, दिशा समजत नाही, पण जे हवेहवेसे वाटते, ज्याच्याशिवाय मन रिते रिते वाटते अशा कशाने तरी – भरून जाते. या वृत्तीने दृष्टी मोहरते, अंतरंग शहारते, निराशा गोड वाटते, अपेक्षा आतुरते आणि पंचेंद्रिये पार्थिवापलीकडच्या अनुभवाचे कण टिपू लागतात. – आणि मग, एका घराचे दार सरकते, उजेडाची तिरीप बाहेर येते, बंद कवाड उघडते आणि वातावरणाला एकदम सुरंगीच्या कळ्या येतात. कोण ही? – शेवंतीच्या फुलांनी फुललेला किमोनो, जरतारीने झगमगणारी ओबी, तकतकीत केशकलपाचा डौलदार शृंगार, काजळलेले डोळे, फडफडणाऱ्या पापण्या, हातातल्या कागदी कंदिलाच्या उजेडाने उजळलेले अंग, किमोनोच्या लयीत लय मिळवून टाकलेले पाऊल. अशी ही मूर्ती बोलत नाही, बघत नाही, इकडे तिकडे करीत नाही; स्वतःच्या मार्गाने जाते. आपले मन मुग्ध होते. आपली अस्फुट अपेक्षा क्षणभर थबकते, दुसऱ्या क्षणी खुशालते आणि मग नुसतीच हुरहुरते. पण किओटोचा आत्मा ओळखतो. त्याची पावले पडू लागतात. त्या अभिसारिकेच्या मागे जाऊ लागतात.

सकाळी उठा आणि हिगाशीयामाकडे एक नजर टाका. त्याची उन्हाने उजळलेली झाडी पाहा. लगेच तुमचे पाऊल त्या डोंगराच्या दिशेने पडू लागेल. जरा वेळाने पाऊल चढण चढू लागेल. डवरलेल्या झाडीची नवीनवी रूपे नजरेस पडतील. नवनवीन वलये विस्तारू लागतील. हिरव्या रंगाच्या नवनव्या छटा खुलत जातील.

आकाशरेषेची नवनवी दर्शने होत जातील. इतक्यात तुमची वाट जरा वाकडी पाहते. तिच्याबरोबर तुमचेही पाऊल वळते. तुमचीही नजर वळते. वर वर जाते. सुगीच्या शेंड्याचा वेध घेते. खाली पाहते, पायाखालच्या दगडाचे रूप न्याहाळते. बाजूला पाहते, सुगीच्या मोरपंखी नक्षीचा नखरा निरखते. हे सारे करताना स्वतःला विसरते. सभोवारच्या निसर्गाशी एकरूप होऊन जाते. मग भिन्नतेची जाणीवच लोपते. तेथे नांदणाऱ्या विश्रब्ध शांततेत विलीन होऊन जाते. – आणि मग या शांततेत सामावलेल्या तत्त्वाची खोल खोल प्रतीती देते. पायाखालच्या भूमीवर या तत्त्वाचे पाऊल उमटलेले दिसते. सभोवतालच्या वनराजीवर त्याची रूपे रेखलेली दिसतात. आज या रूपाचा रंग हिरवा आहे – पोपटी हिरवा, गडद हिरवा, काळाशार हिरवा. त्यावर क्वचित कोठे हळद पिंजर पसरलेली. उद्या तो लालीलाल होईल. त्यातून ज्वाळा उफाळतील. पण परवा त्याची कळा काळी किडकिडीत होईल. आणि नंतर, काही दिवसांनी, त्यावर हिमाचे पांढरे शुभ्र वस्त्र पसरेल. हे सारे होईल, पण अंतर्यामी ते सारे एकच असेल.

या प्रतीतीने भारलेली नजर सारे काही पाहत असते – आणि काहीच पाहत नाही. इतक्यात तुम्ही टेकडीच्या माथ्यावर येता, सावध होता आणि झाडीच्या बाहेर पाहता. तो समोर एक टेकडी. तुमच्या टेकडीशी काटकोन करून उभी असलेली. तिचा माथाही गर्द झाडीने भरलेला. तुमची नजर तिच्यावर फिरते. तिच्या आकाशरेषेचा वेध घेत जाते – आणि तुमच्या ध्यानात येते की, हिगाशीयामाच्या कुशीत एक सप्तशृंगी शिखर शोभते आहे. तुमची नजर जराशी भिरभिरते, तोच आकाशाचे तत्त्व आपल्या वलयात विलीन करू पाहणाऱ्या पागोड्याचा कळस दिसतो. आणि मग नजर ते शिखर, तो कळस आणि तो समोरचा माथा, यांच्या दरम्यान घोटाळू लागते. थोडा वेळ तरळते आणि जाणवते की, हे सप्तशृंगी शिखर, हा आकाशगामी कळस आणि हा समोरचा सहस्रशृंगी माथा, यांच्यात एक विलक्षण संगती आहे. डोंगरावरच्या वनराजीला देवळाच्या शिखराने शोभा आली आहे. देवळाचे शिखर पत्रीने वेढलेल्या मूर्तीसारखे भासते आहे – आणि हे अपूर्व मीलन पाहून पागोडा स्तब्ध, स्तिमित झाला आहे. आपले अंतःकरण प्रार्थनेने भरून जाते, प्रार्थनामय होते.

असे प्रार्थनामय होण्यासाठीच किओटोच्या देवळांत आणि मंदिरांत जायचे असते. तुम्ही चिऑन-इन देवालयात जाता नि असेच प्रार्थनामय होता. तुमची मार्गदर्शिका तुम्हाला सांगत असते की, या देवालयाचे प्रवेशद्वार साऱ्या जपानात भव्य आहे. ती असेही सांगते की, या देवळात जी घंटा आहे ना, तेवढी घंटा उभ्या देशात दुसरी नाही. आणि ती तुमच्या ध्यानात आणून देण्यासाठी धडपडते की, येथल्या सोन्याच्या फळ्यांवरून चालताना तुमच्या पदाघाताने बुलबुलाचे स्वर निर्माण होतात. पण त्या दरवाज्याने तुमची नजर विस्फारत नाही. ती घंटा तुम्हाला थक्क करू शकत नाही. आणि बुलबुलाचे गाणे तुम्हाला ऐकू येतच नाही. तुमची नजर भारली जाते ती देवळाच्या विशाल आवाराने आणि तुमचे चित्त स्तब्ध होते ते आवारातल्या गर्द झाडीने – खरे म्हणजे तिच्या विस्तारात सामावलेल्या वातावरणाने. त्याने तुमचे मन पावन होते, पवित्र होते.

असे पावन होण्यासाठी, असे प्रार्थनामय बनण्यासाठी कियोमिझु देवालयात जा. कियोमिझु हिगाशीयामाच्या अगदी कुशीत आहे. एखाद्या पाखराने आपल्या पिलांना पंखाखाली घ्यावे तसे हिगाशीयामाने कियोमिझुला घेतले आहे. त्याच्याकडे जाताना प्रथम तुमची थोडीशी निराशाच होते. कारण तुमची वाट भर बाजारातून जाते, बाजाराच्या गर्दीत अडमडते. नंतर ती साफ होते, पण सिमिटाने बांधून काढलेली असते. अशी वाट तुम्हाला नको असते. तिच्यावर दगड माती रेती नसते. तुमच्या पावलाखाली दगडागोट्यांचा आवाज निघत नाही. तुमच्या अंगावर एखादी डहाळी झेलली जात नाही. एखादे पान तुमच्या डोक्यावर अलगद उतरत नाही. फक्त देवळामागचा डोंगर आपले वनराजीने शृंगारलेले हात उभारून उभा असतो, आणि तोच तुमचा आधार असतो. पण एकदा तुम्ही वर पोचला, देवळा-समोरच्या लाकडी कट्ट्यावर उभे राहिला, मागे वळून चांदई छपरांनी शोभलेल्या वास्तूचे दर्शन घेतले, त्याच्या मागे डोलणाऱ्या शेंड्यांची टीप घेतली, निसर्गाने दुतर्फा सोडलेल्या पडद्यांची शोभा न्याहाळलीत, खालच्या खोऱ्यात पसरलेल्या मेघपर्णावर नजर टाकलीत, आणि समोर जरा दूर असलेल्या किओटो शहराच्या भव्य विस्तारावरून नजर फिरवलीत, की मघाची निराशा कोठच्या कोठे पळते आणि मन शांत, तुष्ट, संतुष्ट होते. स्तब्ध होते. जरा वेळ मुळीच चाळवत नाही. पण मग नजर कट्ट्याखालच्या लाकूडकामावर खिळते आणि माणसाने

येथे निसर्गाच्या सान्निध्यात केवढे कसब दाखविले आहे याचा बोध होतो. या कट्टयाला आधार देताना जपानी कारागिरांनी आडवे उभे खांब आणि वारे यांचा कसा अजब सांगाडा रचला आहे ते ध्यानात येते, आणि तो तयार करताना त्यांनी निसर्गावर मात करण्यापेक्षा निसर्गाशी संधान बांधण्याची दृष्टी कशी वापरली आहे याची साक्ष पटते. निसर्गाची किमया आणि मानवाची कामगिरी यांची ही निर्मळ संगती पाहून निसर्ग आणि मानव यांच्या युतीची एक नवीनच प्रतीती येते.

निक्कोच्या तोशोगू मंदिरात ही दृष्टी नाही, म्हणूनच तेथली कारागिरी अंगावर येते. तेथे निसर्गाशी स्नेह संपादण्याची बुद्धी नाही तर निसर्गावर मात करण्याची, त्याला चकित करून सोडण्याची, बुद्धी आहे. परिणामी अलंकारांची उधळपट्टी करणारे, रंगरंगोटीने लडबडलेले आणि ऐश्वर्याच्या दिमाखाने मस्तवाल बनलेले एक मंदिर जन्माला आले. येथे सौंदर्य किती निर्माण झाले हे कोणी सांगत नाही, सोने किती खर्च झाले हे सांगते. कोरीव कामाची लेणी किती अवतरली याची कोणाला फिकीर नाही, लाकूड किती खंडी लागले याचा हिशेब सादर होतो. कलेचा कसा, किती विलास झाला इकडे कोणाचे लक्षच नाही, लाखेने लाकडावर कशी मात केली याचेच कौतुक होते. वास्तविक निक्कोच्या निसर्गापुढे तोशोगूच्या निर्मात्यांनी थोडे विनम्र व्हायला हवे होते. येथला निसर्ग म्हणजे जादूगार आहे. त्याने एकाहून एक सरस अशी आश्चर्ये प्रकट केली आहेत. येथे नद्यांचे आणि निर्झरांचे निरनिराळे प्रयोग सुरू आहेत. डोंगरमाथ्याचा वेगवेगळा डौल आहे. वनश्रीचा वेगवेगळा शृंगार आहे. येथल्या देया नदीला साधे सरळ वाहायचे ठाऊकच नाही. ती एकदा सरोवराचे रूप घेते तर एकदा धबधब्याचे. सरोवरामागून सरोवरे आणि धबधब्यामागून धबधबे. त्यांचा आवाज घुमतो, पण लगेच सरोवराच्या संथ जलाशयात विरून जातो. – विरतो, पण पुन्हा उठतो. नान्ताय् पर्वत तर, सिंहीण आपली पिल्ले सभोवार खेळवीत बसते तसा आजूबाजूच्या डोंगरांची शिखरे खेळवीत बसला आहे – आणि त्यांची छबीदार गंमत सरोवरांच्या पाण्यांनी आपल्या अंगावर धारण केली आहे. या सरोवरात या डोंगराची आणि डोंगरांवरच्या वनश्रीचीच शोभा खुलते असे नाही. ठिकठिकाणी वर आलेल्या बेटांची आणि बेटांवरच्या देखाव्यांचीही शोभा खुलते. असा हा निसर्ग येथे अनेक रूपांनी अवतरला आहे. त्याच्या जादूगिरीपुढे मानवाने वस्तुतः लीन व्हायचे, पण तोकुगावा इएमित्सूने मानवाच्या

मंदिर अलीकडचे, गेल्या शतकाच्या अखेरीस बांधलेले, नसते तर एवढाही हव्यास त्याने धरला नसता.

अभिजात शिंटो मंदिर साध्या शाकारलेल्या छपराचे असते. म्हणजे दरिद्री नव्हे. हिनोकी सालीचा शाकार भारी महाग असतो. लाकूडही चांगले किमती



आणि वास्तुकला समृद्ध. पुजाऱ्यांचे आणि नर्तिकांचे पोशाखही रंगदार आणि ऐटबाज असतात. पण त्यात श्रीमंतीचे प्रदर्शन नाही. दिखाऊपणा नाही. तोरा नाही. शिंटो मंदिराच्या वैभवाचा खरा पट उघडत जातो, तोरीखालून जाणाऱ्या लांबलचक रस्त्याने. एका तोरीखालून नाही, तर कधी कधी तीन, चार, पाच तोरींखालून – मैलमैल अंतरावरच्या तोरींखालून. कधीकधी हा रस्ता जातो तो थेट समुद्रात उतरतो. कामाकुराच्या हाचिमान मंदिराची पहिली तोरी

अहंकाराला निमंत्रण दिले. यातून ऐश्वर्याचे खूप प्रदर्शन झाले. मोकाट प्रदर्शन झाले. पण कला कोठे हरवून बसली तिचा पत्ताच नाही.

किओटोच्या माथी असले वैभव कोणी मारले नाही असे नव्हे. हिदेयोशीने आपल्या निजो वाड्यातल्या दरबारी दिवाणखान्यात वैभवाचे असेच प्रदर्शन मांडले. आजही ते निशी होंगांजी देवालयात दिसेल. पण किओटोला त्याची आवड नाही. त्याचा अभिमानही नाही. किओटोचा अभिमान कात्सुरा बंगल्यासारख्या बंगल्यात गोळा झाला आहे. म्हणजे किओटोने अगदी संन्यास घेतला आहे असे नव्हे. ऐश्वर्य, भव्यता, त्यालाही हवी आहे; पण त्याचे असे ओंगळ प्रदर्शन त्याला मान्य नाही. ऐश्वर्य हवे, भव्यता हवी, पण त्याचे दर्शन अभिरुचिसंपन्न असावे. हेइआन मंदिराच्या तोरीत तुम्हाला हे सुरुचिर दर्शन होईल. एक साधी आकृती. सलग शुद्ध रेषेची. रस्त्याच्या दोन बाजूंना दोन खांब, साधे सरळ वाटोळे. त्यांना वर टोकांना दोन आडव्या बारांनी जोडलेले. बारे चपटी, पण साधी. पैकी वरचे जोडबार. त्याची टोके किंचित वर झुकलेली. आणि रंग तकतकीत शेंदरी. बस्स् एवढेच, अधिक कारागिरी नाही. एकंदर आकृती भव्य, विशाल. एकेक खांब प्रचंड – वावेत मावणार नाही असा. वरची बारेही भक्कम. पण सारी आकृती अशी प्रमाणशीर की बोजडपणाचा भास नाही.

तोरी म्हणजे शिंटो मंदिराचे प्रवेशद्वार. पण हे हेइआन मंदिर दिसतच नाही. तोरीखालून जाणारा रस्ता समोर दूरवर जातो आहे. इतर रस्त्यांप्रमाणे माणसांनी, वाहनांनी गजबजलेला आहे. कडेने घरे, बंगले, आवारे आहेत. पण तोरी तुम्हाला बोलावते. तोरीखालून पलीकडे गेलात म्हणजे मंदिराचे प्रथम दर्शन होते. मंदिराचे म्हणजे आवाराच्या प्रवेशद्वाराचे. जवळ नाही, दूर. मध्ये एक प्रचंड मैदान आणि मैदानाच्या बाजूने सुरुचे उंच उंच वृक्ष. मैदानभर रेती पसरलेली. तुम्ही चालत राहता आणि पायाखाली रेती चुरचुरते. अखेरीस तुम्ही त्या प्रवेशद्वारापाशी पोचता. प्रवेशद्वार म्हणजे मुक्तद्वार. तुम्ही आत जाता आणि पाहता तर मंदिराचे अंगण म्हणजे जवळजवळ मैदानच. अंगणापलीकडचे मंदिर आपले दोन हात दोन बाजूंना पसरून एक प्रकारच्या आत्मगत प्रतिष्ठेने उभे आहे. मंदिर तसे साधेच, पण दोन बाजूंच्या दुमजली पाखांवर मात्र आलंकारिक छपरांचे मुकुट आहेत. शेंदरी इमारतीवरचे हे लाल मुकुट शोभतात छान, पण

मंदिर अलीकडचे, गेल्या शतकाच्या अखेरीस बांधलेले, नसते तर एवढाही हव्यास त्याने धरला नसता.

अभिजात शिंटो मंदिर साध्या शाकारलेल्या छपराचे असते. म्हणजे दरिद्री नव्हे. हिनोकी सालीचा शाकार भारी महाग असतो. लाकूडही चांगले किमती



आणि वास्तुकला समृद्ध. पुजाऱ्यांचे आणि नर्तिकांचे पोशाखही रंगदार आणि ऐटबाज असतात. पण त्यात श्रीमंतीचे प्रदर्शन नाही. दिखाऊपणा नाही. तोरा नाही. शिंटो मंदिराच्या वैभवाचा खरा पट उघडत जातो, तोरींखालून जाणाऱ्या लांबलचक रस्त्याने. एका तोरींखालून नाही, तर कधी कधी तीन, चार, पाच तोरींखालून – मैलमैल अंतरावरच्या तोरींखालून. कधीकधी हा रस्ता जातो तो थेट समुद्रात उतरतो. कामाकुराच्या हाचिमान मंदिराची पहिली तोरी

एकदा समुद्रात होती. निक्कोच्या सरोवरात एक तोरी आहे – आणि ती किती शोभते! तोशोगू मंदिराच्या मिजाशीकडे कुर्‍र्यांने पाहत शोभते!

शिंटो मंदिराचे आणखी एक वैभव असते. अलौकिक वैभव. केवळ निसर्गाच्या साधनेतून संपादिलेले वैभव. सुगीच्या वृक्षाचे वैभव! शिंटो हा जात्याच निसर्गाचा पूजक आहे. निसर्गाच्या चमत्कृतीचे स्तवन करण्यासाठी तो जन्माला आला. अनेक शिंटो मंदिरांच्या रस्त्यांवर सुगीचे वृक्ष मानकऱ्याच्या मिजाशीने उभे असतात. त्यांच्या उंचउंच विस्ताराने हे रस्ते शोभलेले असतात. त्यांच्या छाया-दार सावलीने ते प्रसन्न बनलेले असतात. नाराच्या कासुगा मंदिराच्या रस्त्यावर असे वृक्ष आहेत. इसे मंदिराच्या सभोवार त्याचे एक डेरेदार दलच आहे. तोशोगू मंदिराचे रस्तेही या डौलदार वृक्षांनी झुलत आहेत. खरोखर त्यांनीच त्या मंदिराची अब्रू राखली आहे. इएमित्सूला ती दृष्टी होती म्हणून नव्हे, तर या मंदिराच्या उभारणीस हातभार लावण्याचा हुकूम झालेल्या सरदारांनी सुगीचे वृक्ष लावण्याचा सोपा आणि सस्ता मार्ग शोधून काढला म्हणून!

किओटोला या असल्या वैभवाची आवड आहे, कारण त्यात नैसर्गिकता आहे. किओटोची अभिरुची निसर्गावर पोसलेली आहे. तिला कृत्रिम उपाधी सहन होत नाही. नैसर्गिकता ही त्याच्या कलास्वादाची आणि विधिसंकेतांची प्रकृती आहे. सेन-रिक्यूच्या एका शिष्याने त्याच्या चहा-गृहाची बाग झाडून लख्ख करून ठेवली, तेव्हा या निसर्गोपासक पंडिताने बागेच्या लख्ख रस्त्यावर झाडाची चारदोन पाने अलगद ठेवून दिली. टीकाकारांनी टोकिओच्या इम्पीरि-अल हॉटेलमध्ये फार काळोख आहे अशी तक्रार केली, तेव्हा कादंबरीकार तानीझाकी यांनी अंधाराच्या छायांचे एक स्तोत्रच म्हटले. पावसाच्या धारांनी हिगाशीयामावरील वनश्रीचे सौंदर्य आच्छादून टाकले आहे अशी मी तक्रार केली, तेव्हा किओटोच्या एका लेखकाने, आम्हाला असले मंदधूसर सौंदर्यच आवडते असे स्वच्छ सांगितले. किओटोला प्रकाशाचा लखलखाट मान्य नाही, छायांचा मंद विलासच आवडतो. सौंदर्याचा दिमाख पसंत नाही, सौंदर्याची लीनता, शालीनता पसंत आहे. संस्कृत कवींनी स्त्रीची लतेबरोबर केलेली तुलना किओटोला एकदम मान्य आहे. स्त्रीसौंदर्याची शालीनता, विनय-शीलता, समर्पितता यांचा त्याने मुद्दाम परिपोष केला आहे. किओटोला एकदा,

पाच मिनिटांपूर्वी आमच्याशी सुंदर इंग्रजीत भाषण करणारी एका प्राध्यापकाची पत्नी, एकदम दरवाजापाशी जाऊन, आम्हाला कष्ट पडू नयेत म्हणून, आमच्या बुटांची टोके बाहेरच्या दिशेला करू लागली तेव्हा आम्हाला कसेसेच वाटले, आणि आम्ही काही तरी म्हणालो. तेव्हा प्राध्यापकांनी विचारले, " तुम्हांला आमच्या जपानमध्ये विशेष काय आवडले ? " क्षणभर स्तब्ध राहून मी उत्तरलो, " स्त्रियांची चारुता." "ठीक," प्राध्यापक उत्तरले, " तुमच्या बुटांची टोके फिरवून ठेवण्यास ज्या शिस्तीने त्यांना शिकविले तिनेच ही चारुता निर्माण केली आहे."

ही किओटोची दृष्टी आहे आणि तिची उभारणी निसर्गावर झालेली आहे. चारुता हाच स्त्रीचा सर्वश्रेष्ठ नैसर्गिक गुण आहे. हेच तिचे मोठे वैभव आहे. पुरुष कितीही शिकलासवरला, सुधारला; शिक्षणाच्या, सुधारण्याच्या टाकीने त्याच्या बुद्धीला कंगोरे पडून त्याने स्त्रीला कितीही शिकविले, सुधारले, पंडिता करून सोडले, तरी तिचे नैसर्गिक मार्दव, लास्य यांचाच त्याला खरा मोह असतो. याच गुणाच्या जोरावर स्त्री त्याला धरून ठेवते. जपानने हे नीट ओळखले आहे आणि नेमक्या याच गुणांचा परिपोष त्याने केला आहे. म्हणून तर जपानी स्त्रीचे आकर्षण इतके जबरदस्त आहे. पण त्यातली खरी दृष्टी नैसर्गिकतेची आहे. किओटोला ही नैसर्गिकता हवी. त्याच्या अभिजात अभिरुचीचे मूळ येथे आहे. ही अभिरुची त्याच्या देवळात आहे, देवळाच्या बगिच्यात आहे, निसर्गाशी एकरूप होऊ पाहणाऱ्या त्याच्या घरात आहे, एकदोनच बांबूंची रोपे कोपऱ्यात लावलेल्या त्याच्या आवारात आहे, आवाराच्या जाळीदार कवाडात आहे, कामट्यांच्या कुंपणात आहे, शुद्ध सरळ सलग पाणरेषेत आहे, छपराच्या वक्र पण स्वच्छ रेषेत आहे. मुख्य म्हणजे घर आणि अंगण, देऊळ आणि बाग यांत नांदणाऱ्या वातावरणात आहे. हे वातावरण किओटोचे वैभव आहे. हे वातावरण नारात नाही. सारी नजर भरून टाकणाऱ्या तोडायजीच्या देवळात नाही. होर्युजी देवळातल्या सुंदर भव्य पागोड्यात नाही, पण या देवळाच्या आवारात डोलणाऱ्या वृक्षांत आहे. हे वातावरण कामाकुराच्या दायबुत्सूत नाही, पण हाचिमान मंदिराच्या पायऱ्यांपाशी उभ्या असलेल्या गिंको वृक्षांत आहे. हे वातावरण निक्कोच्या त्या आलंकारिक उधळपट्टीत नाही, पण त्याच्या तबेल्याच्या इमारतीवरील माकडांच्या (' ऐकू नको, पाहू नको, बोलू नको ') सहजलीला पकडणाऱ्या शिल्पात आहे. किओटोच्या सुवर्णप्रासादाच्या ( किंकाकुजीच्या ) सोनेरी सळसळीतही ते नाही,

# टोकिओ



मला झालेले जपानचे पहिले दर्शन म्हणजे झगमगणाऱ्या रत्नांचा गालिचा, किंवा प्रकाशणाऱ्या फुलांचा गालिचा – म्हणजे खरोखर विद्युद्दीपांच्या उजळत्या केसरांनी विणलेला गालिचा. “ आता काही मिनिटांतच आपण टोकिओच्या हानेडा विमानतळावर उतरू ” असे एअर-होस्टेसने जाहीर केले आणि मी खिडकीबाहेर पाहिले व माझ्या दृष्टीसमोर हा गालिचा उघडला. विमान एका बाजूला कलले की हा गालिचा दृष्टिआड होई, आणि दुसऱ्या बाजूला कलले म्हणजे तो पुन्हा दृष्टिपथात येई. प्रत्येक वेळी त्याचे तेजस्वी स्फुरण वाढलेले असे.

अगदी काटेकोरपणाने बोलायचे तर मनिलाहून येणारे विमान ओकिनावाला थांबले तेव्हाच जपानचे पहिले दर्शन झाले. अंतराळातून ओकिनावाची बेटे दिसली

पण त्याच्या समोरच्या दगडाधोंड्यांनी आणि झाडाझुडपांनी चितारलेल्या तळ्यात त्याचे जे प्रतिबिंब पडते त्यात आहे. सांजुसांगेण्डोच्या सहस्र सहस्रभुज मूर्तींच्या रांगांत नाही, पण त्या रांगांच्या मागच्या दालनात मानवांच्या विकारांचे आणि पंचमहाभूतांच्या आवेगाचे सहजसुंदर दर्शन घडविणाऱ्या शिल्पात आहे. हे वातावरण शिम्बारा आणि जिऑन यांच्या गेशा-गर्भ जगात आहे, कामोगावाच्या पात्रात डोळे भरून पाहणाऱ्या जपानी उपाहारगृहात आहे. हे वातावरण ही किओटोची नस आहे. किओटोचे मोटमोठ्या पुस्तकातले सालंकृत वर्णन म्हणजे काहीच नाही; हे वातावरण म्हणजे सारे काही आहे.

आणि मला ती पूजेच्या तबकासारखी वाटली. किनाऱ्याशी अखंड खेळणाऱ्या लाटांमुळे या तबकांची कडा चकाकली होती. पण ओकिनावावर उतरल्यावर या तबकांचे सौंदर्य कोठे लपले नकळे. रेस्टोरॉंमधल्या मुलीचे गोबरे गाल आणि निमुळते डोळे यांतही जपानच्या सौंदर्याची प्रसादचिन्हे दिसली नाहीत. त्यांच्या चेहऱ्यावर ते नाजुक हास्य नव्हते, आणि आवाजात तो कलदारपणा नव्हता. आणि मग मला पटले की, ओकिनावाची ही बेटे निसर्गाने जपानच्या भूमीवरून टिचकीने उडविली तेव्हा कितीतरी गोष्टी मध्येच सांडल्या.

अर्थात जपानचे पहिले दर्शन म्हणजे हा रत्नजडित गालिचा. त्यावर मधून मधून लाल, हिरव्या, निळ्या, जांभळ्या रंगांची फुलोरी नक्षी होती, आणि ती सुरंगी तेजाने झळाळत होती.

पण त्या तेजाचा लगेच शोध घेण्याइतकी माझी वृत्ती तजेल नव्हती. विमानाच्या प्रवासाने आणि विमानतळावरच्या विधीने मी कावून – कंटाळून गेलो होतो. कसातरी इम्पीरिअल हॉटेलमध्ये आलो आणि बिछान्यावर पसरलो.

* * *

दुसऱ्या दिवशी सकाळी मी शहर पाहण्यास निघालो तेव्हा या मायावती नगरीच्या, काल रात्रीच्या माणिकमोत्यांचा कोठे आढळ होईना. उलट कोणत्याही औद्योगिक शहरात उदंड आढळणाऱ्या बाजारी इमारतींचेच रोखठोक दर्शन होत होते. त्यात एक सामर्थ्याचा रुबाब होता. आत चाललेल्या कार्यक्षम कारभाराचा भपकारा बाहेर येत होता. तो माझे लक्ष थोडे नमवीतही होता. इतक्यात एका इमारतीने माझे लक्ष वेधून घेतले. या इमारतीत एक आधुनिक जोश होता. मी एकदोन पाट्या वाचल्या नि माझ्या ध्यानात आले की, ही 'निकात्सु बिल्डिंग'. लगेच या इमारतीशी निगडित असलेल्या स्थापत्यशास्त्रीय चमत्काराची आठवण झाली. ही बारा मजली इमारत सारीच्या सारी वर बांधली आणि नंतर इंचाइंचाने चार मजले भूमीत रोवली! जपानी स्थापत्यशास्त्राचा हा विक्रम जरा जवळून पाहण्याचा मोह झाला नि मी इमारतीत शिरून जिना उतरलो – आणि माझ्या दृष्टीसमोर एक नवेच विश्व उमलले. व्यापारी सजावटीचे विश्व. इतक्या नवलाईने सजवलेली दुकाने मी पूर्वी पाहिली नव्हती. जपानी कौशल्याने आणि कारागिरीने तयार केलेल्या तऱ्हतऱ्हेच्या वस्तू जपानी सौंदर्यदृष्टीने सजवून टेवल्या

प्रयोगानंतरही ज्याचे मूळ द्रव्य कायम राहिले ते जपानी जीवन येथूनच बांधले गेले. शौर्य आणि शिस्त, सौंदर्य आणि मार्दव, संपत्ती आणि व्यवस्था, व कला आणि दैनंदिन व्यवहार यांची सांगड घालण्याचा प्रयोग येथूनच झाला. पुढे हे कर्तृत्व संपले. नवे युग निर्माण झाले. नव्या शक्तींची उपासना झाली. नव्या विद्येची आराधना झाली. नव्या राजनीतीचा अवलंब झाला. नवी क्षितिजे दिसू लागली. नवे मुलूख पादाक्रांत झाले. नवी सूत्रे हालू लागली – आणि यांतूनच कधी नव्हे ते संकट अगदी आकाशातून उतरले. तरी जो अद्याप उभा आहे, दिमाखाने तळपत आहे तो हा राजवाडा. त्याच्यावर नजर खिळली, आणि एक प्रकारच्या अबोध आकर्षणाने आणि मुग्ध ओढीने मी ते मैदान, ते हिरवेगार विशाल मैदान, आपल्या अंगावर असंख्यांना कौतुकाने खेळवणारे मैदान ओलांडले. केव्हा ओलांडले कळलेच नाही. खंदकाच्या काठी आलो नि जाणीव झाली. पण ती लगेच खंदकाच्या पाण्यात बुडून गेली. हिरवे हिरवे पण स्वच्छ स्वच्छ पाणी, वाऱ्याने उठवलेल्या तरंगांशी खेळणारे पाणी. सभोवारच्या विश्वाच्या प्रतिबिंबाशी सुखसंवाद करणारे पाणी. हंसाची एक जोडी त्यात खेळत होती. मान मुरडून, वेळावून, खेळत होती. मानेचा दिमाख दाखवीत पोहत होती. एक-मेकांकडे वेगाने तरंगत जाऊन, एकमेकांना अडवून, चुकवून, पाण्यावर सरळ रेषांच्या आणि वक्र वेलांट्यांच्या आकृत्या कोरीत होती.

त्या खेळातून भानावर आलो नि ध्यानात आले – अरे! समोर विलक्षण सौंदर्य पसरले आहे. खंदकापलीकडच्या टेकडीचे सौंदर्य, त्यावर पसरलेल्या हिरव्यागार गवताचे सौंदर्य, टेकडीवर उभ्या असलेल्या चिडाच्या वृक्षांचे सौंदर्य. त्यानंतर मी जपानी चीड खूप पाहिले. त्यांच्या पिळवटलेल्या कांडांचे शिल्प, त्यांच्या आकाशावर कोरलेल्या विलक्षण आकृती, त्यांच्या फांद्यांचे चमत्कारिक पेच खूप पाहिले. पण चिडाच्या झाडांचे असे सौंदर्य पुन्हा पाहायला मिळाले नाही. त्यांनी जमिनीशी आणि एकमेकांशी केलेले असे कोन, काटकोन कधी दिसले नाहीत. अशी विक्षिप्त संगती कधी अनुभवली नाही. काही झाडे सरळ उभी तर काही कधी जमिनीकडे तर कधी एकमेकांकडे झुकलेली. काही हात जोडलेली तर काही हात फाकलेली. काही शेंडे जुळवलेली तर काही झिपऱ्या पिंजारलेली – पण सारी मिळून एक विलक्षण आकर्षक पट निर्माण करणारी. या पटावरून दृष्टी वर सरकली आणि तटावर आणि तटावरच्या

लोक आणि शेकडो शाळकरी मुले या मैदानावर जमा झाली होती. त्यांना नेणाऱ्या-आणणाऱ्या बसेस् पलीकडे उभ्या होत्या. काही येत होत्या, काही जात होत्या. रस्त्यावरून शेकडो मोटारींची ये-जा चालू होती. शेकडो लोक जात येत होते. काही राजवाड्याकडे ढुंकूनही पाहत नव्हते. रोज काय पाहणार ? आणि पाहिले तरी किती जाणवणार ? काहींना राजा ही एक अर्थशून्य अडचण असेही वाटत असेल. काहींना, हाउसिंग कार्पोरेशनचे अध्यक्ष हिसाऽकिरा कानो यांच्याप्रमाणे, हा राजवाडा येथून उठवून त्याची पाचशे एकरांची जागा जनतेसाठी मोकळी करावी असेही वाटत असेल. पण इसेला जमणारे पाच लाख लोक आणि राजवाड्यासमोर जमा होणारे पाऊण लाख लोक यांचे काय ? माझ्या शेजारी एक गृहस्थ उभा राहून खंदकाच्या पाण्याकडे पाहत होता. त्याच्या नजरेत या प्रश्नाचे उत्तर मिळते का पाहावे असे मनात आले. पण जपानी माणसाच्या चेहऱ्याइतका अबोलका चेहरा शोधून मिळणार नाही. म्हणून तो विचार सोडला आणि चालू लागलो—

हा राजवाडा जनतेच्या जीवनाचे भावनिक केंद्र असो वा नसो, टोकिओच्या सौंदर्याचे ते केंद्र आहे, याबद्दल कुणाचे दुमत होईल ? जपानी वास्तुशास्त्राने गेल्या दोन हजार वर्षांत जे अनेक चमत्कार केले आहेत, त्यातलाच हा एक आहे. हा पाण्याने भरलेला खंदक, हा चिडाच्या झाडांचा चढता पट, हा गर्द झाडीने शोभणारा तट, आणि समोर पसरलेले हे ऐसपैस मैदान – दिल्लीच्या सेक्रेटरिएटसमोरच्या राजपथाखेरीज इतके डौलदार राजस मैदान मी तरी दुसरे पाहिलेले नाही.

* * *

राजवाड्याकडून डायेटकडे जाणे हे क्रमप्राप्तच आहे. सत्ताच मुळी राजवाड्याकडून डायेटकडे गेली, आणि सत्तेपुढे शहाणपण नाही हे प्रसिद्धच आहे ! म्हणून मुकाट्याने डायेटचा रस्ता सुधारला. पण या रस्त्याने जाण्यात आनंद आहे. रस्ता खंदकाच्या बाजूने जातो, आणि मनोरम वळणे घेतो. उजव्या बाजूला राजवाड्याची नवी दर्शने होतात आणि नवी सौंदर्ये दृष्टिपथात येतात. पण डायेटच्या विचारात गुंगलेले मन, राजवाड्यातून सत्ता डायेटमध्ये कशी गेली, ती जाण्यास राजाची प्रागतिक दृष्टी कशी कारणीभूत झाली, पण त्याने औदार्याने दिलेल्या राज्यघटनेच्या कलमांतील संरक्षणमंत्र्याची नेमणूक लष्करी अधिकाऱ्यांच्या संमतीने झाली पाहिजे या एका कलमाने घोटाळा कसा झाला,

त्या कलमामुळे लष्करी हुकूमशाही कशी माजली, तिचा परिणाम महायुद्धात कसा झाला, आणि महायुद्धातील पराभवामुळे लोकशाही येऊन डायेटला एक नवा अर्थ कसा प्राप्त झाला, याचाच विचार मनात घोळू लागला.

पण डायेटचे दर्शन झाल्याबरोबर हा विचार कोठच्या कोठे पळाला. डायेटची इमारतच तशी आहे. प्रथम दर्शनीच तिचे रूप तुमच्या डोळयात बसते. मेंदूला जबरदस्त धक्का बसतो. टोकिओतली सर्वात उंच इमारत अशी तिची ख्याती आहे. पण ज्या शिखरामुळे तिला ही उंची प्राप्त झाली आहे, त्या शिखरानेच घाण केली आहे. युरोपीअन पद्धतीने बांधलेल्या चौकोनी रूपरेखेच्या या इमारतीवर इजिप्शियन पिरॅमिडचे बरेचसे अनुकरण करणारे हे शिखर नसते तर इमारत साध्या सहज रुबाबाने शोभली असती. पण आहे त्या स्वरूपात मात्र एक वास्तुशास्त्रीय घोडचूक म्हणून ती माझ्या लक्षात राहिली आहे आणि तिचा विसर पडणेही कठीण झाले आहे. दर दोन-चार महिन्यांनी या डायेटमध्ये लोकप्रतिनिधींनी एकमेकांची डोकी फोडल्याची बातमी वर्तमानपत्रांत वाचायला मिळते आणि जपानी डायेटची ती अवजड इमारत नजरेसमोर उभी राहते. त्यापेक्षा हे प्रतिनिधी एक होऊन त्या इमारतीचेच डोके का फोडीत नाहीत? पण त्या इमारतीच्या दर्शनाने त्यांच्या डोक्यात जी सणक उठत असेल तिने हा विधायक विचार अशक्यच होत असेल!

आकासका राजवाडा हा डायेटपासून वेगळा आहे. पण डायेटचाच भाग म्हटला पाहिजे, कारण डायेटचे ग्रंथालय तेथे आहे. पण तो पाहायला जाण्याचे कारण मात्र निराळे आहे. दोन प्रख्यात पाश्चात्य राजवाड्यांचे एकदम अनुकरण करण्याचा त्यात प्रयत्न आहे. त्याचे दर्शन बकिंगहॅम पॅलेससारखे आणि आतली सजावट व्हर्साय पॅलेसच्या धर्तीवर केलेली आहे. यातले एक अनुकरण प्रकरण बिघडवण्यास पुरेसे होते, मग दोनही एकत्र आल्यावर काय झाले असेल याची कल्पनाच करावी. जपानी लोक जात्याच अनुकारक आहेत, तेव्हा तुम्ही अमक्याचे अनुकरण का केलेत हे विचारण्याची सोयच नाही. आणि ज्या ज्या अनुकरणामध्ये त्यांनी आपला आत्मा ओतला तेथे तेथे त्यांनी प्रतिभेचा विलास दाखविला. तेथे तेथे नवा आशय, नवे सौंदर्य प्रतीत झाले. चिनी दरबारात नृत्यगान करणाऱ्या मुलींचे अनुकरण करून त्यांनी आपली गेशा निर्माण केली, पण जपानी गेशा हा जपानी संस्कृतीचा एक रोमांचक अलंकार ठरला. चिनी

इमारतींवरील छपरांचे त्यांनी अनुकरण केले, पण त्या छपरांच्या वक्र वळणात आणि विस्तारात नाजुकपणा ओतून, आणि आपल्या लाकडी चौकटीवर ते अलगद ठेवून देऊन त्यांनी एक नवे वास्तुशिल्प निर्माण केले. चिनी चहाला चहापानविधीची कलाटणी देऊन चहा हे त्यांनी सौंदर्य आणि तत्त्वज्ञान यांचे सांस्कृतिक साधन बनविले. अनुकरणाने आणलेल्या अनेक गोष्टींना जपानी प्रतिभेचा नाजुक स्पर्श करून त्यांनी संस्कृतीच्या एकाहून एक सरस पाकळ्या उकलून दाखविल्या. पण एकोणिसाव्या शतकात पाश्चात्त्य झगमगाटाने त्यांचे डोळे इतके दिपले, आणि पाश्चात्त्यांशी बरोबरी करण्याच्या भरात ते स्वतःला इतके विसरले की, अनुकरणाला जपानी आत्म्याचा स्पर्श करण्याचे भान त्यांना राहिलेच नाही. आणि यातूनच आकासका राजवाड्या-सारख्या चिजा निर्माण झाल्या. टोकिओत पाश्चात्त्य धर्तीच्या बाजारी इमारती खूप आहेत. पण बाजारी इमारतीत कलेची अपेक्षा कोणी करीत नाही. तेथे कला नसली तर दुःख नाही, असली तरी फारसा आनंद नाही. पण इसे मंदिराच्या पूजकांनी राजवाड्याच्या बांधणीत अशी नक्कल उठवावी ? कात्सुरा बंगल्याचे भावंड म्हणून त्यांनी अशी वास्तू सादर करावी ? पण कात्सुराचे स्मरण करण्याचा तो कालच नव्हता. तुम्ही मेजी चित्रशाळेत एक फेरफटका करा. सम्राट मेजींच्या जीवनातील निरनिराळ्या प्रसंगांचे चित्रण करणाऱ्या चित्रांवर नजर टाका. म्हणजे पाश्चात्त्यांच्या अनुकरणात ते किती हरवून गेले होते याची कल्पना येईल. पाश्चात्त्य सेनानीच्या पोषाखात मेजींला पाहून फारसा धक्का बसणार नाही, पण हा सूर्यदेवतेचा वंशज जर्मन बादशहाच्या पोषाखात आणि त्याच्याहीपेक्षा त्याची सम्राज्ञी जर्मन महाराणीच्या पोशाखात पाहून कसेसेच वाटते.

* * *

मारुनोचीच्या व्यापारी इमारती मला आवडल्या नाहीत, पण त्यांच्या अफाट दर्शनाने जपानच्या अफाट व्यापारी व औद्योगिक प्रगतीचा साक्षात्कार झाला. आणि त्यातल्या काही अगदी अलीकडच्या इमारती पाहून तर नवीन युद्धोत्तर वास्तुकलेने इमारतींवरही कला शिंपडायला सुरुवात केली आहे याचा प्रत्यय आला. पण मारुनोचीला गेले की एक इमारत माझे चित्त नेहमी वेधून घेई – ती म्हणजे टोकिओ सेण्ट्रल स्टेशन. ही इमारत फारशी सुंदर आहे असे नव्हे. तिचा लाल रंग तेवढाच लक्षात राहिला आहे. पण टोकिओ सेण्ट्रल-समोर गेले की मनात एक निराळेच वारे उसळते. या स्टेशनमध्ये शेकडो लोक

शिरत असतात, शेकडो लोक बाहेर येत असतात. कारण जपानी लोक सारखे प्रवास करीत असतात. भारतीय लोक पान का खातात, अमेरिकन मुली च्युइंग गम का चघळतात आणि फ्रेंच लोक दारू का पितात ? – काही कारण नाही. तसेच जपान्यांना प्रवास करायला काही कारण लागत नाही, किंवा कोणतेही कारण पुरते. आत्याचे पाय धरले, बापाला चार दिवस झोप आली, मित्राचा वाढदिवस निघाला, चेरीच्या फांदीवर कळी उमलली, मेपलचे पहिले पान पिकले, शाळेला सुटी झाली, कुस्त्यांचा हंगाम आला, हवाईच्या बेसबॉल टीमचे आगमन झाले, कंपनीच्या शाखेच्या रिपोर्ट येण्यास उशीर झाला – कोणतेही निमित्त मिळाले की जपानी माणूस लगेच कपडे चढवून स्टेशनकडे धावतो आणि तिकिटाच्या खिडकीपुढे उभा राहतो. टोकिओ स्टेशनात केव्हाही जा म्हणजे जपानी लोक किती निकराने प्रवास करतात हे दिसून येईल. जो तो फलाटावर पळत असतो. खांद्याला क्यामेरा आणि हातात चामड्याची बॅग घेतलेले पुरुष, अंगात किमोनो व हातात रुमालात गुंडाळलेले बोचके घेतलेल्या स्त्रिया, अंगात स्कर्ट व हातात पर्स व छत्री घेतलेल्या आधुनिक मुली – सारख्या धावत असतात. कोणी गाडी पकडायला, कोणी धावत्या गाडीबरोबर ‘ सायोनारा ’ करायला, कोणी स्टेशनबाहेर लवकर जाऊन ट्रॅम, अगर बस पकडण्याकरिता. या साऱ्या धांदलीत, धावपळीत एकच व्यक्ती धिमी पावले टाकीत फलाटावर फिरत असते, गंभीर मुद्रेने पाहात असते आणि एक प्रकारची प्रतिष्ठा मिरवीत असते. तिचा तो लालट - जांभळट पोशाख, लाल सोनेरी फितीची टोपी, डोळ्यावरचा सोनेरी फ्रेमचा चष्मा – क्षणार्धात तुमच्या ध्यानात येईल की, स्वारी स्वतःवरच खूश आहे. आणि का असू नये ! चाकावर चालणाऱ्या साम्राज्याचा तो एक सूत्रधार आहे. हजारो लोकांच्या हालचालींची जिम्मेदारी त्याच्यावर आहे. टोकिओत येणाऱ्या, टोकिओतून जाणाऱ्या, इतकेच काय पण टोकिओतच वावरणाऱ्या लोकांच्या कल्याणाची काळजी तो करीत असतो. त्याची आगगाडी नसती तर यांचे कसे चालेल ? होक्कायडोहून येणारे दूधदुभते, आओमोरीहून येणारी सफरचंदे, शिझुओकाहून येणारी नारिंगे, किओटोहून येणारी कापडे, बोसोहून येणारे मासे, नाहीतर त्यांना कसे मिळतील ? याची फिकीर करीत तो स्टेशनभर फिरत असतो. जपानी जनतेप्रमाणेच टोकिओच्या या स्टेशनमास्तरला जपानी आगगाड्यांचा खूप अभिमान आहे. तो तुम्हांला सांगेल की, जपानच्या गाड्यांसारख्या गाड्या तुम्हांला जगात मिळणार नाहीत. जपानात असताना

मोटारने अगर बसने प्रवास करण्याचा विचार तुम्ही मनातही आणू नका. येथले रस्ते फार खराब आहेत. तुमची गाडी केव्हा मोडून पडेल याचा नेम नाही. पण आमची आगगाडी ? कधी मिनिटभर लेट झाली तर मला विचारा.

* * *

राजवाड्याप्रमाणे जपानचे आणखीही एक केंद्र टोकिओत आहे – निहोम्बाशी पूल. जपानातल्या साऱ्या रस्त्यांची सुरुवात येथे होते, म्हणजे त्यांची लांबी येथून मोजली जाते. टोकिओ शहराच्या सुरुवातीपासूनच त्याला ही प्रतिष्ठा प्राप्त झालेली आहे. आणि हिरोशिगेने या प्रतिष्ठेवर कलेचा साज चढविला आहे. तो पूल पाहायला जाताना या पुलाची हिरोशिगेने काढलेली छापचित्रेच माझ्या नजरेसमोर तरळत होती. त्या पुलाचे करकरीत लाकूडकाम, पुलाच्या कमानीचे नक्षीबाज कोरीव काम, पुलावरून जाणाऱ्या रंगदार लोकांच्या डोक्यावरच्या रंगदार छत्र्या, काहीच्या खांद्यावर डुलणाऱ्या–डुचमळणाऱ्या कावडी, कमरेच्या दोन बाजूच्या दोन तरवारी मिरवीत जाणारे सामुराई, पुलाच्या कडेला काही तरी शोधीत असणारी श्वाने, नदीपलीकडच्या टुमदार झोपड्या, आणि मुख्य म्हणजे मागे दूर डोक्यावर हिमाचा लेप घालून बसलेला फुजीसान, ही दृश्ये नजरेसमोरून सरकत होती. पण मी निहोम्बाशीवर आलो नि माझी निराशा झाली. जेथे इएयोशीने प्रथम उभारला नेमका त्याच ठिकाणी आज साडेतीनशे वर्षांनंतर हा पूल उभा आहे. साडेतीनशे वर्षांनंतर इएयोशीचा अगर हिरोशिगेचा पूल दृष्टीस पडेल अशी आशा मी अर्थात केली नव्हती. तेवढ्या काळात हा पूल बारा वेळा कोसळला आणि नवा बांधला हे मला माहीत होते. पण पुलाचे जे ध्यान मला दिसले त्याने माझी निराशा झाली. वास्तविक मला त्याच्याबद्दल आदर वाटायला हवा होता. १९११ साली बांधलेल्या या पुलावर दोन प्राणांतिक संकटे गुदरली – १९२३ चा भूकंप आणि गेल्या महायुद्धातला अग्निवर्षाव. दोन्ही वेळी तो चांगला होरपळून निघाला, पण उखडला नाही. होता तसा उभा राहिला. आदराने ओणवे व्हायला येवढी गोष्ट पुरी होती. पण लंडनच्या एखाद्या माफक उमरावाच्या बंगल्याच्या प्रवेशद्वारावर असावे तसे धातूचे दिवे आपल्या सामान्य कठड्यावर धारण करून असलेल्या या फरशीवजा पुलाने माझी पार निराशा केली—

पण फार काल नाही. हळू हळू आदराने तुच्छतेवर मात केली. निराशेची जागा संस्मरणाने घेतली. काही म्हटले तरी कालाची अनंत पावले या

पुलावर पडलेली आहेत. टोकिओचा उभा अवतार पुलावरच्या दिव्यांनी पाहिलेला आहे. हा पूल बांधला तेव्हा त्याच्या भोवताली दलदल होती, जंगल होते आणि त्या जंगलातले रानपक्षी आणि श्वापदे या पुलावर येऊन टेकत; आज त्याच्या भोवती टोकिओच्या आर्थिक कारभाराच्या कचेऱ्या आहेत आणि त्यांच्या गाड्या पुलावरून उडत आहेत. कालांतराने या पुलावरून घोड्याच्या टापा उडवीत चाललेले सामुराई आणि पालखीच्या हिंदकळ्याबरोबर आपली संपदा आणि रूपसंपदा झुलवीत जाणाऱ्या स्त्रिया जाऊ लागल्या; आज त्यांची जागा सातारसुद्रापलीकडून आलेल्या प्रवासी जोडप्यांनी घेतलेली आहे. नंतर या पुलाच्या फळ्या घोड्यांच्या गाड्यांनी आणि रिक्शॉच्या धावांनी थरथरल्या; आज या पुलावरून ट्रॅमा खडखडतात, लॉऱ्या धडधडतात आणि सायकली धडपडतात. आज येथून फुजी दिसत नाही. राजवाडा दिसत नाही, राजवाड्याच्या आजूबाजूची झाडीही दिसत नाही; फक्त सिमिटपोलादाच्या इमारती दिसतात. त्यांच्या साऱ्या खुणा या पुलाने न्याहाळून पाहिलेल्या आहेत. १६५० साली जपानच्या पहिल्या डिपार्टमेंट स्टोअर्सची स्थापना त्याने पाहिली आणि त्यानंतर त्या 'डिपाटो'—ची झालेली नामांतरे आणि स्थित्यंतरेही नजरेखालून घातली. त्यापूर्वीच सुरू झालेल्या सोन्याच्या टाकसाळीतल्या नाण्यांचा आवाज त्याने ऐकला आणि या सोन्याच्या टाकसाळीने रुप्याच्या टाकसाळीची पलीकडे गिंझात हकालपट्टी केली तीही पाहिली. १८७६ साली मित्सुई बँकेच्या स्थापनेचा सोहळा त्याने पाहिला आणि या बँकेचे साम्राज्य वाढले कसे, कोलमडले कसे, आणि पुनः उभे राहिले कसे, तेही पाहिले. टोकिओच्या साऱ्या व्यापारी विकासाचा आणि औद्योगिक उत्कर्षाचा तो साक्षीदार आहे, आणि या व्यापारी युगात विकसलेल्या कलांचा तो भक्त आहे. पलीकडे असलेल्या काबुकी थिएटरची उभारणी त्याने डोळे भरून पाहिली आणि हिरोशिगे प्रभृतींच्या छापचित्रात तो स्वतःच जाऊन बसला. या पुलाची नेक अशी की, सभोवार चाललेल्या वाढत्या प्रसाराची झेप त्याने पाहिली, अनुभवली, पण स्वतःचे नम्र रूप सोडले नाही. टोकिओच्या वाढीचे अनेक आघात त्याने सोसले, पण तो स्वतः सदोदित या शहराचा नम्र सेवकच राहिला. त्याला आदराचा मुजरा नाकारणे अशक्य होते.

* * *

मोटारने अगर बसने प्रवास करण्याचा विचार तुम्ही मनातही आणू नका. येथले रस्ते फार खराब आहेत. तुमची गाडी केव्हा मोडून पडेल याचा नेम नाही. पण आमची आगगाडी? कधी मिनिटभर लेट झाली तर मला विचारा.

* * *

राजवाड्याप्रमाणे जपानचे आणखीही एक केंद्र टोकिओत आहे – निहोम्बाशी पूल. जपानातल्या साऱ्या रस्त्यांची सुरुवात येथे होते, म्हणजे त्यांची लांबी येथून मोजली जाते. टोकिओ शहराच्या सुरुवातीपासूनच त्याला ही प्रतिष्ठा प्राप्त झालेली आहे. आणि हिरोशिगेने या प्रतिष्ठेवर कलेचा साज चढविला आहे. तो पूल पाहायला जाताना या पुलाची हिरोशिगेने काढलेली छापचित्रेच माझ्या नजरेसमोर तरळत होती. त्या पुलाचे करकरीत लाकूडकाम, पुलाच्या कमानीचे नक्षीदार कोरीव काम, पुलावरून जाणाऱ्या रंगदार लोकांच्या डोक्यावरच्या रंगदार छत्र्या, काहींच्या खांद्यावर डुलणाऱ्या–डुचमळणाऱ्या कावडी, कमरेच्या दोन बाजूंच्या दोन तरवारी मिरवीत जाणारे सामुराई, पुलाच्या कडेला काही तरी शोधीत असणारी श्वाने, नदीपलीकडच्या टुमदार झोपड्या, आणि मुख्य म्हणजे मागे दूर डोक्यावर हिमाचा लेप घालून बसलेला फुजीसान, ही दृश्ये नजरेसमोरून सरकत होती. पण मी निहोम्बाशीवर आलो नि माझी निराशा झाली. जेथे इएयोशीने प्रथम उभारला नेमका त्याच ठिकाणी आज साडेतीनशे वर्षांनंतर हा पूल उभा आहे. साडेतीनशे वर्षांनंतर इएयोशीचा अगर हिरोशिगेचा पूल दृष्टीस पडेल अशी आशा मी अर्थात केली नव्हती. तेवढ्या काळात हा पूल बारा वेळा कोसळला आणि नवा बांधला हे मला माहीत होते. पण पुलाचे जे ध्यान मला दिसले त्याने माझी निराशा झाली. वास्तविक मला त्याच्याबद्दल आदर वाटायला हवा होता. १९११ साली बांधलेल्या या पुलावर दोन प्राणांतिक संकटे गुदरली – १९२३ चा भूकंप आणि गेल्या महायुद्धातला अग्निवर्षाव. दोन्ही वेळी तो चांगला होरपळून निघाला, पण उखडला नाही. होता तसा उभा राहिला. आदराने ओणवे व्हायला येवढी गोष्ट पुरी होती. पण लंडनच्या एखाद्या माफक उमरावाच्या बंगल्याच्या प्रवेशद्वारावर असावे तसे धातूचे दिवे आपल्या सामान्य कठड्यावर धारण करून असलेल्या या फरशीवजा पुलाने माझी पार निराशा केली—

पण फार काल नाही. हळू हळू आदराने तुच्छतेवर मात केली. निराशेची जागा संस्मरणाने घेतली. काही म्हटले तरी कालाची अनंत पावले या

पुलावर पडलेली आहेत. टोकिओचा उभा अवतार पुलावरच्या दिव्यांनी पाहिलेला आहे. हा पूल बांधला तेव्हा त्याच्या भोवताली दलदल होती, जंगल होते आणि त्या जंगलातले रानपक्षी आणि श्वापदे या पुलावर येऊन टेकत; आज त्याच्या भोवती टोकिओच्या आर्थिक कारभाराच्या कचेऱ्या आहेत आणि त्यांच्या गाड्या पुलावरून उडत आहेत. कालांतराने या पुलावरून घोड्याच्या टापा उडवीत चाललेले सामुराई आणि पालखीच्या हिंदकळ्याबरोबर आपली संपदा आणि रूपसंपदा झुलवीत जाणाऱ्या स्त्रिया जाऊ लागल्या; आज त्यांची जागा सातासमुद्रापलीकडून आलेल्या प्रवासी जोडप्यांनी घेतलेली आहे. नंतर या पुलाच्या फळ्या घोड्यांच्या गाड्यांनी आणि रिक्शॉच्या धावांनी थरथरल्या; आज या पुलावरून ट्रॅमा खडखडतात, लॉऱ्या धडधडतात आणि सायकली धडपडतात. आज येथून फुजी दिसत नाही. राजवाडा दिसत नाही, राजवाड्याच्या आजूबाजूची झाडीही दिसत नाही; फक्त सिमिटपोलादाच्या इमारती दिसतात. त्यांच्या साऱ्या खुणा या पुलाने न्याहाळून पाहिलेल्या आहेत. १६५० साली जपानच्या पहिल्या डिपार्टमेंट स्टोअर्सची स्थापना त्याने पाहिली आणि त्यानंतर त्या 'डिपाटो'-ची झालेली नामांतरे आणि स्थित्यंतरेही नजरेखालून घातली. त्यापूर्वीच सुरू झालेल्या सोन्याच्या टाकसाळीतल्या नाण्यांचा आवाज त्याने ऐकला आणि या सोन्याच्या टाकसाळीने रुप्याच्या टाकसाळीची पलीकडे गिंझात हकालपट्टी केली तीही पाहिली. १८७६ साली मित्सुई बँकेच्या स्थापनेचा सोहळा त्याने पाहिला आणि या बँकेचे साम्राज्य वाढले कसे, कोलमडले कसे, आणि पुनः उभे राहिले कसे, तेही पाहिले. टोकिओच्या साऱ्या व्यापारी विकासाचा आणि औद्योगिक उत्कर्षाचा तो साक्षीदार आहे, आणि या व्यापारी युगात विकसलेल्या कलांचा तो भक्त आहे. पलीकडे असलेल्या काबुकी थिएटरची उभारणी त्याने डोळे भरून पाहिली आणि हिरोशिगे प्रभृतींच्या छापचित्रात तो स्वतःच जाऊन बसला. या पुलाची नेक अशी की, सभोवार चाललेल्या वाढत्या प्रसाराची झेप त्याने पाहिली, अनुभवली, पण स्वतःचे नम्र रूप सोडले नाही. टोकिओच्या वाढीचे अनेक आघात त्याने सोसले, पण तो स्वतः सदोदित या शहराचा नम्र सेवकच राहिला. त्याला आदराचा मुजरा नाकारणे अशक्य होते.

* * *

निहोम्बाशीच्या आसपासच टोकिओची विख्यात डिपार्टमेंट स्टोअर्स आहेत. सारी स्टोअर्स सारखीच आहेत. सारख्याच कौशल्याने कारभार करीत आहेत. नवनवीन युवत्या सारख्याच हिरिरीने वापरीत आहेत. नवनवीन उपक्रमांचा तोच तडाखा चालवीत आहेत. नवनवीन फॅशन्स पसरवीत आहेत. प्रदर्शने भरवीत आहेत. व्याख्याने करवीत आहेत. पुष्परचनेचे वर्ग चालवीत आहेत. चहा-पानविधीचे पाठ देत आहेत. आणि आपल्या इमारतींचा ढंग आणि सजावटीचे रंग सारखे बदलीत आहेत. तेव्हा कोणत्याही स्टोअरमध्ये चला, एकच अनुभव येईल. टाचणीपासून टेपरेकॉर्डपर्यंत हवी ती वस्तू सारख्याच दराची आणि सारख्याच वजनाची मिळेल. मी एकात गेलो त्याचे नाव आता आठवत नाही, पण रूप आठवते. पहिला मजला म्हणजे धांदलीच्या खरेदीची जागा. पण मला खरेदी कराची नव्हती, फक्त पाहायचे होते. तळघरातून नवान्नाचा स्वाद आला, पण त्यात मला गोडी नव्हती, म्हणून लिफ्टकडे वळलो, आणि लिफ्टमध्येच गोड अनुभव आला. लिफ्ट चालवणाऱ्या मुलीचा हसतमुख चेहरा कसलेसे गोड गाणे गुणगुणत होता. खरे म्हणजे दर मजल्यावर कोणकोणत्या मालाची दालने आहेत याची यादी ती सांगत होती, पण या गद्य यादीला तिच्या तोंडात हे संगीत रूप आले. तिची ती हसरी नजर पाहत आणि हे गोड गाणे ऐकत लिफ्ट-मध्येच उभे राहावे असे वाटले. पण झुंडीच्या झुंडी आत शिरत होत्या आणि झुंडीच्या झुंडी बाहेर लोटत होत्या, आणि अशाच एका झुंडीबरोबर मी बाहेर फेकला गेलो. सुदैवाने ज्या मजल्यावर फेकला गेलो त्यावर कलेचा उत्सव सुरू होता. चित्रे, चिनी पद्धतीची, पाश्चात्त्य पद्धतीची, जपानी पद्धतीची चित्रे; जुनी छापचित्रे, नवी छापचित्रे; शिल्प, शिल्पाचे सिवे नमुने, विक्षिप्त नमुने; जुने पुतळे, आधुनिक टोकळे; कुंभपात्रे, मातीची, दगडाची, काचेची; फुलदाण्या, कप, वाडगे; बाग, बागेतल्या वनस्पतींचे नमुने, दगडांचे नमुने, झाडांचे रोपे, खुरवटलेल्या रोपांचे नमुने — एक ना अनेक प्रकार तेथे होते. थोडक्यात म्हणजे कलाकृतींची जीवंत प्रदर्शनेच तेथे सुरू होती. शिवाय एक ‘ प्रदर्शन ’ या संज्ञेने भरविलेले प्रदर्शनही सुरू होते. कोरिनच्या चित्रांचे प्रदर्शन त्याचा तो विख्यात, आलुबुखारच्या मोहराचा दुरंगी पडदा पाहिला आणि डोळे भरून आले. विख्यात कलावंताच्या विख्यात कृतीचे दर्शन झाले. त्याच्या कलेचे वैशिष्ट्य समजले असे नव्हे, त्याच्या कलेचे मर्म कळले असेही नव्हे, पण थोर कलेच्या सामर्थ्याने आणि त्याहीपेक्षा तिच्या भोवती निर्माण झालेल्या कीर्तीच्या वलयाने

हृदय हलले. मी टोकिओत इतर अनेक प्रदर्शने पाहिली होती. कलाप्रदर्शनांचा तो हंगामच होता. पण या प्रदर्शनाने प्रदर्शन पाहिले असे वाटले.

इतर मजल्यांवर अनेक गोष्टी पाहिल्या. क्यामेरे, विजेचे दिवे, रेडिओ, रेकॉर्डर, दुर्बिणी, ग्रॅमोफोन्स, दिव्यांचे स्टॅण्ड, बूट, बॅगा, खुर्च्या, टेबले, फुलदाण्या, बाहुल्या, खेळणी, नेकटाईज् – नाना वस्तू पाहिल्या, अधाश्यासारख्या पाहिल्या आणि नजर गरगरू लागली. एका वस्तूत दुसरी वस्तू शिरू लागली, भिनू लागली, आणि या संकरातून अगदी एखादी अपूर्व अनोखी वस्तू डोक्यात निर्माण होणार इतक्यात डोके काम देईनासे झाले! सुदैवाने एका नव्या दालनात पाऊल पडले आणि डोक्यातला गोंधळ निवळला. हे दालन किमोनोंचे. किमोनोंचे कित्येक नमुने तेथे गोडगोंडस पुतळ्यांवर घालून ठेवले होते. स्त्रियांच्या समारंभात आपण चुकून बुसलो की काय असे क्षणभर वाटले, पण क्षणार्धात सावध झालो, आणि ते थंड निर्जीव पुतळे आणि त्यांच्यावरच्या किमोनोंची जीवंत सळसळ यांतल्या विसंगतीची जाणीव झाली. प्रत्येक किमोनोत काहीएक विलक्षण व्यक्तित्व, विलक्षण प्राण होता. प्रत्येक किमोनोचा रंग – नारिंगी, पोपटी, शेंदरी, आकाशी रंग – काही एका विलक्षण तेजाने झळकत होता. प्रत्येकावरची, शेवंतीची, मेपलपर्णाची, चेरीच्या मोहराची, द्राक्षवेलींची, चिडाच्या फांद्यांची, बगळ्यांची, बुलबुलांची नक्षी नजर बांधीत होती. ओबीवरची जरतारी चित्रे सुवर्णतेजाने खुलली होती. नजर धुंद होऊन गेली. त्या किमोनोंच्या सौंदर्याने भारलेल्या नजरेला त्या निर्जीव पुतळ्या जीवंत झाल्याशा वाटल्या आणि त्यांच्या अंगावरचे किमोनो एकदम नव्याने सळसळले, आणि मग, का नकळे, लग्नमंडपात जमा झालेल्या आपल्या स्त्रियांच्या लुगड्यांचे इरकली पदर माझ्या नजरेसमोर सरसर फडफडले – आणि मनात विचार आला की, सौंदर्य आणि चारुता यांचा एक प्रयोग म्हणून परमेश्वराने स्त्री निर्माण केली. आपल्या लावण्याचा प्रभाव वाढविण्यासाठी तिने वस्त्रालंकारांचे अनेक प्रयोग केले, पुरुषानेही आपली अक्कल त्यात ओतली. परंतु शेकडो वर्षांच्या प्रयोगानंतरही भारताची प्राचीन साडी आणि जपानचा प्राचीन किमोनो यांची सर दुसऱ्या वस्त्राला आली नाही, हा एक चमत्कार नव्हे काय? पण मग किमोनो आणि साडी यांची तुलना सुरू झाली आणि या किमोनोंनी विणलेले मोहजाल विरू लागले. काही म्हटले तरी साडीचे सहजसौंदर्य किमोनोत नाही. किमोनोइतके वापरायला कटकटीचे वस्त्र दुसरे कोणते नसेल.

आणि त्याची पायाभोवती जी आवळ असते तिने तर जपानी स्त्रियांची चाल अगदी बेढब, बेसूर करून टाकली आहे.

* * *

या विचारांच्या तंद्रीतच मी बाहेर पडलो आणि एका किमोनोधारी स्त्रीच्या मागून चालू लागलो. ही स्त्री किती सुंदर चालत होती म्हणून सांगू. किमोनोच्या हालचालीशी लय साधून ती चालत होती. मला नवल वाटले. पण लगेच आठवले की तामीळ भाषा सौम्य आणि मधुर स्वरात बोलणारी स्त्री मला एकदा भेटली होती. काही स्त्रियांत माधुर्य इतके ओतप्रोत भरलेले असते की त्याच्यावर मात करण्यास विरूपही असमर्थ ठरते. आणि काही स्त्रियांच्या पावलांत लय इतकी ठाय भरलेली असते की ती मोडण्यास किमोनोही दुबळा ठरतो. पण एकदम या पावलांचीही लय बिघडली. मी का ते पाहू लागलो — आणि ध्यानात आले की रस्त्यावरील गर्दीने ही घाण केली. लगेच माझी नजर सभोवार फिरली आणि शिम्बाशीकडे जाणाऱ्या या रस्त्यावर केवढी गर्दी उसळली आहे हे ध्यानात आले. टोकिओच्या कोणत्याही रस्त्यावर केव्हाही गर्दी असतेच, पण या गर्दीसारखी हीच. कोणत्याही गोष्टीला अंकांच्या आकड्यात पकडणाऱ्या आकडेशास्त्रज्ञांचा असा अंदाज आहे की या रस्त्यावर दररोज पाच-सहा लाख पावले पडत असतात. या पाच-सहा लाखांना दोहोंनी गुणायचे की भागायचे हा प्रश्न मी त्या आकडेशास्त्रज्ञांवर सोपवून देऊन एक साधाच प्रश्न मनाशी केला की, इतके लोक, इतकी वाहने येथे एकदम का गोळा होतात ? कर्कशणाऱ्या मोटारी, धडधडणाऱ्या लॉऱ्या, फरारणाऱ्या फटफटी, वळवळणाऱ्या सायकली, खडखडणारे गेटे, तुरतुरणाऱ्या झोऱ्या – आणि त्यांच्यावर स्वार झालेले गोबऱ्या गालांचे, थोराड हाडांच्या चेहऱ्याचे, कुळकुळीत केसांचे, बोजड पायांचे पण गोंडस हातांचे, डोळ्यांवर चष्मा आणि चेहऱ्यावर चिंता चढविलेले साडेतीन हातांचे देह, इतकी ओरड, इतके हानवारे आणि इतकी धावपळ करीत येथे का गोळा होतात ? का गर्दी करतात ? एकमेकांना धक्के का देतात ? एकमेकांच्या ओढाताणीत अगर रेटारेटीत सामील का होतात ? जगातल्या इतर असंख्य प्रश्नांप्रमाणेच या प्रश्नांचेही उत्तर स्वभाव असेच आहे. गर्दी करणे, गर्दीत रमणे आणि गर्दीचा गुणाकार करणे, हा जपानी माणसाचा स्वभाव आहे. तो जाईल तिकडे गर्दी करतो आणि गर्दी असेल तिकडेच जातो. गर्दीचा त्याच्या देशाला शापच

आहे. गर्दीने गजबजलेल्या त्याच्या देशाला एकांताची चैन परवडत नसते. कागदी भिंतींच्या त्याच्या घरात कसलाच एकांत शक्य नसतो. त्याला कसलाच एकांत मिळत नाही. श्राव्यही नाही आणि दृश्यही नाही. एकांताचा अजिबात अनुभव नसल्यामुळे एकांत हा त्याला एकांतवासाच्या शिक्षेइतका कठोर वाटतो. म्हणून तो नेहमी गर्दी गोळा करीत असतो आणि गर्दीवर प्रेम करीत असतो. संधी सापडेल तेव्हा गर्दी माजवितो. त्याचे सण आणि उत्सव म्हणजे सार्वजनिक उद्यानात गर्दी माजविण्याची शहाजोग संधी. त्याचे बेसबॉल अगर सुमो कुस्त्यांचे सामने म्हणजे गर्दीला आलेले उधाण. आणि त्याच्या धार्मिक मिरवणुकी म्हणजे तर गर्दीला चढलेली झिंगच. ॲरिस्टॉटलच्या कळप करून राहण्याच्या प्रवृत्तीचे तो एक निखालस उदाहरण आहे. एकांताच्या अभावामुळे मनुष्यप्राणी माणूसघाणा बनतो असे बर्ट्रांड रसेलसारखे विचारवंत सांगतात, त्याला तो एक सक्त अपवाद आहे.

पण गर्दीलाही एक लय असते. गर्दीतल्या गोंधळाला, ओढाताणीला, धक्काबुक्कीला, तोंडघशीला आणि तोंडचुकवीला एक लय असते. या लयीशी माझी लय जमविण्याचा मी प्रयत्न करीत होतो, तो ध्यानात आले की सारीच लय एकदम बिघडते आहे. का ते पाहू लागलो, तो एक सुस्वरूप स्त्री – पायांत गेटा, अंगात किमोनो आणि हातांत सामीसेन, अशी स्त्री – हातांतल्या वाद्यांचा टंकार छेडीत येत आहे आणि कसल्यातरी उत्सवाचा किमोनो घातलेल्या, डोक्याला फडके गुंडाळलेल्या आणि कपाळाला पांढरा नाम लावलेल्या मुलांचा घोळका तिच्या मागे आहे. तिला पाहून मला एकदम आपल्याकडच्या गोसावणीची आठवण झाली. पण ही इकडे का ? आणि हा मुलांचा ताफा का ? आणि ती एकमेकांना आणि आजूबाजूच्या लोकांना या पत्रिका कसल्या वाटीत आहेत ? मी एक पत्रिका घेतली आणि ध्यानात आले की ही दाइए कंपनीच्या ‘ उगात्सु मोनोगाटारी ’ बोलपटाची जाहिरात !

टोकिओत थोडेसे हिंडा, लगेच जपान्यांच्या जाहिरातबाजीचे तऱ्हतऱ्हेचे नमुने नजरेसमोर नाचू लागतील. आसाकुसाच्या मंदिरात जमलेल्या पेन-प्रतिनिधींवर हेलीकॉप्टरने फुलांच्या पाकळ्यांऐवजी जाहिरातपत्रिकांची वृष्टी केली होती. उसा येथील एका कारखानदाराने आपल्या मालाची Made in USA अशी जाहिरात करून अमेरिकन कस्टम्स-अधिकाऱ्यांना गोंधळात टाकले होते.

आणि सुमिदा नदीवरच्या वार्षिक दारूकामात एकदा एका कंपनीच्या नावाची अक्षरे उमटली होती. जपानातला एक विख्यात बेसबॉल संघ ‘ असाही ’ पत्राने पुरस्कारलेला आहे आणि ‘ असाही ’ पत्राचेच नाव तो लावतो. बहुतेक डिपार्टमेंट स्टोअर्सच्या गच्चीवर एखादा बागबगीचा, नाहीतर करमणुकीचे केंद्र, उपाहारगृह अगर शिंटो मंदिर असते. एखादा ‘ डिपाटो ’ आपला वार्षिक सेल लावतो, तेव्हा त्याच्या प्रचारकांची अनेक रोमटे रस्त्यावरून हिंडतात. गिंझावर रात्री निऑन लाईट्सची जी रंगदार स्वप्नपुरी उमलते तिचा आत्मा जाहिरातगिरी हाच आहे. जाहिरातगिरी मुळी जपान्यांच्या रोमारोमातच भिनलेली आहे. दुकानात माल विकणाऱ्या मुलीच्या उत्सुक चेहऱ्यावरच्या हास्यात ती जशी तरळेल तशीच तो माल वेष्टनात गुंडाळताना होणाऱ्या बोटांच्या नाजुक हालचालीत दिसेल. जपानी दुकानांतून आलेल्या मालावरचे वेष्टन म्हणजे एक छोटीशी कलानिर्मितीच होय. अनेक दुकानदार नुसत्या आकर्षक वेष्टनावर भागवीत नाहीत. ते सोबत एक लहानशी भेटही देतात. उपाहारगृहांनी, कॉफीगृहांनी आणि पेयगृहांनी या भेटीला एक मजेदार रूप दिले आहे. ती गिऱ्हाइकांना सुंदर कलात्मक लेबलाची काड्यांची पेटी नजर करतात. बहुतेक वेळा दुकानातली पोरगी प्रथम त्या पेटीतल्या काडीने तुमची सिग्रेट पेटवते आणि मग ती तुमच्या स्वाधीन करते. जपान्यांच्या कलादृष्टीचे अनेक नाजुक नमुने या लेबलांवर दिसतील. उपाहारगृह एखाद्या माशाची छोटीशी आकृती लेबलावर रेखील, तर कॉफीगृह कपबशीचा भास निर्माण करणारी एखादी स्वैर रेखाकृती चित्रील. आणि पेयगृह एखादा काव्यचरण चित्रमय लिपीत शृंगारून तुमच्या काव्यात्म वृत्तीस स्पर्श करील. या लेबलांवर पुष्कळदा जपानच्या निसर्गावरचे अगर ऐतिहासिक कला-कृतीवरचे प्रेम व्यक्त झालेले असते. चेरीचा मोहर, मेपलची आरक्त पाने, होकुसाय अगर हिरोशिगे यांचे एखादे छापचित्र, नाहीतर कोरिनची एखादी कलाकृती या लेबलावर अवतरते. पुष्कळशा लेबलांवर नाजुक रेखा आणि वेधक रंग यांचे भावगीत आढळेल, पण एखादे एखादा गद्य नकाशाच सादर करील किंवा आपल्या दुकानाचे नाव रेखील. पण जपानची लिपी जात्याच चित्रमय असल्याने यातूनही कलेचा निर्झर वाहील.

  

शिम्बाशीला चालत जाण्याचा माझा बेत होता. पण गिंझातल्या गर्दीपुढे माझा निभाव लागेना, आणि मी शिम्बाशीचा नाद सोडून टॅक्सीने काण्डाला जायचा बेत केला. एक टॅक्सी उभी केली आणि ड्रायव्हरला विचारले, ' इंग्लिश ? ' तो मुंडी हालवून म्हणाला ' हाय ' ( होय ). लगेच मी टॅक्सीत बसलो नि ऐटीत म्हणालो, ' Let us go to Ueno Park via Kanda.' ( आपण काण्डाच्या मार्गाने उएनो पार्कला जाऊ या. ) तो काही बोलला नाही. मी विचारले, Do you understand ? – We go to Ueno via Kanda. त्यावर त्याने तोंडाचे बोळके करून पुटपुटल्यागत अत्यंत निर्बुद्ध स्वरात माझ्या वाक्याचा पुनरुच्चार केला – We go to Ueno via Kanda. माझे बोलणे त्याला समजले असे यावरून समजण्यास हरकत नव्हती, पण ज्या गबाळ स्वरात त्याने ही उजळणी केली त्याने मी हादरलो. मी पुनः म्हटले Understand ? – We go first to Kanda and then to Ueno Park. त्याने पुन्हा उजळणी केली, First to Kanda then to Ueno Park. आता माझी खात्री पटली, याला इंग्रजीचा गंध नाही. बहुतेक माझा व इंग्रजीचा आदर करण्यासाठी तो मी उच्चारीत असलेल्या शब्दांचा पुनरुच्चार करतो आहे. कदाचित तेवढ्यात थोडे इंग्रजी शिकण्याचा त्याचा इरादा असेल. पण त्याची ही इंग्रजीविषयीची आस्था मला महाग पडणार होती. पण मी करणार काय ? त्याला समजावणार कसे ? आणि त्याला त्याची पर्वा तरी कोठे होती ? त्याने चक्क टॅक्सी उलटी फिरवली आणि भरधाव सोडली. त्याच्या त्या उलटी फिरवण्याच्या बेव्रूट क्रियेने माझ्या पोटात थोडीशी धडकीच भरली. काण्डा उलट दिशेला आहे हे मला माहीत नव्हते. त्याच्या आविर्भावावरून मला ते तिकडे नसावेच असे वाटले. पण मी काही बोलू शकत नव्हतो. एका आततायी माणसाच्या तावडीत सापडलो होतो. पण त्याला कोणाच्याच जिवाची पर्वा दिसली नाही. माझ्या नाही, रस्त्यावरच्या माणसांच्या नाही. ती बिचारी त्याच्या टॅक्सीच्या नुसत्या दर्शनाने सैरावैरा धावू लागत. आता माझ्या ध्यानात आले, टोकिओच्या टॅक्सीवाल्यांना ' कामीकाझे ड्रायव्हर्स ' का म्हणतात ! ' कामीकाझे ' म्हणजे देवाघरचा वारा. १२८१ मध्ये कुबलाईखानाने जपानवर स्वारी करण्यासाठी एक प्रचंड आरमार पाठविले त्याचा वादळाने फडशा पाडला. तेव्हा जपान्यांनी या वादळाला कामीकाझे म्हटले. तेव्हापासून अरिष्टातून संरक्षण करणाऱ्या कोणत्याही शक्तीला कामीकाझे ही संज्ञा प्राप्त झाली. गेल्या महायुद्धात जपानवरचे प्राणांतिक संकट टाळण्यासाठी

अनेक वैमानिक आत्माहुतीच्या दलात दाखल झाले. त्यांचा कामीकाझे असा गौरव झाला. टोकिओचे टॅक्सी-ड्रायव्हर स्वतःच्या प्राणांबद्दल असेच बेफिकीर असतात म्हणून त्यांनाही कामीकाझे म्हणतात. दुर्दैवाने ते इतरांच्या प्राणांबद्दलही तितकेच बेफिकीर असतात. कामीकाझे या उदात्त संज्ञेचे असे विपरीतात संक्रमण होताना अर्थाला जितके तेढे पडले तितके तेढे माझा टॅक्सी-ड्रायव्हर टॅक्सीच्या वेगाला आणि वळणांना देत होता, आणि याच्या परिणामाचा विचार करण्याची माझी हिंमत पार खचली.

* * *

पण आपल्याला तो कोठे नेत आहे हा प्रश्न होताच. काही बोध होतो का पाहू लागलो. पण ऐसपैस पसरलेल्या टोकिओच्या इतर रस्त्यांसारखाच हा रस्ता होता. तोच नूर, तीच तऱ्हा. रस्त्यांच्या कडेने अखंड उभ्या असलेल्या लाकडी पेटाऱ्यासारख्या भकास घरांची रांग. रस्ता कोठे जातो, कसा जातो, काही कळेना. एकसारखा भिकार भगंग दृश्यांचे पडदे खोलीत होता. या फुसक्या, चिटक्या, एकमुरी, व्यक्तित्वशून्य घरांच्या कधी न संपणाऱ्या रांगा पाहून वाटले, युद्धात बेचिराख झालेले शहर जपान्यांनी दोनतीन वर्षांत उभे केले यात नवल ते काय? असले कडबे ठेवायचे गोठे उभारायला अक्कल ती किती हवी आणि वेळ तो कितीसा लागणार? पण लगेच शिंजुकू येथे पाहिलेले दृश्य आठवले. तेथे भूगर्भ गाड्यांचा रस्ता बांधण्याचे काम चालले होते. पण खाली काम चालू म्हणून वरचा रस्ता बंद नव्हता. वर चक्क लाकडी फळ्यांचा रस्ता टाकलेला होता. काही म्हटले तरी जपानी हे हाडाचे बांधकार आहेत. शिवाय ते अशी फुसकी कामचलाऊ घरे बांधतात यात एक खोल दृष्टी असेल. हे जग विनाशी आहे, क्षणभंगुर आहे, अशी बुद्धाची शिकवण आहे. बुद्धापेक्षाही जपानच्या अस्थिर भूमीने हा धडा अधिक चांगला बिंबवला असेल. आग आणि भूकंप यांचा स्वैर संचार सुरू असलेल्या भूमीवर अशी हंगामी घरे बांधणेच योग्य. घर-बांधणीचे आणि शहर-आखणीचे नवनवे प्रयोग वारंवार करण्यास यामुळे चांगला अवसर मिळतो. याच दृष्टीने १९२३ च्या भयंकर भूकंपाचे कादंबरीकार तानी-झाकींनी मनःपूर्वक स्वागत केले होते. शिवाय आजचा काळ बॉबहल्ल्यांचा. या काळात अशी भटक्यांच्या तंबूसारखी, आज गुंडाळली उद्या उभारली, आज मोडली उद्या उठवली, अशी घरेच चांगली!

माझ्या विचाराच्या अशा आडव्या उभ्या उड्या पडत आहेत, तोच चाकांवर ब्रेकचे जबरदस्त घर्षण होऊन टॅक्सी उभी राहिली. आणि एकदम

ध्यानात आले, अरे आपण अद्याप शाबूत आहोत. टॅक्सीही शाबूत आहे. आणि कोणीच दगावलेले नाही. मला ड्रायव्हरबद्दल कीव आली. तो तरी काय करणार बिचारा! गिऱ्हाइकांना घेऊन धावण्यापेक्षा गिऱ्हाइकांच्या मागे धावण्यातच त्याचा अधिक वेळ जातो. चोवीस चोवीस तास चाकावर हात ठेवून राहतो तरी चतकोर भाकरीची हमी नाही! खरेच हा टॅक्सी–ड्रायव्हरचा धंदा पत्करणे म्हणजे जिवाचीच जोखीम. मग त्याला कामीकाझे न म्हणायचे तर काय ?

एका पुस्तकांनी रचलेल्या दुकानासमोर टॅक्सी उभी होती. – त्याने मला बरोबर काण्डात आणले होते. आता त्याच्याबद्दल वाटणाऱ्या अनुकंपेत आदराची सूक्ष्म छटा उमटली. मी काण्डात आलो होतो याबद्दल शंका येण्याचे कारण नव्हते. माझ्या डाव्या उजव्या बाजूला पुस्तकांचीच दुकाने होती आणि आतली पुस्तके जगाला शहाणे करून सोडण्याच्या आविर्भावाने रस्त्यावर आली होती. जिकडे तिकडे जुन्या पुस्तकांच्या रांगा लागलेल्या होत्या आणि दुकानदार त्यांच्यावरून आपली प्रेमळ नजर आणि कुरवाळणारे हात फिरवीत होते. मला एकदम पॅरिसच्या सेन नदीकाठच्या पुस्तकांच्या रांगांची आठवण झाली आणि अशी आठवण होण्यात काण्डाचा अपमान होत आहे याचीही जाणीव झाली. खरोखर पुस्तकांच्या या घाऊक बाजारापुढे सेन नदीच्या काठची ती आपली मोजकी दौलत आवरून बसलेली दुकाने म्हणजे 'किस झाडकी पत्ती'! पॅरिसच्या इमारती पाहण्यास आणि चैन उपभोगण्यास आलेल्या उडत्या प्रवाश्यांचे क्षणभर चित्त धरू पाहणाऱ्या त्या दुकानांची या उभ्या जगाला साक्षर नव्हे तर विद्वान करून सोडण्याचा चंग बांधलेल्या बाजारापुढे काय पत्रास! येथे ज्ञानगंगाच वाहत होती आणि त्याच्या प्रवाहात हवे तितका वेळ डुंबायला या, असे जाहीर निमंत्रण होते. त्याचा फायदा अनेक वाचक दुकानात आणि फुटपाथवर उभे राहून घेत होते. कोकणात झाडाखालचे फळ उचलणे ही जशी चोरी नव्हे, त्याचप्रमाणे जपानात पुस्तकांच्या दुकानात उभे राहून फुकट वाचणे हे पाप नव्हे. आणि शेकडो वाचक पायावर भिस्त टाकून पुस्तकेच्या पुस्तके आणि मासिकेच्या मासिके फस्त करीत असतात. आणि तरी पुस्तके हजारांनी खपतात. कारण जपान हे वाचकांचे राष्ट्र आहे. प्रत्येकाने आपल्या जीवनाचे वाचनालय करून सोडले आहे.

* * *

उएनो पार्कचा विचार सोडून सुमिदा नदीवरून शिम्बाशीला जावे असे मनात आले आणि मी टॅक्सी करून आसाकुसाच्या धक्क्यावर गेलो. लाँच सुटायला थोडा वेळ होता. पाण्याकडे पाहत बसावे म्हणून एका बाकावर टेकलो. नदीचे वाहते पाणी पाहत बसायला मला फार आवडते. पाण्याचा तो अखंड, अव्याहत प्रवाह पाहून मला विश्वाच्या सातत्याचा प्रत्यय येतो आणि विश्वाच्या अंताबद्दल शास्त्रज्ञांनी वर्तविलेल्या भविष्यांची कीव वाटते. पण माझे नदीपलीकडच्या एका इमारतीकडे लक्ष गेले आणि माझ्या मनाच्या कुशीत दबून बसलेल्या चिरंजीवित्वाचे पंख एकदम फडफडले! समोरची ती इमारत म्हणजे १९२३ च्या भूकंपातील एका दारुण शोककथेचे हृदयद्रावक स्मारक. नदीच्या या बाजूला भडकलेल्या ज्वाळांपासून जीव बचावण्यासाठी हजारो लोकांनी त्या तीरावर आश्रय घेतला, पण आगीच्या ज्वाळांनी एखाद्या सर्पराक्षसाप्रमाणे नदीच्या पाण्यावरून पलीकडे उड्या घेतल्या आणि या निराधार लोकांचा स्वाहाःकार केला! माझ्या डोळ्यांपुढे त्या भयानक भूकंपाची वर्णने नाचू लागली. भूमीने गिळलेल्या आपल्या बालकास वाचविण्यासाठी एका स्त्रीने तिच्या जबड्यात उडी घेतली, पण भूमीने लगेच जबडा मिटला आणि त्या स्त्रीचे केस तेवढेच सुताप्रमाणे भुरभुरत बाहेर राहिले! सुदैवाने लाँच सुटण्याची शिटी वाजली आणि मी माझ्या नजरेसमोरचे ते दुःस्वप्न बाजूला सारू शकलो. आणि लवकरच माझे लक्ष नदीवरून खालीवर जाणाऱ्या बोटी, होड्या, पडाव, तरी, तराफे यांत गुंतून गेले. सुमिदा ही टोकिओची अन्ननलिका आहे, आणि रोज हजारो टन माल तिच्या पाण्यावरून जात असतो. अर्थात या नदीवर वर्दळ आहे, हालचाल आहे, जिवंतपणा आहे; पण त्यात एक चमत्कारिक संथपणा आहे. सुमिदावरून जाताना मला बँकॉकच्या चाओ फ्या नदीचे स्मरण होते. चाओ फ्या ही सुमिदाप्रमाणेच बँकॉकची अन्ननलिका आहे, पण तिचे दर्शन अधिक स्वैर, अधिक उच्छृंखल, अधिक मस्त आहे. रौद्रसुद्धा म्हटले तरी चालेल. चाओ फ्यावरून जाताना आपली विश्वातील एक प्रचंड शक्तीशी गाठ पडलेली आहे याची सारखी जाणीव होत राहते. तशी सुमिदावर होत नाही. सुमिदा लहान आहे. सौम्य आहे, आणि मुख्य म्हणजे नागर आहे. तिचे दोनही काठ व्यवस्थित बांधून काढलेले आहेत. शिवाय अंतराअंतराने पूल आहेत. पॅरिसच्या सेन नदी–

प्रमाणे दर पुलागणिक बदलणारे आणि दर पुलागणिक लक्ष वेधणारे सौंदर्य त्यांच्यात नाही, पण सुमिदाच्या रूपाला नागर सभ्यतेचा ' टच ' देण्यास त्यांचा फार उपयोग होतो. शिवाय हे पूल सुमिदाच्या दोन काठांवरची टोकिओची दोन जगे एकत्र बांधीत असतात. टोकिओचे औद्योगिक जग सुमिदाच्या डाव्या काठावर आहे तर व्यापारी आणि नागरी जग उजव्या काठावर आहे. या दोन जगांची चिन्हे त्यांच्या त्यांच्या काठावर आढळतात. डावीकडे कारखान्यांच्या कचेऱ्या, गुदामे आणि यान्या आहेत, आणि उजवीकडे व्यापारी कचेऱ्या, उपाहारगृहे आणि गेशागृहे आहेत. रिओगोकु पुलापाशी आमची लॉंच आली तेव्हा पुलाखालून दोन कबुतरे फडफडत उडाली. या पुलाखाली कबुतरांची वस्ती आहे आणि आसपास गेशागृहे आहेत – आणि अर्थात उपाहारगृहे आहेत. बरोबरच आहे. हा पूल हे टोकिओचे एक मोठे सांस्कृतिक स्थान आहे. दरवर्षी जुलै महिन्यात या पुलावर सुमिदा नदीवरील वाहतुकीचा वार्षिकोत्सव होतो आणि पुलावरचे आकाश सुरनळ्यांनी आणि दारूकामाच्या फुलांनी आणि नक्षत्रांनी उजळून जाते. पण पुलाच्या आसपास रोजच रात्री रोषणाई असते. गेशागृहांच्या आणि उपाहारगृहांच्या सज्जात कंदील उजळतात आणि त्यांच्या प्रतिबिंबांनी नदीच्या पाण्यात स्वप्ने उमलतात. आता दिवसा मात्र या सज्जावर आतली कापडे हवा खाण्यासाठी आली होती आणि उघडी घरे अंतरंग उघडून दाखवीत होती. आता या घरांत सारा गद्य कारभारच होता. पण रात्री येथे काव्याचे रोमांचक मळे फुलतात. आणि त्या फुलविणाऱ्या व्यक्ती समोरच्या औद्योगिक जगातून येतात. आम्ही आता या दोन जगांच्या मधून जात होतो. एक चिमण्या आणि यान्या यांचे जग आणि एक फुले आणि विलोवृक्ष यांचे जग. एक पैशाचे आणि एक करमणुकीचे. एक नव्या जपानचे आणि एक जुन्या जपानचे.

प्रत्येक वेळी आमची लॉंच पुलाखालून गेली की वाटे, हे पूल खरोखरी नव्या आणि जुन्या जपानला जोडत आहेत, नव्याला जुन्याची रंगत आणि जुन्याला नव्याचा आधार देत आहेत. इतक्यात, उजवीकडच्या एका इमारती-वर युनोचा बावटा दिसला आणि माझ्या डोळ्यांसमोरची, या करमणुकीच्या जगातली, उद्योगपतींच्या आगमनाची, साकेपानाची, नृत्यसंगीताच्या सेवनाची आणि यांच्या दरम्यान चेष्टाविनोदाची आणि गंभीर करारमदारांची दृश्ये विरली. जरा वेळाने मी हामा रिक्यु बागेत उतरलो आणि शिम्बाशीला आलो.

टोकीत नाही तर थयथया नाचतो. खरे म्हणजे जपानी पुरुष बेहोष बनण्यासाठी निमित्तच शोधीत असतो. त्याची ही बेहोषी कुस्तीच्या आखाड्यात, नाटकाच्या



थिएटरात, पाचिंकोच्या अड्ड्यात, अगर रस्त्यावरच्या मिरवणुकीत किंवा निदर्शनात, कोठेही केव्हाही दिसेल.

युद्धोत्तर कालात तर या बेहोषीनेच नशापाणी केले. युद्धाची होरपळ, पराभवाचा फटका, अमेरिकन सैनिकांनी पाडलेला पैशाचा पाऊस, शिस्तीचा उडालेला बोजवारा आणि करमणुकीच्या उंडारलेल्या कल्पना — यांमुळे रात्रीचे घराबाहेरचे पाऊल नुकतेच वाकडे पडले नाही, तर साफ उनाडले. अर्थात गेशाची गणिका झाली, किमोनोचा स्ट्रिप्टीज् झाला, साकेची रम बनली, बीअरचा पेला भरून देणारा हात गिऱ्हाइकाच्या गळ्याभोवती पडू लागला,

टोकिओबद्दल लिहिताना या उलाढाली शहराच्या करमणूक-केंद्रांबद्दल लिहिले नाही तर तो अपमान त्याला मुळींच सहन होणार नाही. करमणूक, स्वैर करमणूक ही जपानी जीवनाची निकराची गरज आहे. राजा, पिता, गुरू, मालक, माता, बंधू, भगिनी, पूर्वज, इत्यादींविषयीच्या अनंत कर्तव्यांनी आणि निर्बंधांनी जखडलेल्या, पीडलेल्या, त्रस्त झालेल्या, आणि आपला त्रास शब्दांनी अगर हावभावांनीही व्यक्त करण्यास स्वतंत्र नसलेल्या जिवाला, क्षणभर का होईना, या पाशांचा विसर पाडण्यासाठी, त्यांच्या जाणिवेतून सुटण्यासाठी, करमणुकीची गरजच असते – आणि ही करमणूक साधी, मिळमिळीत, पचपचीत असून चालणार नाही. ती चांगली कडक, मनावरचे काच तटातट तोडणारी, करकचून आवळलेल्या जीवाला स्वैर सोडणारी, विकारांचा टाण बांधलेला घोडा क्षणात उधळून देणारी असली पाहिजे. अर्थात जपान्यांची करमणूक ही शिष्ट, विनम्र, ओठांच्या कडा किंचित विलग करून हसणारी, सभ्यतेच्या इस्त्रीस जपणारी, दैनंदिन जीवनाच्या काठाकाठाने जाणारी, बंधनांच्या रिंगणात स्वतःभोवतीच फिरणारी नसते. ती मुक्त असते, स्वैर असते, सारे संकेत पार झुगारून देणारी असते. सांसारिक कर्तव्यांपलीकडच्या उनाड प्रांतात बेहोष उड्या घेणारी असते. आणि सुज्ञ समाजाची त्याला फारशी आडकाठीही नसते. तुमच्या मूळ कर्तव्यांचा भंग न करता जे काय करायचे ते खुशाल करा, कोणी तुम्हाला जाब विचारणार नाही. खुशाल वेश्यागमन करा, फक्त बायकोला टाकू नका. खुशाल दारू प्या, पण शुद्धीवर आल्यावर तुमची जागा तुम्हाला घ्यायची आहे हे विसरू नका. खुशाल जुगार खेळा, पण रोजच्या संसाराची तरतूद करायची टाळू नका – असा हा मामला असतो. म्हणून दारूपान, वेश्यागमन, वगैरे प्रकार, अगदीच राहवत नाही म्हणून संयमाने, मर्यादेने करावयाचे प्रकार नव्हेत. दारू झिंगण्यासाठी असते. स्त्री झोपण्यासाठी असते आणि जुगार झुकण्यासाठी असतो. सुमो, बेसबॉलसारखे खेळही धुंद होण्यासाठी असतात. बाटली तोंडाला लावल्याबरोबर जपानी माणूस झिंगतो, कारण तो झिंगायला उत्सुकच असतो. वेश्येबरोबरच्या संबंधात तो झटाझट पावले टाकतो, कारण लैंगिक क्रियेभोवती रोमांचक शृंगाराचे धुके जमवणे त्याला पसंत नाही. असतील तेवढे पैसे तो पणाला लावतो, कारण जुगाराचा पेला घटाघटा रिकामा करणे एवढेच त्याला समजते. काबुकी अगर नोह थिएटरात तो पसंतीच्या नुसत्या टाळ्या मारीत नाही, आरोळ्या ठोकतो. सुमो कुस्त्यांचे सामने पाहात असताना तो नुसत्या आरोळ्या

सामने म्हणजे विधिसंकेतांचा एक लांबलचक पटच. कुस्तीच्या आखाड्यात शिरल्याबरोबर मधोमध रिंगणावर टांगलेले, इसे मंदिराच्या छपराची आठवण करून देणारे छपर, आपण आता विधिसंकेतांच्या जगात शिरलो आहोत याची तत्काळ जाणीव करून देते. या छपराचा आणि त्यांना लावलेल्या पताकांचा तादृश उपयोग काही नाही. पण हे छपर म्हणजे या कुस्त्यांच्या प्रतिष्ठेचे शिखर आहे, आणि सारा सामनाभर ते या प्रतिष्ठेची उदात्त जाणीव तुम्हाला करून देत असते.

कुस्त्या सुरू होण्यापूर्वी विधीचे केवढे अवडंबर! प्रथम सारे कुस्तीगीर मोठ्या समारंभाने आपले ढेरपोट हालवीत येणार, तितक्याच समारंभाने प्रेक्षकांना आणि एकमेकांना अभिवादन करणार, आणि परत जाणार. मग तिघे वस्ताद येणार. त्यांच्या कमरेला असलेले गवताचे पण सोनेरी–रुपेरी जरीने नक्षिलेले एक वस्त्र यांच्या पोटाखाली रुळत असणार. त्यांपैकी एकाच्या कमरेला



आणि योशिवारातली वारयोषिता चक्क रस्त्यावर आली. विशेष म्हणजे जुगाराचा पाचिंको झाला. पाचिंको हे युद्धोत्तर बेहोषीचे समर्पक प्रतीक आहे.

पाचिंको हा उभ्या पटावर कळ दाबून गोटी उडवण्याचा खेळ आहे. ही गोटी पटावरच्या भोकात गेली तर तिची दामदुप्पट होते, न गेली तर सरळ पटाच्या मालकाच्या खिशात जाते. तुमच्यापाशी काही गोट्या जमल्या तर चॉकलेट, बिस्किटे, स्नो, शेव्हिंग क्रीम असल्या वस्तू मोबदल्यात मिळतात; न जमल्या तर रिकाम्या खिशात 'बेटर लक नेक्स्ट टाइम' हा मंत्र भरून घरी जाता येते. जुगाराच्या खेळातली वेडी आशा या खेळाच्या पुरी मानगुटीला बसली आहे. खरे म्हणजे खेळणाराच्या. पाचिंकोच्या अड्ड्यात शिरलेल्या माणसाला दुसरे कसले भान नसते. त्याचा हात पाचिंकोच्या कळीला चिकटलेला असतो, नजर पाचिंकोच्या गोटीबरोबर उडत असते, आणि शुद्ध पटावरच्या त्या बिळात दडून बसते. आजूबाजूच्या घडामोडींची त्याला दादखबर नसते. एकदा एका अड्ड्यात, पाचिंकोला भर आलेला असताना, एक इसम हृदयक्रिया थांबून मरून पडला; बहुधा उनाड गोट्यांचा फसवा कारभार त्याला असह्य झाला – पण तिकडे कोणाचे लक्ष गेले नाही. टोकिओच्या एका चौकात एक महोत्सवी नाटक रंगले असताना कित्येक तरुण समोरच्या पाचिंकोच्या अड्ड्यात रमले होते. त्याचप्रमाणे योशिवारातल्या मुली आपले मोहजाळ पसरण्याची शिकस्त करीत असताना त्यांच्याकडे चक्क दुर्लक्ष करून अनेक तरुण शेजारच्या पाचिंको-अड्ड्यात गर्दी करीत असतात. पाचिंको हा युद्धोत्तर जपानचा एक चलता धंदा बनला आहे. कोणत्याही रस्त्यात जा, पाचिंकोच्या गोट्यांचा खडखडात कानात शिरणारच, आणि काही रस्त्यात तर पाचिंको-खेरीज दुसरे काही दिसत नाही, ऐकू येत नाही. पाचिंकोविरुद्ध संभावित तक्रारी खूप आहेत. पण श्रीमंतांना जशी गेशा, मध्यमवर्गीयाला पेयगृहातली मुलगी, तशी गरिबाला पाचिंकोची गोटी. तिच्याबरोबर त्याचा जीव उडणार, त्याला इलाज नाही.

* * *

जपानात कोणत्याही गोष्टीवर कालाचे संस्कार झाले, की तिच्या विधिसंकेतांचा संभार निर्माण होतो. सुमो कुस्ती हे याचे उत्कृष्ट उदाहरण आहे. सुमो कुस्त्यांचे

एक सफेद दोरखंड असणार आणि त्याला स्वच्छ कागदाचे कपटे चिकटलेले असणार. दुसऱ्या दोघांच्या हातांत तलवार असणार. हेही येऊन प्रेक्षकांना मोठ्या समारंभाने अभिवादन करणार.

त्यानंतर कुस्त्या! पण त्यादेखील विधींनी वेढलेल्या, मढलेल्या. कुस्तीगीर रंगणात आल्याबरोबर त्याच्या हातावर लाकडी पळयाने पाणी घालण्यात येणार. त्याने तो चूळ भरून टाकणार. मग एका कोपऱ्याला उभे राहून आपले हत्तीसारखे पाय एकदा एका बाजूला व एकदा दुसऱ्या बाजूला उचलून जमिनीवर थाडदिशी आपटणार, मग कोपऱ्यातल्या मिठाच्या राशीतले मूठभर मीठ घेऊन ते रंगणात उडवणार, मग दोघे एकमेकांसमोर हात गुडघे टेकून बेडकासारखे बसणार आणि एकमेकाकडे खाऊ की गिळू अशा नजरेने टवकारणार, नंतर उठणार, पुन्हा चूळ भरणार, पुन्हा मीठ उडविणार, पुन्हा बेडकासारखे बसून एकमेकांना स्वाहाःकार करण्याचा आविर्भाव आणणार – असे किती वेळ चालणार त्याला सुमार नाही. असे बराच वेळ चालल्यावर आणि प्रेक्षकांनी ते अनिमिष नजरेने पाहिल्यावर, ती नजर चळते आहे इतक्यात हे लठ्ठंभारती एकमेकांना भिडणार – आणि भिड भिड म्हणताहेत तोवर एकाला चीत करून दुसरा विजयी मुद्रेने अभिवादन करणार आणि पराभूताचे अभिवादन स्वीकारणार!

पण एवढेच नाही. या साऱ्या विधियुक्त लढतीवर इतर विधींचा केवढा तरी सरंजाम गोळा झालेला आहे आणि सरंजामाचे मानकरीही गोळा झालेले आहेत. चार निर्णयकार आहेत, एक बुलाऱ्या आहे, निरीक्षक आहे, मीठझाड्या आहे, त्यांचे काळया, तपकिरी रंगाचे खास पोशाख आहेत, बुलाऱ्याची 'अवस वाढा हो'–सारखी ओरडण्याची खास पद्धत आहे, निरीक्षकाने मधून मधून चमत्कारिक आवाज काढावयाचे आहेत – इतके सारे आणि कितीतरी अधिक आहे. त्यात प्रेक्षकांच्या उऱ्यांना आणि आरोळयांना फार मोठे स्थान आहे.

कोणत्याही आचार-प्रचारयुक्त विधीला जी एक श्रेष्ठता, जे एक सौंदर्य, जी एक आवश्यकता प्राप्त होते ती याही विधीला प्राप्त झालेली आहे. त्या शेवटच्या क्षणी जेव्हा ते राक्षस एकमेकांना भिडतात, त्या क्षणाला गती, सामर्थ्य, चैतन्य प्राप्त करून देण्याचे कार्य प्राथमिक विधी करीत असतात. ते त्या अंतिम क्षणाचेच

अग्रदूत असतात, आणि त्यांचा लय आणि गती यांमुळेच तो सारा लांबलचक विधी आकर्षक वाटतो. नव्हे, तो नसला तर त्या कुस्तीत काही राम उरणार नाही – एखाद्या लठ्ठ बाईच्या पाय घसरून पडण्यासारखीच ती कुस्ती मग वाटेल!

* * *

आज माझा जपानच्या मुक्कामातला शेवटचा दिवस. इतक्या दिवसांत खूप पाहिले, खूप अनुभवले. पण दोन गोष्टी पाहायच्या राहिल्या होत्या. एक टोकिओचे निशी हांगांजी देवालय आणि दुसरे कोराकु – एन उद्यान. देवालयाबद्दल मला अधिक उत्साह होता, कारण भारतातील बौद्ध वास्तुशिल्पाच्या धर्तीवर ते बांधलेले आहे. जपानने वास्तुशिल्पाबाबत कोणाची उसनवारी करावी हे मला चमत्कारिक वाटते, पण बुद्धमंदिर भारतीय पद्धतीवर बांधणे यात एक औचित्य आहे. तरीपण असली उसनवारी साधारणपणे धोका देत असल्यामुळे मी निराश होण्याची तयारी ठेवूनच गेलो. थोडीशी निराशा झालीच, कारण मी पूर्ण भारतीय अगर भारतीय आणि जपानी अशा मिश्र वास्तुशिल्पाची अपेक्षा केली होती आणि मला आढळले ते भारतीय वास्तुशिल्पात युरोपिअन मिश्रण. दर्शनी भागावरच्या रेनासाँ पद्धतीच्या स्तंभांना माझा इतका विरोध नाही, कारण त्यांच्यावरचे कोरीव काम भारतीय आहे, पण मुंबईत गुदामांच्या भिंतीवर आढळतात तशा आडव्या खापा पाहून मला संताप आला. पण देवालयाचे कंदर दर्शन भारतीय आहे आणि त्यात एक डौल आहे. प्रवेशद्वाराचे स्तम्भ, प्रवेशद्वाराची कमान, मधल्या सभामंडपावरचा मजला, त्याच्या गच्चीचा कठडा, त्याचे शिखर, यांचे शिल्प अस्सल भारतीय आहे आणि त्यांच्यावरची गो–पद्मादी प्रतीके भारतीय आहेत. मंदिराच्या डावी उजवीकडच्या टोकावरचे स्तूप साऱ्या वास्तूला एक अभिजात पौर्वात्य शोभा प्राप्त करून देतात. एकंदरीत सबंध देवालयाच्या बांधणीत व्यक्त झालेली भारतीय संस्कारदृष्टी आनंददायक वाटली. जपानच्या सलग, शुद्ध रेषेच्या लाकडी वास्तुशिल्पाचे संस्कार या मंदिरावर दिसले असते तर मला अधिक आनंद झाला असता. पण भारतीय कोरीव शिल्पाच्या दगडी इमारतीत जपानी आत्मा ओतणे जवळपास अशक्य आहे. तरी मोमोयामा युगातले अलंकारिक वैभव निर्माण करणाऱ्या जपानी वास्तुशास्त्रज्ञांनी या इमारतीला थोडेसे जपानी पाणी दिलेच आहे. आतल्या सभागृहातला रम्मा खास

जपानी आहे. मात्र या सभागृहात एक गोष्ट विलक्षण खटकली. उपासकांसाठी खुर्च्यांची व्यवस्था केली आहे. यात भारतीय काय अगर जपानी काय, दोनही परंपरांचा साफ उपमर्द आहे.

तिसऱ्या प्रहरी कोराकु–एन बागेत गेलो. आणि वास्तुशास्त्राच्या दृष्टीने सकाळच्या देवालयापेक्षा ही बाग मला अधिक आवडली. या बागेतही दोन पद्धतींचा मिलाफ आहे, पण त्याचा आत्मा जपानी आहे. सरदार मित्सुकुनी याने ही बाग सतराव्या शतकात बांधली. त्या वेळी त्याच्यापाशी चू शुन–शुई नावाचा एक चिनी पंडित राहात होता. त्याने त्या बागेत लक्ष घातले आणि चिनी कल्पनांचा वर्षाव केला. या कल्पनांचे संस्कार बागेतल्या पाऊलवाटांवर, टेकड्यांवर आणि पुलांवर झाले आहेत. या बागेतल्या पूर्णचंद्र पुलाची कल्पना जपानला चू शुन–शुईनेच दिली.

पण या बागेची आठवण मला राहिली आहे ती निराळ्याच गोष्टीमुळे. या बागेतल्या वातावरणात बाराव्या शतकातील भिक्षू कवी सेग्यो याच्या स्मृती दरवळत आहेत. त्याचे येथे एक स्मारक होते. १९२३ च्या धरणीकंपाने ते नष्ट झाले, पण त्याची कविता कोरलेली एक शिळा शिल्लक आहे. धरणीकंपाने वाङ्मयीन अमरत्वाला केलेले हे अभिवादनच होय. पण त्याहिपेक्षा सेग्योच्या स्मृतीशी निगडित असलेला एक अनुभव माझ्या अधिक लक्षात राहिला आहे. बागेत हिंडताना माझी वृत्ती जरा विकल होती. चार–दोन तासांतच मी जपान सोडणार होतो. त्याचे मला वाईट वाटत होते. मी जड पावलांनी हिंडत होतो. वृक्षवेलींकडे विषण्ण दृष्टीने पाहत होतो. कित्येकदा मी एखाद्या दृश्याकडे निर्बोध दृष्टीने पाहत राही, आणि मग कशाने तरी भानावर येई. असाच एकदा एका तळ्याकडे पाहत होतो, तो तळ्यापासच्या दलदलीतून एक पक्षी उडाला आणि आदल्या दिवशीच वाचलेली सेग्योची कविता आठवली :

कोकोरो नाकि<br>
मि नि मौ आवारे वा<br>
शिरा रेकेरि<br>
शिगि तात्सु सावा नो<br>
आकि नो युगारे

तळ्यापासच्या भागातून उडालेला पक्षी पाहून सेग्योसारख्या विकारांवर विजय मिळविलेल्या साधुपुरुषाचेही अंतःकरण खिन्न होऊन गेले, आणि मी तर जपानच्या प्रेमात सापडलो होतो. जपानने माझे विकार शमवले नव्हते, चेतवले होते. तो पक्षी म्हणजे माझ्या अतृप्त इच्छांचे पाखरूच टोकिओच्या या सौंदर्यस्थळा-भोवती घिरट्या घालीत आहे असे मला वाटले.

कोराकु – एन बागेतून परत आलो, सामान आवरून टॅक्सी बोलावली आणि हॅनेडा विमानतळाकडे निघालो. रस्त्याच्या कडेने दुतर्फा टोकिओची तीच भिकार, भकास, लाकडी पेटाऱ्यांसारखी घरे उभी होती. त्यांचा मला उबग आला होता, पण आता तीच आचवणार म्हणून दुःख होत होते. अद्यापर्यंत त्यांच्याकडे कोरड्या दृष्टीने पाहणाऱ्या माझ्या नजरेत आता ओलावा शिरला होता. आजवर या घरांच्या स्वरूपात तत्त्वज्ञान शोधून मी माझे समाधान करीत होतो. आता माझ्या विचारांत भावना शिरली होती.

जपान सोडताना जीव जडावला. अंतःकरण हलले. जपानात माझ्या जीवना-तल्या अनेक गोड अनुभवांची पुनरावृत्ती झाली होती. अनेक स्वप्ने साकार झाली. नवी स्वप्ने उमलली होतो. अंतःकरणाच्या कक्षा वाढल्या होत्या. कोण-त्याही देशाने असा अनुभव दिला नव्हता. जपानचा निसर्ग पाहिला आणि लहानपणी अनुभवलेल्या कोकणच्या निसर्गाला नवे अंकुर फुटले. जपानच्या खोऱ्यातून समुद्रकाठचे दर्शन घेतले आणि किनाऱ्यावर फेसाळणाऱ्या लाटांत रत्नागिरीच्या किल्ल्यावर फेसाळणाऱ्या लाटांचे दर्शन झाले. नाराच्या होर्युजी मंदिराच्या प्राकारात पाऊल टाकले नि गोव्याच्या मंगेशीच्या प्राकारातले वाता-वरण जिवंत झाले. लहानपणी देवळातल्या दीपस्तंभात जी राजस भव्यता जाणवली होती ती नारा-निक्कोचे पागोडे पाहून पूर्णत्वाप्रत पोचली. जपानच्या स्त्रियांत सौंदर्य आणि चारुता यांचे जे मीलन दिसले त्याने स्त्रीत्वाचा एक नवाच साक्षात्कार झाला. जपानी लोकांच्या वर्तनातील शालीन संस्कारशीलतेने संस्कृतीच्या काही नव्याच छटा उमटल्या आणि, जपानी माणसाच्या मनात काय चालले आहे याचा बिलकूल पत्ता लागत नाही याची मधूनमधून होणारी अस्वस्थ जाणीव त्यांनी पार विसरवून टाकली. जपानातल्या जीवनात रंग आणि रेषा यांनी धारण केलेली निरनिराळी स्वप्नमय रूपे पाहिली तेव्हा तर कलासृष्टीतल्या परीकथाच आपल्यापुढे

आकारास आल्या की काय असे वाटले. एक अनुभव सारखा सारखा डोळ्यांपुढे साकारत होता. आम्ही ओइसोच्या किनाऱ्यावर विहारासाठी गेलो होतो. माझ्यापुढे पॅसिफिक समुद्राचा निळा विशाल विस्तार पसरला होता. मधून मधून त्यावर जहाजे सफेत शुभ्र शिडे पसरून डौलाने उभी होती. हां हां म्हणता माझ्या हृदयाचे पाखरू पंख पसरून एका जहाजाच्या डोलकाठीवर जाऊन बसले – आणि मला कसल्या तरी अज्ञात अज्ञात प्रदेशाची सुरम्य दर्शने झाली. तो अनुभव आता पुनःपुन्हा जागा होत होता. या अनुभवात नुसता स्वप्नाळूपणा आहे, त्यातली वास्तवता कदाचित कठोरच असेल असे माझी बुद्धी मला सारखी बजावीत होती, पण त्याचा उपयोग होत नव्हता. तो पॅसिफिकचा समुद्र, त्यावर डोलणारी ती शिडे, ती डोलकाठी – तो सुरम्य अनुभव पुनःपुन्हा माझ्या साऱ्या संज्ञा व्यापून टाकीत होता.

* * *

हॅनेडा विमानतळाचे दर्शन झाले आणि मी भानावर आलो. विमान-तळाच्या आवारात शिरताना उजवीकडे एक लाल शेंदरी तोरी माझ्या नजरेस पडली आणि मला नवल वाटले. तोरी दिसते, पण मंदिर कोठे आहे? आणि ही तोरी अशी विमानतळाच्या आवारात कशी? या प्रश्नांची लगेच उत्तरे शोधायला वेळ नव्हता. वैमानिक प्रवासाचे सारे विधी अगोदर पार पाडायला हवे होते. ते सारे आटपले आणि विमान सुटण्याची वाट पाहात बसलो तेव्हा एका गृहस्थापाशी चौकशी केली. त्याने एक चकित करणारी गोष्टच सांगितली. अनामोरी मंदिराची ही तोरी. १९४५ साली या विमानतळाची दुरुस्ती करीत असताना अमेरिकन इंजीनिअर्सना दक्षिणेकडे हे छोटेसे शिंटो मंदिर आढळले. त्यांनी ते तेथून उखडायचे ठरविले. पण उखडण्याची पहिली पहार बसली आणि विमानतळावर लहान मोठे अपघात होऊ लागले. वैमानिक धर्म-भोळे असतातच. त्यांना वाटले, अनामोरीचा कोप झाला. त्यांनी ते मंदिर तसेच ठेवले. पुढे या विमानतळाचा विस्तार झाला, तेव्हा हे मंदिर हालविणे भागच होते, पण जपान्यांनी त्या मंदिराची प्रतिस्थापना इमारतीच्या माथ्यावर – वरच्या गच्चीवर – केली. तोरी मात्र होती तेथेच पूर्वीप्रमाणे या मंदिराच्या प्रवेशद्वाराचे प्रतीक म्हणून झळकत राहिली.

विमानतळ म्हणजे आजच्या आधुनिकतेचे साक्षीदार. टोकिओत या विमानतळाच्या डोक्यावर एक शिंटो मंदिर जाऊन बसावे ही विसंगती मोठी विचित्र होती. पण तिचे फारसे आश्चर्य मला वाटले नाही. गेले काही आठवडे मी जपानातल्या विसंगतीचाच अनुभव घेत होतो. या विसंगतीमुळे मी वारंवार स्तिमित झालो होतो. माझ्या डोळ्यावरची स्वप्नमय माया तिने अनेकदा बिघडविली होती. जपानी लोक सौंदर्याचे इतके भोक्ते, पण कुरूप विद्रूप शहरे वसवण्यात त्यांचा हातखंडा आहे. एखादे किओटोसारखे शहर त्याला अपवाद असेल, पण त्याच्याही सौंदर्यावर आघात होऊ लागले आहेत. जपान्यांत कलासक्त वृत्ती इतकी भिनलेली, साधा एक शब्द लिहिताना ते एखादी कलाकृती निर्माण करून जातील, पण या कलालोलुप लोकांचा पैशाचा लोभ पाहून घ्यावा. लोक व्यक्तिशः इतके स्वच्छ, त्यांनी न्हाण्याचा धर्म बनविला आहे. पण सार्वजनिक ठिकाणांचे उकिरडे बनविणे हा त्यांच्या हातचा मळ. घर ते इतके स्वच्छ नितळ ठेवतील, पण त्यांच्या आगगाड्यांच्या डब्यातील घाण आणि कचेरीतला पसारा विश्वास बसणार नाही असा. निर्वाणमय शांतीची उपासना करणाऱ्या झेन धर्माचे ते उपासक, पण चार जपानी एकत्र जमले म्हणजे अफाट गलका माजवतात. लोक इतके सभ्य आणि विनयशील, व्यक्तिशः इतके दयाळू, पण सार्वजनिक ठिकाणी क्रूर धक्काबुक्की करण्यास ते सदैव तयार. फुलांचा त्यांना इतका सोस, चार दिवस मोहरांचे मायाजाळ पसरणाऱ्या चेरीचा कुरूप उपद्रव ते वर्षाचे तीनशेसाठ दिवस आनंदाने सहन करतील, पण सार्वजनिक उद्यानात याच चेरीच्या झाडाखाली घाणीचे ढीग रचण्यास त्यांना खंत वाटत नाही. फुलांचे वेड त्यांच्या जीवनात इतके पसरलेले असतानासुद्धा त्यांच्या बागांत फुलझाडांना महत्त्व नाही. जपान्याच्या विसंगतीची कमाल त्यांच्या आगीच्या आकर्षणात आहे. वस्तुतः आग आणि विस्तव याची त्यांना इतकी धास्ती ! आगीचा राक्षस त्यांची घरेदारे, शहरे स्वाहा करायला टपून बसलेला असतो, आणि तरी ते सतत विस्तवाशी खेळ खेळत असतात. त्यांच्या घरातल्या विस्तवाच्या शेगड्या म्हणजे अग्नि-भुतेच -- केव्हा खाक करतील खात्री नाही. आणि घराबाहेर रोज दीपोत्सव. दररोज बाजारात रोषणाई सुरू असते. अगदी कंदिलांच्या रांगांनी नि तोरणांनी दुकाने फुललेली असतात. इतकेच काय पण रस्त्यावरचा पोलीससुद्धा हातात कागदाचा तेवता कंदिल घेऊन रहदारीचे नियंत्रण करीत असतो. जपानी लोक

म्हणजे सूर्यदेवतेचे वंशज. विश्वाच्या प्रारंभकालीच रुसून बसलेल्या या देवतेच्या स्वभावातली कळ अद्याप कायम असावी. आपल्या मिष्किलपणाचे प्रयोग ती जपान्यांच्या दीपभक्तीतून करीत असते असे दिसते!

आमचे विमान आकाशात चढले नि माझ्या नजरेसमोर तो रत्नजडित गालिचा पसरला. प्रथम मी तो पाहिला तेव्हा त्याच्या जादूने माझ्या नजरेवर मोहिनी पडली होती. आता त्या जादूची काही रहस्ये परिचयाची झाली होती. तरी ती मोहिनी कायम होती... तो गालिचा तसाच झगमगत होता, त्याच्यावरची फुले तशीच प्रकाशत होती – फक्त त्यांची जाणीव अधिक खोल होती, गाभ्यापर्यंत पोचत होती, तेथल्या वेदनेचा काटा हालवीत होती.



# चेरीचा मोहर



चेरीचा जगप्रसिद्ध मोहर पाहायला मिळणार म्हणून मी खूप होऊन गेलो होतो. त्याचप्रमाणे निसर्गसुंदर जपानच्या वसंतऋतूचे दर्शन वडणार म्हणूनही आनंदून गेलो होतो. पण या वेळी टोकिओच्या दर्शनाने माझी निराशाच

झाली.[1] टोकिओ म्हणजे धूळ, ओरड आणि गर्दी यांचे संत्रस्त मिश्रण हा अनुभव नेहमीचाच, पण गिंझाच्या दुतर्फा विलो वृक्षांनी माझ्या नजरेला अनेकदा अगदी वेध लावलेला होता. इम्पीरिअल पॅलेसच्या पटांगणासमोरच्या रस्त्याकाठच्या सुबक आकाराच्या वृक्षांनी माझी दृष्टी अनेकदा गुंगविली होती. पण या वेळी या झाडांचे उघडेओके सांगाडे झाले होते. त्यांपैकी काहींची अंगे वसंताच्या स्पर्शाने शहारली होती, पण त्यातून कोवळे लुसलुशीत धुमारे अद्याप फुटायचे होते. राजवाड्याभोवतालच्या खंदकापलीकडील टेकड्यांवरील चिडाची झाडे अर्थात हिरवी होती, पण त्यांच्याही झुबक्यांचा रंग विटलेला होता. वसंताच्या हवेतली गोड शिरशिरी तेवढीच सुखकारक होती. पण माझ्या आशा हिरव्या होत्या, गुलाबी होत्या.

जपान टाईम्समध्ये वाचले की यंदा हिवाळा लांबल्यामुळे चेरीचा मोसम मागस आहे. चेरीचा मोहर पाहण्याची इच्छा अनावर होती, पण चेरीच्या झाडाचे सुकट ध्यान पाहण्याची माझी मुळीच तयारी नव्हती. म्हणून मी हॉटेलच्या खोलीतच वाट पाहत स्वस्थ राहिलो. आसपासच्या रस्त्यांवर प्लॅस्टिकच्या कृत्रिम चेरी-मोहराची आरास होती, पण या आंबटशोकी शोभेची मला शिसारी आली.

तोच एक दिवस एक मित्र आला नि म्हणाला, तिकडे चेरीच्या मोहराची माया पसरली आहे आणि इकडे तू आढ्याकडे डोळे लावून काय बसला आहेस! लगेच जाऊन फूजीच्या अगर हाकोनेच्या सफरीच्या बसेस्‌ची चवकशी केली, तो कळले की साऱ्या बसेस्‌ गच्च भरल्या आहेत, एकही जागा मोकळी नाही. अगदी निराश झालो. वाटले, मोठ्या योगायोगाने वसंतात जपानला आलो, आणि चेरीचा मोहर न पाहण्याचा कर्मदरिद्रीपणा पत्करून परत जावे लागणार! इतक्यात आठवले की टोकिओच्या उएनो पार्कमध्ये चेरीची मोठी लागवड आहे. दुसऱ्या दिवशी सकाळीं उएनो पार्ककडे निघालो तो जपानात स्थायिक झालेला एक अमेरिकन मित्र भेटला. तो म्हणाला, चेरीच्या दृष्टीने उभ्या

---

१ पुस्तकाचा इतर भाग लिहून झाल्यानंतर, १९६१ च्या एप्रिलात केलेल्या सफरीतील एक अनुभव.

जपानात सर्वोत्कृष्ट ठरणारे ठिकाण या टोकिओतच आहे हे तुला ठाऊक आहे काय ? —चल, मी तुला तिकडेच नेतो.

* * *

त्याने मला यासुकुनी मंदिराला नेले. आणि खरोखरच मंदिराच्या समोर चेरीच्या फुललेल्या फांद्यांचा अप्रतिम मंडप दृष्टीस पडला. आम्ही त्या मंडपात शिरलो. वर गुलाबी छटांच्या शुभ्रसफेत फुलांचे छत, पायाशी पांढऱ्या स्वच्छ पाकळ्यांचा खच आणि मध्ये आमच्या अंगावर चेरीच्या लहरत्या पाकळ्यांचा हिमाच्या भुरभुरत्या वर्षावासारखा वर्षाव ! क्षणभर परीकथांच्या विश्वात आल्यासारखेच वाटले.

पण क्षणभरच ! कारण लगेच मन विचार करू लागले. हे दृश्य खरोखरच सुंदर आहे. फुलांच्या नैसर्गिक मंडपाचा, मंडपाच्या लहरत्या तरल वातावरणाचा अनुभव अपूर्व आहे. पण खरोखरच हे दृश्य इतके असामान्य आहे काय ? आपल्याकडची गुलमोहराची झाडे अशी मोहराने अक्षरशः भरून जात नाहीत काय ? जकरंदाच्या झाडाचे वसंतात असे संपूर्ण रूपांतर होत नाही काय ? अर्थात गुलमोहराच्या ज्वालामय पुष्पसंभाराचे वातावरण निराळे. जकरंदाच्या निळ्या मायेचे वस्त्र वेगळे. पण चेरीच्या झाडाभोवती जपान्यांनी आनंदाचे, उत्साहाचे, नृत्यगीताचे जे एक वातावरण निर्माण करून ठेवले आहे तसे गुलमोहराभोवती वा पारिजातकाभोवती निर्माण करण्याची आवश्यकता आम्हाला वाटली आहे काय ?

आपल्या वाङ्मयात वसंतोत्सवाची भरघोस वर्णने आपण वाचलेली आहेत. आपल्या प्राचीन जीवनातल्या निसर्गप्रीतीची साक्ष त्यातून मिळते. पण ही निसर्गभक्ती जीवनातून नष्ट होऊन ग्रंथांतरी जाऊन बसली आहे. आणि उलट जपान्यांनी निसर्गाचे हे वातावरण जीवनात ओतले आहे, आणि राष्ट्रीय आत्म्याला स्पर्श करण्याचे सामर्थ्य त्यांनी त्याला प्राप्त करून दिले आहे.

आज रविवार. आज या वातावरणाला विलक्षण सळसळ प्राप्त व्हायला हवी. पण तिचा प्रत्यय या मंदिरात येत नव्हता. अर्थात येथेही गर्दी होती. स्त्रीपुरुषमुले यांची रीघ लागली होती. ती येत होती, मंडपात शिरत होती, फुलांच्या दर्शनाने फुलत होती, पाकळ्यांच्या स्पर्शाने शहारत होती, आनंदाच्या आस्वादाने लहरत होती. पण त्यात एक मार्दव होते, एक संयम होता, संभावितपणा होता. एक प्रकारचा अलिप्तपणाही होता. कसली तरी उणीव भासत होती.

चेरीच्या मोहराभोवताली जपानने तयार केलेले वातावरण अनुभवण्यासाठी आम्हाला उएनो पार्कमध्ये जावे लागले.

* * *

उएनो पार्कमध्ये एक शिण्टो मंदिर आहे आणि मंदिराच्या आवारात चेरीच्या झाडांची एक प्राचीन लागवड आहे. या आवारात केव्हाही फेरफटका केला तरी कसल्या तरी आगळ्या वातावरणाचा अनुभव येतो. चेरीच्या हंगामात तर या वातावरणाला पिसे लागते. पार्कमध्ये सर्वत्र उभारलेल्या पताकांनी आणि उत्सवांकित कंदिलांनी याची पूर्वसूचना मिळाली. आज तर सुट्टीचा दिवस! आज याला उधाणच आले होते. जिकडे तिकडे गर्दी, गडबड, धांदल – आणि चेरीच्या झाडांच्या तळाशी तर गर्दीचा अक्षरशः खच! पण तिचेही आकार-प्रकार! गर्दीत निरनिराळे गट. निरनिराळे फड! प्रत्येकाच्या पताका निराळ्या, निशाण्या निराळ्या, ऐट निराळी, करमणूक निराळी! एका फडात तीन किमोनो-कन्या सामीसेनच्या तालावर खानदानी नृत्य करीत होत्या. दुसऱ्या फडात व्हॉयलीनचे स्वर निघत होते. तिसऱ्यात मँडोलिनच्या स्वरांना मुलामुलींच्या गाण्याची साथ मिळत होती. चवथ्यात नशापाण्याने बेहोष झालेल्या एका गलेलठ्ठ प्राण्याचे अर्धनग्न नृत्य. (आणि त्याच्याकडे इतर फडांचे संपूर्ण दुर्लक्ष्य!) पाचव्यात नुसत्या हशाटाळ्या! सहाव्यात व्हिस्कीच्या बाटल्यांचे बार! सातव्यात त्यांच्याशी बिअरची स्पर्धा! आठव्यात मेजवानीची बैठक. नवव्यात फोटोची करामत, आणि दहाव्या, अकराव्या, बाराव्या फडात या साऱ्या व यासारख्या इतर अनेक गोष्टींची भेसळ-मिसळ! साऱ्यांच्या डोक्यावर चेरीच्या डहाळ्यांचे छत्र होते. चेरीच्या पाकळ्यांचा त्यांच्या अंगावर स्वैर वर्षाव होत होता. पण त्याची त्यांना जाणीव नव्हती. तिकडे त्यांचे लक्षच नव्हते. चेरीचा मोहर हे नुसते निमित्त होते. बेदरकार उत्सहात स्वतःला आणि स्वतःसकट इतरांना झोकून देणे हे उद्दिष्ट होते. बेदरकारपणामुळेच जेथे बोट शिरकवायला जागा नव्हती तेथे सबंध शरीर घुसत होते, जेथे स्वर ऐकू येण्याची शक्यता नव्हती तेथे गाण्याची मैफल झडत होती, आणि जेथे पाऊल सरकवायला जागा नव्हती तेथे नृत्यांची पावले पडत होती. हे कसे होत होते, काय होत होते, याची कोणाला पर्वा नव्हती, फारशी जाणीवही नव्हती. तुफानलेल्या समुद्राला किनाऱ्यावरून ओढून आणलेल्या किंवा किनाऱ्यावर लोटून दिलेल्या, आपल्या बेफाम पाण्यावर

धडपडणाऱ्या किंवा प्रक्षुब्ध पाण्यात गडप झालेल्या नौकांबद्दल सारखीच कदर असते, तशीच या बेदरकारीला या तपशीलाबाबत होती.

पण पलीकडे, मंदिराच्या प्राकारात, एक निराळेच वातावरण नांदत होते. तेथल्या नृत्यमंदिरात चेरीच्या नृत्याचे अभिजात पाऊल पडत होते आणि चेरीच्या गीतांचे अभिजात सूर घुमत होते. या पावलात एक संयम होता आणि या स्वरात एक संस्कारशीलता होती. ही नृत्याची पावले टाकणाऱ्या मुलींच्या मुद्रेवर होती त्याचप्रमाणे त्यांच्या रंगदार किमोनोवरच्या नक्षीतही होती. येथे जपानच्या अभिजात संस्कृतीचा आत्मा नांदत होता. त्यात एक तन्मयता होती, समर्पणशीलता होती. एक राष्ट्रीय सांस्कृतिक उल्हास येथे होता.

पण बाहेरच्या बेदरकारीचा या आतल्या संस्कारशीलतेशी काही संबंध नव्हता — निदान दिसत नव्हता. जपानी जीवनाची ही दोन रूपे होती. ती परस्पर-विरुद्ध होती. परस्परांशी फटकून वागत होती. जपानी जीवनात अनेकांना आज एक फट पडलेली दिसते, त्याला भेग गेलेली दिसते. तिचेच हे प्रतीक म्हणावे का? पण उलट या आतल्या आणि बाहेरच्या दृश्यांत एक आंतरिक नाते नाही का? चेरीच्या अभिमानानेच ही दृश्ये प्रेरित झालेली नाहीत काय?

* * *

मला खरोखर आश्चर्य वाटते. असे आहे काय या चेरीच्या झाडात? हे कळ्यांचे, मोहरांचे, पाकळ्यांच्या वर्षावाचे दहा पंधरा दिवस सोडले तर इतर वेळी या झाडाचे रूप अभद्रच दिसते. वसंत ऋतूत त्याच्या फांद्या कळ्यांनी शहारतात, त्याच्या डहाळ्या फुलांनी शोभतात आणि सारे आसमन्त या अपूर्व शोभेने खुलून जाते. पण एकदा या पाकळ्या गळल्या (आणि त्या किती झपाझप गळतात!) आणि पाकळ्यानंतर आलेल्या पालवीची कोवळी माया निमाली की हे झाड म्हणजे शुद्ध उपद्रव. त्याला ना शोभा, ना फल. त्याचा ना उपयोग, ना आकार मग जपान्यांनी त्याचे माहात्म्य इतके का माजवले आहे?

याचे निश्चित उत्तर मजपाशी नाही. (जपानच्या कोणत्याच समस्येचे नाही. जपानबद्दल इतके लिहूनसुद्धा जपानी अंतरंगाचे कितपत दर्शन आपल्याला झाले आहे याची मला स्वतःलाच शंका आहे.) पण काही कल्पना करू शकतो. निसर्गाचा कोणताही चमत्कार देवतास्वरूप मानण्याची शिकवण शिण्टो धर्माने जपान्यांना फार कालापासून शिकवलेली आहे — आणि चेरीचे एकंदर

रूप-ध्यान लक्षात घेतले म्हणजे चेरीचा मोहर हा एक चमत्कार मानणे भागच आहे. निसर्गचमत्काराच्या पूजनाभोवती सौंदर्याचे विधिविशेष निर्माण करणे हा जपानी संस्कृतीचा जन्मजात विशेष, आणि येथे तर निसर्गाच्या एका सौंदर्य-मय चमत्काराची सौंदर्याने पूजन करण्याची संधी ! मग चेरीच्या मोहराने जपानी सौंदर्यभक्तीला आणि कलात्मकतेला मुक्त अवसर मिळाला तर नवल काय ? आधुनिक कालात या साऱ्याला प्रसिद्धीच्या तंत्राची अजोड जोड मिळाली, आणि तिच्या जोरावर जपान्यांनी चेरीच्या मोहराला जागतिक माहात्म्य प्राप्त करून दिले. आता जगाची अशी ठाम समजूत झालेली आहे की चेरीसारखी शोभा नाही आणि इतरत्र चेरी नाही.

पण ही दोनही विधाने खरी नाहीत. चेरीचे अस्तित्व जपानप्रमाणेच कोरीआत आहे – किंबहुना, चेरीची आयात जपानमध्ये कोरीआतूनच झालेली असण्याचा संभव आहे. आणि चेरीच्या मोहरापेक्षा इतर काही मोहर अधिक सुंदर आहेत – निदान कमी सुंदर नाहीत. ( कदाचित मी चेरीचा मोहर टोकिओच्या बंदिस्त जगात पाहिला, आणि किओटोमधील मारुयामा पार्कसारख्या मुक्त पार्श्वभूमीवर पाहिला नाही, हे माझ्या त्रुटित आस्वादाचे कारण असेल. पण चेरीच्याप्रमाणेच जरदाळूच्या मोहराचे कौतुक खुद्द जपानी करतात – आणि ओगाटा कोरिनसारख्या कलावंताला आलूबोखारच्या मोहराने विलक्षण मोहिनी घातली होती ! )

ते काही असले तरी जपान्यांनी चेरीच्या मोहराला जागतिक माहात्म्य प्राप्त करून दिले आहे. याचे साधे कारण म्हणजे चेरीच्या पूजनात आणि प्रसाधनात जपानने आपले सारे अंतरंग ओतले आहे. आपली सारी निसर्गभक्ती येथे पणाला लावली आहे. आपल्या उभ्या कलात्मकतेचा त्याच्यावर वर्षाव केला आहे. चेरीच्या उत्सवात स्वतःला संपूर्णपणे विसरून जाण्याची असाधारण विद्या हस्तगत केली आहे. याचाच साक्षात्कार मला उएनो पार्कात झाला. मंदिराच्या प्राकारात झाला, आणि प्राकाराबाहेरही झाला.

ही अंतरंगाची आस्था, हा अंतरंगाचा उत्साह, ही अंतरंगाची समर्पणता, चेरीच्या महोत्सवाचे रहस्य ते हेच – आणि ते त्या मोहरापेक्षाही अधिक अर्थपूर्ण आहे. चेरीपेक्षा चेरीविषयीचा जपान्यांचा अंतरंग-उत्साह अधिक प्रभावी आहे.